# लघुकथा-चतुष्टय

( सर वॉल्टर स्कॉटच्या कादंबऱ्यांच्या आधारें )

भाग २ रा

लेखक :

प्रि. गोविंद चिमणाजी भाटे, एम्. ए.



सन १९४२

आवृत्ति पहिली ] [ किंमत १-६-०

# प्रस्तावना

आज विजयादशमीस ( ता. १८ ऑक्टोबर सन १९४२ ) मी या माझ्या **लघुकथा-चतुष्टय** पुस्तकाच्या दुसऱ्या भागाची प्रस्तावना लिहिण्यास पेन हातीं घेत आहे. माझ्या पहिल्या **अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें** या पुस्तकाची प्रस्तावना मी विजयादशमीस ( ता. १० ऑक्टोबर सन १९१० ) लिहिली होती. माझ्या वयाच्या चाळिसाव्या वर्षापासून आज बहात्तराव्या वर्षापर्यंत म्हणजे बत्तीस वर्षें माझा वाङ्मय-व्यवसाय ज्या परमेश्वर-कृपा-प्रसादानें चालू शकला त्याला स्मरून या माझ्या पंचविसाव्या पुस्तकास प्रस्तावनारूपी चार शब्द लिहिण्यांत मला आनंद वाटत आहे.

या कथा शेक्सपियरच्या नाटकांच्या आधारें लिहिलेल्या **लँब्स टेल्स**च्या धर्तीवर लिहिल्या असून, त्या तीन भागांत प्रसिद्ध करण्यांत येणार आहेत. या तीन भागांमिळून स्कॉटच्या बारा विशेष वाखाणलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या आधारावर स्वतंत्र कथा मी मराठींत लिहून प्रसिद्ध करीत आहे. त्या कथा मुळाइतक्या—निदान त्यांच्या खालोखाल—मनोरंजन करणाऱ्या, माहिती देणाऱ्या व उच्च मनोभावना उद्भविणाऱ्या होतील अशी मला आशा आहे.

या भागांतील पहिली कथा फ्रान्सच्या अकराव्या **लुई**च्या कारकीर्दींतील तीन आठवड्यांच्या अवधींत घडलेल्या प्रसंगावर आधारलेली आहे. ज्याप्रमाणें इंग्लंडच्या सातव्या **हेन्री** राजानें सरदारांचें सामर्थ्य खच्ची करून त्यांना राजनिष्ठ सेवक बनवून मध्यवर्ती राजसत्ता बळकट व वैभवशाली केली त्याप्रमाणें **लुई** राजानें आपल्या दीर्घ कारकीर्दींत फ्रान्सची राजसत्ताही सामर्थ्यवान् व वर्धनशील केली.

**लुई** राजाचा दूरदर्शी धोरणीपणा, मोठी मुत्सद्देगिरी व फलज्योतिषावरील भोळसर भक्ति व **चार्ल्स ड्यूक**चा रागीटपणा, उतावळेपणा व अविचारीपणा या परस्परविरोधी स्वभावाचें उठावदार चित्र या लघुकथेंत आलें आहे.

दुसरी लघुकथा दुःखपर्यवसायी किंवा दुःखान्त आहे. तिचें संविधानक शेक्सपियरच्या **रोमिओ** आणि **ज्युलियट** नाटकाच्या संविधानकासारखें

आहे. यांत वैरभाव असलेल्या दोन घराण्यांतील तरुण-तरुणीची करुणाजनक विवाहकथा गोविली आहे. यामध्यें निरनिराळया स्वभावाच्या सहा-सात व्यक्तींचीं परिणामकारी चित्रें रेखाटलीं असून कथेचा शेवट फार हृदयस्पर्शी आहे.

कथांच्या पहिल्या भागांत ज्याप्रमाणें इंग्लंडांतील दोन बंडाच्या कथांचें कथन आहे, त्याप्रमाणें दुसऱ्या भागांतील शेवटल्या दोन कथांत इंग्लंडच्या पहिल्या **रिचर्ड**च्या **पॅलेस्टाइन** येथील धर्मयुद्धाची व तेथून वेषांतरानें परत आल्याची व आपल्या पराक्रमानें आपलें राजपद मिळविल्याची हकीकत आहे.

तिसऱ्या कथेत **क्रिश्चन धर्मी रिचर्ड** व **इसलाम धर्मी सॅलॅडिन** यांच्या उदार धोरणानें धर्मयुद्ध कांहीं काळ तरी कसें तहकूब होऊन **जेरुसलेम** ही दोन्ही धर्मीयांची पवित्रभूमि दोन्ही धर्मांच्या यात्रेकरूंना खुली झाली याची चमत्कृतिजनक व अद्भुत हकीकत आली आहे.

चौथ्या लघुकथेंत इंग्लंडात प्रचलित असलेल्या स्त्रीदाक्षिण्यप्रधान सरदारी पद्धति ( Feudalism and Chivalry ) व मैदानी खेळाचे सामने ( Tournament ) यांचें सविस्तर वर्णन आलें आहे. ही कथाही तिसऱ्या कथेप्रमाणें अद्भुत व हृदयस्पर्शी प्रसंगांनीं भरलेली आहे.

८३० सदाशिव पेठ, पुणें २<br>विजयादशमी<br>ता. १८ ऑक्टोबर १९४२

गो. चि. भाटे

# प्रिन्सिपल भाटे यांचीं तीन नवीं पुस्तकें

२३ विभूतींस प्रणामांजलि, किंमत १ रुपया.
( जूनमध्यें प्रसिद्ध झालें )

२४ ऐतिहासिक लघुकथा-चतुष्टय, भाग १ ला,
किंमत १॥ रुपया.

२५ ऐतिहासिक लघुकथा-चतुष्टय, भाग २ रा,
किंमत १ रु. ६ आणे.
( स्कॉटच्या कादंबऱ्यांच्या आधारें. )

## प्रवासपर पुस्तकें

| | कि. रु. |
|---|---|
| १ उत्तर हिंदुस्थान | १॥ |
| २ अटकेपार प्रवास | १। |
| ३ काश्मीरवर्णन | १ |
| ४ सिंधवर्णन | १। |
| ५ पायगाडीचीं चक्करें | १। |
| ६ काशी-रामेश्वरयात्रा | १॥ |
| ७ विलायत यात्रा | १॥ |
| ८ युरोप यात्रा | १॥ |
| ९ लंकावर्णन | १॥ |
| १० केरलवर्णन | १ |
| ११ म्हैसूरवर्णन | ·।॥· |

## इतर पुस्तकें

| | कि. रु. |
|---|---|
| १२ कार्लाईल व हिंदु चालीरीती | १॥ |
| १३ History of Modern Marathi Literature | ८ |
| १४ Essays & Speeches | १॥ |
| १५ Isle of Nhava | ·।· |
| १६ स्कॉटचरित्र | ·॥· |
| १७ कँट व शंकर | १ |
| १८ ललितकलामीमांसा | १। |
| १९ तीन तत्त्वज्ञानी | ·।॥· |
| २० सज्जनगड व समर्थ रामदास | |
| २१ सह्याद्रीच्या खोऱ्यांत | |
| २२ उदार व औद्योगिक शिक्षण ह्यांची सांगड | |

माधव गोविंद भाटे, ८३० सदाशिव, पुणें शहर.

# अनुक्रमणिका



# लघुकथा-चतुष्टय

## भाग दुसरा

## क्विंटिन डरवर्ड

[ फ्रान्सच्या राजाच्या कारकीर्दीतील प्रसंगावर ]

इसवी सन १४६८ च्या सुमाराची लुई (अकरावा) राजाच्या कारकीर्दीतील गोष्ट. एका आल्हादकारक उन्हाळ्याच्या सकाळच्या शांत व शीतल वेळीं एक तरणाबांड पुरुष टोरेन प्रांतांतील टूर शहरानजीकच्या राजवाड्याच्या तटाला लागून वाहत जाणाऱ्या चेर नाल्याशीं आला. राजवाड्याच्या सभोंवार शिकारीकरितां राखून ठेवलेलें रान दिसत होतें. रानाभोंवतीं तटबंदी होती. त्याच्या मध्यभागीं जुना भुईकोट किल्ला होता. तो तरुण नाल्याच्या किनाऱ्याशीं येतो, तों नाल्यापलीकडे दोन इसम संभाषणांत गुंतलेले असून मधून मधून आपल्याकडे बारकाईनें पाहत आहेत असें त्यास दिसलें.

या तरुणाचें वय वीस-एकवीस वर्षांचें असावें. त्याचा चेहरा उमदा व मोहक होता. त्यानें अंगांत फ्लेमिश फॅशनचा पोशाख घातला होता; पण गरुड पक्ष्याच्या पिसानें युक्त नीलरंगाची स्कॉटिश टोपी त्यानें डोकीवर ठेविली होती तिच्यावरून, तो प्रवासी स्कॉटलंडचा रहिवासी असावा असें तत्काळ ओळखतां येत होतें. त्यानें पाठीवर सामानाची पिशवी बांधली होती. डाव्या हातांत पक्ष्यांची शिकार करतांना घालावयाचा हातमोजा होता आणि उजव्या हातांत भला मोठा सोटा होता. त्याच्या कमरपट्ट्यांत एक छोटें हत्यार लोंबत होतें.

तो तरुण नाल्याचे प्रवाहाशीं आला; व त्यानें पलीकडच्या इसमांना मोठ्यानें ओरडून विचारलें, "नाल्यांत पाणी फार खोल आहे काय?" पण

त्यांनीं उत्तर दिलें नाहीं. त्यांच्या मूकतेवरून नाल्यांत पाणी फार खोल नसावें असें समजून, त्या तरुणाने बूट, पायमोजे पायांतून काढून बिनदिक्कत पाण्यांत पाय टाकला. पण पाहतो तों पाणी खोल असून त्याला ओढ फार होती. तो पटाईत पोहणारा होता म्हणून ठीक झालें, नाहीं तर तो बुडून मेला असता. तो प्रवासी ओलाचिंब होऊन, नाल्याचे पलीकडे जाऊन, त्या इसमांना असभ्य वर्तणुकीबद्दल बोलणार तोंच, त्यांच्यांतला वडील इसम पुढें येऊन त्या प्रवाशास म्हणाला, "आम्हांला तुझी भाषा समजली नाहीं. पण आमच्या चुकीबद्दल तुला आम्ही उत्तम न्याहारी देतों." त्यानें आपल्या सोबत्यास जलदीनें पुढे जाऊन खाणावळवाल्यास न्याहारीची तयारी करण्यांस सांगितलें; त्याप्रमाणें तो पुढें झटकला. वाट चालत असतांना ते दोघे एकमेकांशीं बोलूं लागले. प्रथमतः त्यांनीं परस्परांचीं नांवे, गांवें व काम-धंदे याबद्दल विचारपूस केली. प्रवाशानें आपलें नांव **किंटिन डरवर्ड** आहे व आपले आई-बाप व इतर नातेवाईक लागोपाठ मेल्यामुळें आपल्या आईचा भाऊ **लुडोव्हिक लेस्ली** हा **लुई** राजाच्या प्रख्यात स्कॉटिश तिरंदाज पलटणींत अंमलदार आहे; त्याच्यामार्फत त्या पलटणींत चाकरी धरण्याकरितां मी इतक्या लांबचा प्रवास करून येथपर्यंत आलों आहे, अशी आपली हकीकत सांगितली. वडील इसमानें आपलें नांव **मेट्रिपेर** आहे असें सांगितलें व आपला धंदा काय असावा याचा तर्क करण्यांस **किंटिनला** सांगितलें. तो म्हणाला, "तुम्ही व्यापाऱ्यासारखे दिसतां." **मेट्रिपेर** म्हणाला, "होय, ही पहा माझी तुतीची वृक्षराई. मी रेशमाचा व इतर दुसऱ्या जिनसांचा व्यापार करतों."

अगदीं खुल्या दिलानें व निर्भीडपणानें **किंटिन** बोलत असल्यामुळें त्याचे-विषयीं **मेट्रिपेर**चा चांगला ग्रह झाला. बोलत बोलत ते वाड्याशीं येऊन मागल्या दारानें आंत शिरले. तेथें खाणावळीसारखी गडबड किंवा गर्दी दिसली नाहीं. जिकडे तिकडे शांतता होती. **मेट्रिपेरनें** आधीं व्यवस्था केल्यामुळें दिवाणखान्याच्या भिंतींतील कमानीखालच्या चुलाण्यांत जळजळीत विस्तव पेटविला होता. त्याजवळ बसून आपले कपडे वाळविण्यास **किंटिनला** सांगून **मेट्रिपेर** आंत गेला. परत येतो तों मेजावर न्याहारीचे सर्व पदार्थ व्यवस्थित-पणें ठेवण्यांत आले होते. **किंटिन** दीड दिवसाचा उपाशी असल्यामुळें, त्यानें न्याहारीच्या पदार्थांचा चांगलाच समाचार घेतला. तो मोठा भोक्ता भोजन-भाऊ आहे असें पाहून **मेट्रिपेर**ला त्याचें कौतुक वाटलें. न्याहारी आटोपल्या-

वर गोड सुका मेवा व उंची सौम्य दारू ( wine ) एका सुंदर चांदीच्या तबकांत घालून एक सोळासतरा वर्षांची देखणी मुलगी दिवाणखान्यांत आली. **किंटिन**नें त्या मुलीच्या चेहऱ्याकडे पाहिलें तों ती त्रासलेली व चिंताग्रस्त दिसली. म्हणून त्यानें तिच्या हातचें तबक आपल्या हातांत घेतलें. **मेट्रिपेर** कांहींशा रागाच्या स्वरानें म्हणाला, "**जाव्हेलाइन**, मीं तुला यायला सांगितलें नव्हतें. तुझी नातेवाईक बाई कां आली नाहीं? आमची सेवा करणें कमीपणाचें आहे असें तिला वाटतें काय?" **जाव्हेलाइन** नम्रपणें उत्तरली, "ती आजारी असल्यानें तिच्यानें येववेना म्हणून मी आलें." तिच्या मानेवर रुळणाऱ्या सोनेरी कुरळया केसांनीं सुंदर दिसणाऱ्या कपाळावर त्यानें अर्धवट रागानें व अर्धवट विनोदानें चापट मारून म्हटलें, "तूं अशी बाहेर येत जाऊं नको. हे गृहस्थ स्कॉटिश कुलीन घराण्यांतले आहेत. त्यांच्या हातून मेवा व दारू घेण्यास आम्हांला हरकत नाहीं." हें ऐकून तिनें **किंटिन**वर एक लाजरा नेत्रकटाक्ष टाकला व ती झटकन आंत निघून गेली. पण त्या एकाच नेत्रकटाक्षानें त्याचें मन प्रेमविद्ध झालें. ती गेल्यावर **किंटिन** व **मेट्रिपेर** यांनीं मेवा व दारू यांचें सेवन केलें. नंतर त्यानें आपल्या खिशांतून एक कातड्याची लांब पिशवी काढली व त्यांतील नाणीं पेल्यांत तो अर्धाअधिक भरेपर्यंत ओतलीं. मग तो **किंटिन**ला म्हणाला, "हा पेला घे; हा मीं तुला बक्षीस दिला आहे. तूं आतां येथेंच रहा. तुझा मामा–येथें त्याचें **बॅलॅफ्रे** नांव आहे–याला दोन प्रहरीं कामांतून मोकळा करून तुझ्याकडे पाठवूं. आम्हांला कामाकरितां गांवांत जावयाचें आहे." पैशानें भरलेला पेला घ्यावा किंवा नाहीं अशा बुचकळयांत **किंटिन** पडला असतां **मेट्रिपेर** झटकन निघून गेला.

त्याची उदार कृति, विलास मंदिरासारखी खाणावळ व सुंदर मुलगी या तिन्ही विलक्षण गोष्टींबद्दल **किंटिनला** आश्चर्य व चमत्कार वाटला. म्हणून त्यानें खाणावळवाल्याजवळ **मेट्रिपेर**बद्दल व बायांबद्दल चौकशी केली. पण त्यानें कांहीं एक खुलासा केला नाहीं. खाणावळींतील **सहनिवासी** ( Co-inmates ) म्हणून त्यांची भेट करवून देण्याबद्दल **किंटिन**नें त्यास विनंति केली. त्यानें रोख ठोक उत्तर दिलें कीं, **मेट्रिपेर**च्या परवानगीवांचून त्यांना कोणालाही भेटतां यावयाचें नाहीं.

याप्रमाणें त्याची निराशा झाली. मग त्यानें खाणावळवाल्यास आपली निजावसावयाची खोली दाखविण्यास सांगितलें. तदनुरूप त्यानें **किंटिन**ला

वाड्याच्या मागच्या चौकातील शृंगारलेल्या खोलीत नेलें व तो परत गेला. त्या खोलीला सुंदर सज्जा होता. त्यात येऊन पाहतो तों समोर तशीच खोली व सज्जा आहे असे त्यास दिसलें. तेथें त्या बाया राहत असाव्यात असा त्याने तर्क केला. इतक्यात मधुर ततुवाद्याच्या साथीवर गायिलेल्या गाण्याचा सुरेल व सुस्वर आवाज त्याच्या कानावर पडला. न्याहारीच्या वेळीं पाहिलेली तरुण मुलगी गात असावी असे वाटून तो सानंद आश्चर्यचकित झाला. तेवढ्यात खिडकीचें दार उघडले गेलें, व बुरखा घेतलेली मुलगी सज्जात येऊन समोर पाहू लागली. त्याची दृष्टादृष्ट होताच ती किंचित् लाजली, पण ती मंदस्मित करून झटकन् आत गेली. त्याच्यासारख्या सुंदर तरुणाचें मन त्या सुंदर तरुणीनें मोहित करावे व त्याच्या मनात प्रेमभावना जागृत व्हावी हे स्वाभाविक होतें. यामुळे त्याच्या मनात भावी वैभवाचे व सौख्याचे नाना मनस्तरंग उठत आहेत तोंच **लुडोव्हिक लेस्ली**—फ्रेंच नाव **बॅलॅफ्रे**—आल्याची वर्दी **क्विंटिन**ला मिळाली म्हणून तो खोलींत आला. त्याने आपल्या मामाचें स्वागत केले. मग दोघाचें त्याच्या आतेष्टाबद्दल बोलणे झालें. त्यात **क्विंटिन** म्हणाला, "घरची वडील मंडळी एका कौटुंबिक मारामारीत कामास आली, नंतर थोड्याच दिवसानी माझी आई—तुमची बहीण—वारली. म्हणून नशीब काढण्याकरिता इतक्या लांबचा प्रवास करून तुमच्याकडे आलों आहे." **बॅलॅफ्रे**नें त्याचे म्हणणें सहानुभूतिपूर्वक ऐकून म्हटलें, "आमच्या राजाच्या प्रख्यात तिरंदाज पलटणीत माझ्या हाताखालीं उमेदवार म्हणून राहून काहीं काळ काम केल्यावर तुला पलटणीत सामील केलें जाईल." तो उत्तरला, "**लुई** राजाच्या पलटणीच्यापेक्षा **बरगंडी**च्या ड्यूकच्या सैन्यांत पराक्रम गाजविण्यास जास्त संधि मिळते असे मीं ऐकले आहे. तेव्हा माझें एक मन सांगते की **बरगंडीस** जावे, पण पुन्हा मनात येतें की तेथें आपली दाद कशी लागेल." **बॅलॅफ्रे** म्हणाला, "आमचा स्वामी धोरणी व मुत्सद्दी असून त्याला माणसाची पारख फार चांगली आहे. तो योग्य माणसाला योग्य काम देऊन त्यात त्यानें कर्तबगारी दाखविली म्हणजे त्याला मर्जींत घेतो. तूं लवकर राजेसाहबाच्या मर्जींतला तिरंदाज होऊन ते तुला महत्त्वाची कामगिरी सांगतील. तेव्हा दुसरा-तिसरा विचार मनांत न आणतां तू उद्या आठ वाजतां किल्ल्याच्या खंदकाच्या पुलाशीं ये; व **बॅलॅफ्रे**कडे

जावयाचें आहे म्हणून सांग; म्हणजे तुला किल्ल्यांत सोडतील" असें सांगून **बॅलॅफ्रे** निघून गेला.

खोलींत परत जाण्याऐवजीं **क्विंटिन चेर** नाल्याच्या किनाऱ्याच्या निर्जन पाऊलवाटेनें सहल करण्यास निघाला. कांहीं वेळ चालल्यावर गळफासानें फांदीला बांधलेला माणूस त्याच्या दृष्टीस पडला. तो लटकलेला माणूस पुरा मेला नसून गळफास कापून टाकल्यास तो कदाचित् जिवंत होईल असें वाटल्यावरून, क्विंटिन आपलें हत्यार बाहेर काढून फांदीवर चढला व त्यानें फास तोडला. आणि जवळ उभ्या असलेल्या माणसांना त्या प्रेतप्राय देहाला खालून धरण्यास सांगितलें पण कोणीहि पुढें होईना. त्या लोकांच्या निर्दयपणाचें आश्चर्य करीत **क्विंटिन**नें त्या माणसाला वरून काढून जमिनीवर निजविलें. नंतर त्यानें त्याच्या शरीरांत प्राण आहे का याची बारकाईनें तपासणी केली. मेलेला माणूस **बोहेमियन** किंवा **जिप्सी** जातीचा होता. जवळ असलेलीं बायका-पोरें रडूं-आरडूं लागलीं; व **क्विंटिन**ला शिव्याशाप देऊं लागलीं. कांहींजणांनीं तें प्रेत खांद्यावर घेऊन आपल्या वस्तीकडे नेलें. इतक्यांत, सहासात स्वार दौडत तेथें आले. त्यांना पाहतांच तेथली **बोहेमियन** मंडळी पळून गेली; पण बिचाऱ्या **क्विंटिन**ला त्या स्वारांनीं पकडलें. ते त्याला दरडावून म्हणाले, "तूं राजद्रोही माणसास फासावरून सोडवून राजाचा कायदा मोडलास म्हणून तूंहि राजद्रोहाचा गुन्हा केलास." लगेच त्यांनीं **क्विंटिन**ला पकडलें व फासावर चढविण्याकरितां एका झाडाजवळ नेलें. आपल्या तेथल्या कायद्याच्या अज्ञानामुळें आपली चूक झाली; तरी निरपराधी म्हणून आपणास सोडावें, अशी **क्विंटिन**नें नम्रतेनें व काकुळतीनें विनंति केली. पण त्या फाशी देण्यास निर्ढावलेल्या क्रूर शिपायांस करुणा कोठून येणार? आपल्या जीवाकरितां धडपड करीत तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, "स्कॉटिश तिरंदाज-पलटणींतील अंमलदार **बॅलॅफ्रे** याचा मी भाचा असून त्याच्या हाताखालचा तिरंदाज आहे. मला हे स्वार विनाकारण फाशी देत आहेत." इतक्यांत, तेथें अकस्मात् आलेल्या एका स्कॉटिश तिरंदाजानें त्याची काकुळतीची वाणी ऐकली. तेव्हां त्यानें पुढें होऊन त्या स्वारांना दरडाविलें, "राजाच्या चाकरास व **बॅलॅफ्रे**च्या नातेवाइकास फाशी देऊं पाहत होता याचा जाब तुम्हांला द्यावा लागेल." याप्रमाणें **क्विंटिन**च्या मदतीस त्याच्या पलटणींतील तिरंदाज आल्यामुळें ते स्वार वरमले. मग अधिक स्वार आणण्या-

करितां व आपल्या मुख्याला वर्दी देण्याकरितां एक स्वार घोड्यावर बसून भरधाव कचेरीकडे गेला. इतक्यात, कांहीं तिरंदाजांसकट **बॅलॅफ्रे**च तेथें आला. त्यानें **किंटिन** हा आपला भाचा असून त्याला आपल्या हाताखालीं आजच घेतला आहे म्हणून ठासून सांगितलें. तेव्हां त्या स्वारांनीं त्याला नाइलाजास्तव सोडून दिलें. पण आपला मुख्य **प्रव्हास्ट मार्शल** याना वर्दी देण्याकरितां व झालेला प्रकार राजेसाहेबाच्या कानांवर घालण्याकरितां सर्व स्वार पहिल्याच्या मागोमाग कचेरीकडे गेले. ते पाहून **बॅलॅफ्रे** म्हणाला, " आपणहि आपल्या पलटणीच्या **क्राफर्ड** सेनापतीकडे जाऊन त्याच्यामार्फत आपलें गाऱ्हाणें राजेसाहेबांस कळविलें पाहिजे." मग **किंटिन**ला घेऊन तो किल्ल्यांतील आपल्या मकाणाकडे गेला. पण आधी त्यानें एका तिरंदाजाकडून आपला घोडा **किंटिन**ला देवविला. थोड्याच वेळांत ते किल्ल्याच्या खंदकाशीं आले; तेव्हां खंदकावर पूल ( draw-bridge ) टाकण्यांत आला व ते एका मागून एक किल्ल्यांत शिरून **लॉर्ड क्राफर्ड**च्या मकाणास आले. **बॅलॅफ्रे**ने आजच **किंटिन**ला तिरंदाजांच्या पलटणींत सामील करून घ्यावें अशी विनति केली. एक स्कॉटिश तरुण आपल्या पलटणींत येणार हे पाहून त्यांना आनंद झाला. त्यांनीं खुल्या कपाटांत असलेलें पलटणीचें रजिस्टर बुक बाहेर काढवून त्यांत **किंटिन**चें नाव उमेदवार तिरंदाजाच्या यादींत नोंदविलें व मग ते त्याला म्हणाले, " **बॅलॅफ्रे**च्या हाताखालीं तुला ठेवतो. आपलें काम हुशारीनें व दक्षतेनें करून स्कॉटिश नांव राख." पलटणींतील प्रथम प्रवेशानिमित्त **बॅलॅफ्रे**चा स्नेही **कनिंघम** यानें **किंटिन**च्या अभिनंदनार्थ त्या रात्रीं छोटीशी मेजवानी देण्याचें कबूल केलें. **अभीष्टार्थ मद्य**प्राशनाचे वेळीं ( toast time ) आपणहि हजर राहूं असें क्राफर्डसाहेब म्हणाले.

ठरल्याप्रमाणें रात्र झाल्यावर **कनिंघम**च्या मकाणांत मेजवानी झाली. खाणें संपवून मद्यपान सुरू होत आहे तोंच बोलल्याप्रमाणें **क्राफर्ड**साहेब मेजवानीच्या जागी आले. जमलेल्या तिरंदाजांनीं आपल्या सेनापतीचें हार्दिक स्वागत केलें. मग मद्यपान जोरानें सुरू झाले. सेनापतिसाहेबांना दारूनें बेहोष न करतां नुसतें बोलकें केलें. ते म्हणाले, " आतांच **बरगंडीच्या ड्यूक**कडून एक वकील आला आहे, हे तुम्हांला अजून कळलें नसेल." त्यांनीं आश्चर्यचकित होऊन विचारलें, " तो वकील कोण व आपल्या राजेसाहेबांकडे कशाला आला आहे ? " **क्राफर्ड**साहेब उत्तरले, " ड्यूकच्या

मर्जींतले मोठे मानकरी प्रख्यात **कौंट क्रेव्हेकूर** हे वकील म्हणून आले आहेत. त्यांच्या मागण्या मान्य करणें म्हणजे फ्रेंच महाराजांनीं आपली सार्वभौम सत्ता संपुष्टांत आणण्यासारखें आहे. तें आमचे महाराज कालत्रयींही कबूल करणार नाहींत. अर्थात्, **फ्रान्स** व **बरगंडी** यांच्यामध्यें लवकर लढाई सुरू होईल." तिरंदाजांना या बातमीनें आनंद वाटला. **किंटिन**लाही आपल्या पराक्रमास व कर्तबगारीस अवसर मिळणार म्हणून तिरंदाज-पलटणींत शिरल्याबद्दल आनंद झाला. नंतर सर्व मंडळी आपापल्या मकाणाला गेली. घरीं गेल्यावर **बॅलॅफ्रेनें** **किंटिन**ला तिरंदाजाचा पोशाख व हत्यारें-पात्यारें दिलीं. मग ते निजले.

सकाळीं किल्ल्यांतील घंटेनें घणघण आवाज केला. राजेसाहेब दरबारला येण्याची वेळ झाली म्हणून तिरंदाज व शिपाई लोक पोशाख करून व आपआपलीं हत्यारें नीट सावरून धरून क्रमानें दरबार हॉलच्या देवडीवर उभे राहिले. नव्या तिरंदाजाच्या पोशाखांत **किंटिन** उमदा तिरंदाज दिसूं लागला. **बॅलॅफ्रेनें** त्याच्याकडे नजर टाकली व त्याची ऐट पाहून तो खूष झाला. नंतर एकामागून एक दरबारी मंडळी आली. पण त्यांत नामांकित सरदार, प्रख्यात सेनापति, किंवा मोठे मुत्सद्दी कोणीच दिसले नाहींत. नाहीं म्हणायला युवराज, **ड्यूक ऑफ आरलियन्स**, राजाच्या दोन मुली, ॲव्हरचा **कार्डिनल ब्युलो** व राजाच्या अव्वल मर्जींतला **ऑलिव्हर** इतकीच मंडळी आलेली दिसली. **ऑलिव्हर** दरबार हॉलमध्यें डोकावून आंत गेला; लगेच राजाच्या खासगी महालाचें दार सताड उघडलें गेलें. **लुई** राजा साध्या शिकारी पोशाखांत दरबार हॉलमध्यें आला. सर्वांनीं त्यांना लवून सलाम केला.

सकाळीं **चेर** नाल्यावर भेटल्यापासून ज्याला आपण **मेट्रिपेर** नांवाचा रेशमाचा व्यापारी समजत होतों, ज्याच्याशीं उर्मटपणानें व बेपर्वानें बोललों व ज्यानें आपल्याला खाणावळ म्हणून किल्ल्याच्या मागल्या व स्वतःच्या खासगी भागांत नेऊन तेथें उत्तम न्याहारी दिली व नंतर तेथेंच राहण्यास सांगितलें तोच हा राजा होय हें त्यानें तत्क्षणीं ओळखलें व तो आश्चर्यचकित झाला. आपण राजाशीं अतिप्रसंग केला म्हणून त्याला फार वाईट वाटलें. **लुईनेंही** **किंटिन**ला ताबडतोब ओळखलें व तो थेट त्याच्याजवळ येऊन हळूच म्हणाला, "तुला तुझ्या अपराधाबद्दल क्षमा केली आहे" व **बॅलॅफ्रे**कडे वळून

**क्रिटिन**च्या जन्माची नक्की वेळ, वर्ष व तारीख यांचें टिपण करून तें **ऑलिव्हर डेन**कडे देण्यास त्यास फर्माविलें.

**लुई** राजाचा बेत आपली कुरूप मुलगी **जोअन** हिचें युवराज **ड्यूक ऑफ आरलियन्स**शीं लग्न लावून द्यावयाचा होता. म्हणून परस्परांनीं प्रेमानें वागून प्रियाराधन ( wooing ) करावें असें राजेसाहेबाना वाटे. त्याप्रमाणें करण्यास ते दोघांना भाग पाडीत असत.

हा नित्याचा औपचारिक दरबार संपल्यावर राजेसाहेबांनीं सर्वांस डुकराची शिकार करण्याकरितां घोड्यावर स्वार होऊन सज्ज होण्यास सांगितलें. तोंच दरबारचा सरदार **कौंट दि नॉइस** राजाजवळ येऊन म्हणाला, " मला आपल्याला थांबवून कळविलें पाहिजे की, **बरगंडीच्या ड्यूक**चा वकील किल्ल्याच्या दरवाजापाशीं उभा आहे. आतांच्या आतां राजेसाहेबांची भेट झाली पाहिजे असें तो म्हणत आहे." **लुई** राजा रागावल्यासारखा दिसला. पण त्याचे मनांतून त्या वकिलास रागावलेला परत पाठवावयाचा नव्हता. म्हणून त्यानें शिकारीचा बेत रहित करून वकिलास बोलावून आणण्यास सांगितलें.

**बरगंडी**चा वकील सोम्या गोम्या नव्हता; तो **चार्लस ड्यूक**च्या दरबारचा पहिल्या प्रतीचा सरदार व त्यांच्या अत्यंत मर्जीतला **कौंट दि क्रेव्हेकुर** नांवाचा मानकरी होता. तो मोठ्या लवाजम्यानिशीं व हत्यारबंद पोशाखांत आला होता. आपला लवाजमा जरा मागे ठेवून तो राजापुढे येऊन उभा राहिला. मग त्यानें आपलें मुखत्यारपत्र ( credentials ) राजापुढे टाकलें. **लुई** राजाने त्याचें स्वागत केलें व त्याच्यासारख्या प्रख्यात सेनापतीस व **ड्यूक**साहेबांच्या मुख्य मंत्र्यास वकिलाचें औपचारिक मुखत्यारपत्र नको असें म्हटलें. औपचारिक विचारपूस झाल्यावर राजेसाहेबांनीं वकिलांचें येणें कां झालें म्हणून विचारलें. त्यांनीं उत्तर दिलें, " तुमचे अधिकारी आमच्या मुलखांत येऊन आमच्या प्रजेचा छळ करतात. दुसरे, तुमच्या वतीचे लोक आमच्या **फ्लँडर्स** प्रांतांतील **फ्रँकफुर्ट, लीज** व **नेमूर** या शहरांमध्यें जाऊन तेथें आमच्याबद्दल खोट्यानाट्या गोष्टी सांगून, तेथील लोकांचीं मने आमच्याविषयीं कलुषित करतात; शेवटीं अत्यंत संतापजनक गाऱ्हाणे म्हणजे ज्यांच्या पालनपोषणाची सर्व जबाबदारी आमच्या **ड्यूक**साहेबांवर आहे, त्या आमच्या सरदार घराण्यांतील अज्ञान मुलगी **कौंटेस इझाबेला** व तिची

नातेवाईक स्त्री **कौंटेस हॅमेलाइन** यांना राजेसाहेबांनीं पळवून आणून येथल्या किल्ल्यांत ठेवून व त्यांच्या गुप्त भेटीगाठी घेऊन ते त्यांचीं मनें **ड्यूक-साहेबांविरुद्ध** कलुषित करीत आहेत. हीं गाऱ्हाणीं ताबडतोब दूर करावीं व विशेषतः त्या बायांना तत्क्षणीं **बरगंडीस** पाठवून द्यावें. याप्रमाणें तात्काळ तजवीज न झाल्यास **ड्यूकसाहेब** फ्रेंच सम्राटाची नांवाची मांडलिकी झुगारून देऊन स्वतंत्र राजे म्हणून फ्रान्सबरोबर लढाई पुकारतील."

हें उद्दाम व उपमर्दकारक भाषण ऐकून **लुई** राजा मनांतल्या मनांत खूप रागावला; पण सध्यां आपल्या देशाला शांततेची व व्यवस्थित कारभाराची फार जरूरी आहे हें जाणून त्यानें आपला राग बाहेर दाखविला नाहीं; उलट शांतपणें व धीमेपणें त्यानें वकिलास म्हटलें, "बेभरंवशी, बेजाबदार, व चहाडखोर लोकांच्या बातम्यांवर विश्वास ठेवून गंभीर व भयंकर स्वरूपाचे आरोप एका मांडलिकानें आपल्या सार्वभौम राजाविरुद्ध करावें ही खेदाची व आश्चर्याची गोष्ट आहे. कांहीं किरकोळ आरोप खरेहि असतील पण, त्या-करितां येवढें अकांडतांडव करण्याचें कारण नव्हतें. दोन्ही बाजूच्या वकिलांनीं एकत्र येऊन, चौकशी करून, दोन्ही सरकारांच्या संमतीनें त्याचा निकाल केला असता."

या उत्तरानें **कौंट दि क्रेव्हेकूरचें** मुळींच समाधान झालें नाहीं. ते म्हणाले, "असलें उडवाउडवीचें उत्तर राजेसाहेबांकडून मिळणार हें जाणून माझ्या मालकांनीं निर्वाणीचा निरोप सांगण्यास मला आज्ञा केली आहे. ज्या अर्थी राजेसाहेब आमचीं गाऱ्हाणीं दूर करण्यास तयार नाहींत, त्या अर्थी माझे स्वामी फ्रेंच सार्वभौमाचें मांडलिकत्व झुगारून **बरगंडी** व **फ्रान्स** या देशांमध्यें वैरभाव उत्पन्न झाला असून त्याचा युद्धानें शेवट होईल अशी घोषणा माझ्या मुखानें करीत आहेत." असें मोठ्या आवेशानें म्हणून त्यांनीं आपला हातमोजा दिवाणखान्याच्या गालिचावर फेकला व राजेसाहेबांचा निरोप न घेतां तेथून ते एकदम निघून गेले. दरबारचे सरदार, सेनापति, व राजाच्या खास सैनातींतील मंडळी वकीलसाहेबांस धरण्याकरितां पुढें जाऊं लागली; तोंच मेघगर्जनेसारख्या प्रचंड पहाडी आवाजानें **लुई** राजे ओरडले. "कोणाही वकील म्हणून आलेल्या माणसावर हात टाकणें गैर व राजनीति-नियमांविरुद्ध आहे." या भाषणानें जिकडे तिकडे निस्तब्ध झालें. **लुईनें**

आपल्याजवळच्या सरदाराकडे पाहून **ॲव्हर**च्या बिशप बॅल्ह्ला जवळ बोलावून म्हटलें, "तो हातमोजा घेऊन कौंटच्या मागें जाऊन त्यांना कसेंही करून परत बोलवा. तुमच्या पेशाला हें शांतता प्रस्थापनेचे काम योग्य आहे; व तें तुम्हीच करू जाणे. आम्ही ठरल्याप्रमाणें डुकराच्या शिकारीस जातों." राजाची आज्ञा मग काय उशीर! **बिशप** घोड्यावर बसून **कौंट**च्या मागें धावले. बाकीची दरबारी मंडळी त्यांच्या उद्दामपणाबद्दल ताबडतोब सूड घेण्यास उत्सुक दिसली. पण राजेसाहेब शांतपणें म्हणाले, "आपल्या देशाला शांततेची जरूरी आहे म्हणून या वेळीं आपण नमतें घेणें रास्त आहे."

इतक्यांत **बिशप**साहेब आनंदित मुद्रेने परत आले व **कौंट**साहेब मोठ्या शिकस्तीनें चोवीस तास थांबण्यास तयार आहेत असें त्याने **लुई** राजास सांगितलें.

चोवीस तासांत इकडचें जग तिकडे करतां येईल असें मनांत म्हणत राजेसाहेबांनीं पुन्हा शिकारीचें शिंग फुंकलें. सर्व दरबारी मंडळी शिकारीकरितां शिकारी रानांत शिरली. आपण मोठी कामागिरी केली या घमेंडीत **बिशप** राजाबरोबर चालूं लागले; व त्यांनीं **कौंट**ची आपण किती कौशल्यानें समजूत घातली म्हणून ऐटीनें सांगितलें; व मग त्यांनीं **कौंटेस ऑफ फ्रॉये**बद्दल राजेसाहेबांस विचारलें. राजे मनांत किंचित् नाखूष झाले; व त्यानीं शिकारींत **बिशप**ची फजिती करायचा बेत करून डुकराचा जोराने पाठलाग केला. **बिशप**ला राजाबरोबर आपला घोडा चालवितां येईना. शिवाय, फाजील चाबूक मारण्यानें घोडा चवताळला व त्यानें **बिशप**साहेबांना खाली पाडलें. राजानीं किंचित् हास्य करून त्यांना दुसरा गरीब घोडा देवविला. पण मग त्यांनीं राजाबरोबर चालण्याचा नाद सोडला.

इतक्यांत शिकारी कुत्रे डुकरांच्या पाठीस लागून त्यांनीं डुकरांची धांदल उडवून दिली. ती शिकार आपण करणार म्हणून **लुईनें** आपला घोडा तिकडे भरधांव फेकला; व डुकर टप्यांत येतांच भाल्याची फेक केली. पण भाला डुकराला जबर जखम करण्याइतक्या जोरानें लागला नाहीं. कारण, राजाचा घोडा ऐनवेळीं बिचकून मागें सरला. तेव्हां घोड्यावरून उडी टाकून पायानें धावत जाऊन राजेसाहेबांनीं त्या प्रचंड प्राण्यावर जोराचा हल्ला केला. पण, तरवारीचा वार डुकराच्या केसांत शिरला व निसरड्या जमिनीमुळें राजांचा पाय

घसरून राजेसाहेब सपशेल उताणे पडले. पण त्यामुळें डुकराची उडी त्यांच्या पुढें पडली. डुकर मागें वळून राजाचा प्राण घेणार तोंच **किंटिन** घोड्यावरून भरधांव तेथें आला व राजाच्या जीवावर बेतलें आहे असें पाहून त्यानें आपल्या भाल्यानें डुकराला जमिनीवर दाबून धरलें; तोंच राजेसाहेब उठले व त्यांनीं तरवारीनें डुकराची मान धडापासून वेगळी केली. आपला जीव वांचविणारा **किंटिन** आहे हें पाहून **लुई** राजांनीं त्याला शाबासकी दिली व मोठी देणगी देऊं केली. मग दोघेही घोड्यावर स्वार झाले व राजांनीं आपलें शिकारी शिंग फुंकलें. सर्व शिकारी तेथें जमले व राजांनीं मारलेला तो प्रचंड डुकर पाहून सर्व लोक चकित झाले. प्रत्यक्ष घडलेली गोष्ट षट्कर्णी न करण्याबद्दल **किंटिन**ला बजावून राजा मंडळीसह किल्ल्यांत परत आला.

शिकारीच्या धांदलींत विस्कळलेला पोषाख व घामानें थबथबलेला चेहरा साफसूफ करून **किंटिन** आपल्या कामाला तयार होतो न होतो तोंच त्याला महत्त्वाच्या पहाऱ्याच्या कामावर पहारेकरी म्हणून राजेसाहेबांनीं पसंत केला आहे असें त्याच्या खोलींत येऊन **ऑलिव्हर डेन**नें त्याला सांगितलें व बंदूक घेऊन आपल्या मागोमाग येण्यास फर्माविलें. ते दोघेजण किती तरी खोल्यांतून, गुप्त दरवाजांतून, व जिने चढून एकदांचे साधारण शृंगारलेल्या दिवाणखान्याशीं आले. “ येथें तुला बंदूक भरून सक्त पहारा करावयाचा आहे. कोणावर व कशा तऱ्हेनें करावयाचा हें लवकरच कळेल.” असें म्हणून **ऑलिव्हर** निघून गेला. **किंटिन** सकाळपासून उपाशी होता. कारण, शिकारीच्या श्रमानंतर त्याला भोजन मिळालें नव्हतें. श्रम व भूक यांनीं त्याला क्षणभर झोपेची डुलकी आली. इतक्यांत, एका गुप्त व अज्ञात दरवाजानें **लुई**राजे दिवाणखान्यांत आले व त्यांनीं डुलकी घेत असलेल्या **किंटिन**च्या हातून त्याची बंदूक घेतली; व त्याला चेष्टेनें म्हटलें, “ असाच का तूं पहारा करणार ? ” तो खडबडून उठला व त्यानें बंदूक घेणारा कोण हें न पाहतां आधीं आपली बंदूक परत घेऊन तो पहारेकऱ्याच्या पद्धतीप्रमाणें खांद्यावर बंदूक टाकून उभा राहिला; व निरखून पाहतो तों बंदूक घेणारे राजसाहेब होते. तो फार खजील झाला व झालेल्या अपराधाबद्दल त्यानें राजांची क्षमा मागितली; तसेंच आदल्या दिवशीच्या उद्धट वर्तनाबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. राजानें **किंटिन**चें कौतुक करून म्हटलें, “ ज्यानें माझा जीव वांचविला त्याच्या अपराधाची आधींच क्षमा केली आहे. सकाळपासून तूं जेवला नाहींस काय

असें राजानें त्यास विचारलें. त्यानें नकारात्मक उत्तर दिले. राजा उद्गारला "या तरुणाची वाघासारखी भूक मला ठाऊक आहे. कामाच्या चुकारपणाने नव्हे, तर उपासमारीनें बिचाऱ्याला डुलकी आली. आणखी किती तास तूं अन्नांवाचून राहशील?" तो उत्तरला, "आणखी चोवीस तास!" राजानें मग तो दिवाणखाना बारकाईनें तपासला; व जेथून **किंटिन** कोणास दिसूं नये, पण त्याला मात्र दिवाणखान्यांत काय चालले आहे तें दिसावें व ऐकूं यावें, तेथें हालचाल किंवा हुं कीं चूं न करतां त्याने बसावें; व आपण 'स्कॉटलंड पुढे चल' असे शब्द उच्चारल्याबरोबर **कौंट क्रेव्हेकूर** यांजवर गोळी झाडावी असा **किंटिन**ला हुकूम केला.

याप्रमाणें गुप्त तयारी झाल्यावर मेजावर तीन ताटें मांडून उच्च दर्जाचे खाण्यापिण्याचे पदार्थ चांदीच्या पालांत आणून ठेवण्यांत आले. थोड्याच वेळांत **कौंट क्रेव्हेकूर, बिशप बॅलू,** व राजेसाहेब असे तिघेजण एकदम दिवाणखान्यांत आले; व लगेच भोजनास बसले. जेवणास तब्बल दीड तास लागला. **लुई** राजाने **कौंट**ची खूप स्तुती केली व शेवटीं त्याला **शँपेन** दारूचा पेला व आपण **बरगंडी** दारूचा पेला घेतला. या दारू पिण्याप्रमाणें आपल्या दोन्ही देशामध्यें मैत्री असावी अशी इच्छा प्रदर्शित करून या प्रसंगाची खूण म्हणून चांदीचा पेला **कौंट**ला नजर केला. नंतर परस्परांना नमस्कार करून **बिशप** व **कौंट** दिवाणखान्याबाहेर गेले. मग **लुई किंटिन**-कडे येऊन म्हणाला, "अजून तुझा पहारा संपला नाहीं. पण आधीं तूं या मेजावरील पदार्थ खाऊन आपली दांडगी भूक भागव." तदनुरूप त्यानें त्या स्वादिष्ट पदार्थांचा चांगला समाचार घेतला; व वर उंची मद्याचा पेला झोकला; इतक्यात, **लुई** परत आला व त्यानें **किंटिन**ला एका दिवाणखान्याचे तोंडाशीं उभे केलें व म्हटलें, "कांहीं बाया व **ऑलिव्हर** किंवा मी याखेरीज या संध्याकाळीं दुसरा कोणी येथें आल्यास त्याच्यावर बेलाशक गोळी घाल. त्या बायांनीं तुला प्रश्न विचारलाच तर मोजके उत्तर दे. तूं त्यांच्याशीं संभाषण करूं नको. पण त्या काय बोलतात व काय करतात हें ऐकून व पाहून इत्थंभूत हकीकत मला सांग." नंतर तो एका गुप्त दारानें बाहेर गेला.

थोड्याच वेळांत राजाची कुरूप मुलगी **जोअन, कौंटेस हॅमेलाइन,** व **कौंटेस इझाबेला** या आल्या. त्या तिघींचें औपचारिक भाषण चालू असतां **ड्यूक ऑफ आरलियन्स** (युवराज व **लुई**चा भावी जावई) आंत येऊं

लागला. पण त्याला **किंटिन**नें अडविलें. पण कोण पहारेकरी युवराजाला वचकणार नाहीं ! युवराजानें औपचारिक रीतीनें राजकुमारी **जोअन** इजला नमस्कार केला. पण त्याचें मन तरुण व सुंदर **इझाबेला**कडे आकर्षिलें गेलें; व तो तिच्याशीं बोलून तिच्या सौंदर्याची स्तुती करूं लागला; याबद्दल राजकुमारीस वैषम्य वाटलें; व तिला एकदम घेरी आल्यासारखें झालें. तिच्या मोलकरणीला बोलावून तिला सावध करतात इतक्यांत, **लुई** राजा दिवाणखान्यांत येऊन रागानें सर्वांकडे पाहूं लागला; व विशेषतः **किंटिन**वर त्याचा विशेष रोष झाल्यासारखें दिसलें. राजानें नाखुषीच्या मुद्रेनें युवराजाकडे पाहिलें व आपल्या भावी पत्नीस हातांत घेऊन आपआपल्या खोल्यांत जाण्यास सांगितलें. मग तो त्या बायांकडे व **किंटिन**कडे वळला. त्याला तर तो म्हणाला, " तुझ्या अपराधाबद्दल तुला मरणाची शिक्षा योग्य आहे; तरी पण तुला पुन्हा एकदां क्षमा करतों; व तुझ्या शौर्यावर व धूर्ततेवर विश्वासून तुला एका नाजूक व भयप्रद कामावर पाठवितों. तरी आतां आपल्या खोलींत जाऊन तयारीला लाग. रात्रीच्या बाराच्या ठोक्याबरोबर किल्ल्यांतून बाहेर पडून तुला मार्गाला लागावयाचें आहे. चार शिपाई व एक मार्गदर्शक तुझ्याबरोबर येतील." नंतर या बायांचें काय करावयाचें याबद्दल राजेसाहेबांचें **ऑलिव्हर**जवळ बोलणें झालें. त्यांत असें ठरलें कीं, त्यांना **लीज**च्या **बिशप**कडे पाठवाव्या व त्याबद्दलची बातमी **विलियम दि ला मार्क** याला कळेल अशी तजवीज करावी; म्हणजे तो **लीज**वर हल्ला करून, **इझाबेला**ला पकडून तिच्याशीं लग्न लावील. या योगें **बरगंडी**च्या हृदयांत जरी नसला तरी त्याच्या हृदयानजीक भयंकर कांटा ठेवल्यासारखें होईल." याप्रमाणें करण्याचें ठरून ते दोघे आपआपल्या विश्रांतिस्थानीं गेले.

ठरल्याप्रमाणें बरोबर बारा वाजतां तीन बाया ( दोन **कौंटेस** व एक विश्वासू मोलकरीण ) बुरखे घेऊन बाहेर आल्या. त्यांना घोड्यावर बसविण्यांत आलें. **किंटिन**करितां एक उमदा व मजबूत घोडा आणविला होता. त्यानें आपलीं सर्व हत्यारें अंगावर घालून तो घोड्यावर बसला. नंतर ती आठ-नऊ लोकांची टोळी मार्गाला लागली.

पण ही मंडळी कांहीं मैल चालली नाहीं तोंच दोघे घोडेस्वार भरधांव तिचा पाठलाग करीत आले. त्यानीं **किंटिन**ला आपली कामगिरी सोडून देण्यास फर्माविलें व " आम्ही त्या बायांचें संरक्षण करूं व त्यांना सुरक्षित

ठिकाणीं पोंचवूं" असें म्हटलें. **क्विंटिन**सारखा शूर वीर शिपाई असल्या धमकावणीला भिणारा नव्हता. त्याने खाडदिशी उत्तर दिलें, "तुम्हीं माझ्याशीं लढून मला चीत करून मग काय पाहिजे तें करा." आपल्यापैकी एका शिपायास बरोबर घेऊन **क्विंटिन** त्या दोघां घोडेस्वारासमोर उभा ठाकला. त्यापैकी एकानें शिपायावर नेम धरून आपला भाला त्याच्या डोळ्यांतून डोक्यांत भोसकला. बिचारा शिपाई तत्काळ मरण पावून खालीं पडला. **क्विंटिनने** दुसऱ्या घोडेस्वाराशी लगट करून त्याला घोड्यावरून खालीं पाडले. त्याचें शिरस्त्राण वर करून आपल्यावर विनाकारण हल्ला करणारा कोण हे तो पाहत आहे तोंच दहा-वीस घोडेस्वार तेथें आले व त्यांनीं लढणाऱ्या लोकांना थांबण्याचा हुकूम केला. त्या घोडेस्वाराचा मुख्य **लॉर्ड क्राफर्ड** होता.

बायाचा पाठलाग करणारे दुसरे तिसरे कोणी नसून, युवराज **ड्यूक ऑफ ऑरलियन्स** व प्रख्यात **कौंट दि नॉइस** हे होते. **लॉर्ड क्राफर्ड**नें त्या दोघाना कैदी म्हणून आपल्याबरोबर येण्यास व **क्विंटिन**ला पुढें जाण्यास सांगितले. त्याप्रमाणें ती मंडळी पुढे जाण्यास निघाली; पण **क्विंटिन**च्या डोक्यास जखम झाली असून त्यांतून रक्त गळत आहे असें तो **इझाबेला**-जवळ गेला असतां तिच्या लक्षांत आलें. तिनें त्याला घोडयावरून खालीं उतरविले; व आपल्या हातानें त्याची जखम धुऊन, त्यावर कांहीं तरी मलम लावून, आपल्या स्वतःच्या हात-रुमालानें त्याची जखम बांधली व मग ती मंडळी पुढे चालू झाली. पण आतां मार्गदर्शकाची अडचण उत्पन्न झाली. इतक्यांत दुसरा मार्गदर्शक आला. त्याचे नाव **हायराडिन** होतें. पुनः त्यांचा पुढचा प्रवास सुरू झाला.

**क्विंटिन**ला या मार्गदर्शकाच्या विश्वासूपणाबद्दल सशय वाटत असल्यामुळें तो त्याच्या हालचालीवर बारकाईनें नजर ठेवून ठरलेल्या मार्गानें चालला होता.

निघाल्यापासून बारावे दिवशीं **फ्लँडर्स** प्रांतामधील **नेमूर** शहराच्या अली-कडील एका मठात तो उतरला. **लुई** राजानें बायांचा मार्ग हमरस्त्यावरील शहरें टाकून मुद्दाम आडमार्गानें ठरविला होता; व विश्रांतीकरितां व रात्रीच्या वस्तीकरितां बहुधा मठांचीं ठिकाणें पसंत केलीं होतीं.

वर सांगितल्याप्रमाणें बाराव्या दिवसाच्या मुक्कामाकरितां ते एका मठांत उतरले. त्या मठाचा मुख्य भिक्षु ( Monk ) फार वृद्ध व धर्मशील होता. **हायराडिन** जिप्सी जातीचा आहे असें समजल्यावर तो भिक्षु त्याला मठांत राहूं देईना. पण **क्विंटिन**नें मोठ्या मिनतवारीनें त्याला मठाच्या आवारांत जागा देवविली. भिक्षूनं **क्विंटिन**ला पुष्कळ भीतिदायक माहिती सांगितली. विशेषतः **लीज** शहरांतील लोक **बरगंडी**च्या **ड्यूक**वर बिथरलेले असून त्यांना **विलियम दि ला मार्क** याची मदत आहे; अशा बलाढ्य शत्रूच्या फौजेच्या मानानें **लीज**च्या **बिशप**ची फौज फारच थोडी असल्यानें त्याचा निभाव लागणें कठीण आहे; व म्हणून येथें या बायांना खरोखरी सुरक्षितता कितपत मिळेल याची वानवा आहे. अशा प्रकारची काळजी करण्यासारखी हकीकत **क्विंटिन**ला भिक्षूनें सांगितली; व बरीच रात्र झाल्यावर तो झोपावयास गेला. पण ती हकीकत ऐकल्यामुळें **क्विंटिन**ला झोप येईना; म्हणून तो हलक्या पावलानें मठाबाहेर पडला; तोंच **हायराडिन**ही बाहेर चालला आहे असें त्याला दिसलें. तेव्हां लपतछपत तो **हायराडिन**च्या मागोमाग चालला. थोड्याच वेळांत समोरून एक इसम त्याच्याजवळ आला. मग ते दोघे एका झाडाखालीं बसले. **क्विंटिन** हूं कीं चूं न करतां व पावलें न वाजवितां त्या झाडाच्या खांदीवर लपून बसला. **हायराडिन** म्हणाला, " आपण या मंडळींना **श्री किंग्स क्रॉस**पर्यंत **मेझ** नदीच्या उजव्या बाजूनें नेऊं. तेथें **ला मार्क**च्या लोकांनीं बायांना ताब्यांत घ्यावें. मात्र **क्विंटिन**च्या केसालाही धक्का लावतां कामा नये." असें ठरल्यावर **हायराडिन** मठाकडे परत आला. अर्थात् **लुई** राजाचा सगळा कट **क्विंटिन**च्या ध्यानांत आला. पण, या बायांना **लीज**ला सुखरूप पोंहोचविण्याची कामगिरी आपण पार पाडूं. मात्र त्याकरितां **श्री किंग्स क्रॉस**चा मार्ग बदलून **मेझ** नदीच्या डाव्या बाजूनें गेलें पाहिजे. मार्ग बदलल्याबद्दलचा जाब **लुई** राजाला सकारण देतां येईल, अशा प्रकारचा मनाशीं विचार करून तो मठांत परत आला; व सकाळपर्यंत स्वस्थ झोपला. सकाळीं निघतांना त्यानें बायांना विचारलें, " **मेझ** नदीच्या उजव्या बाजूस **नेमूर** शहराच्या आसपास कांहीं बंडाळी उद्भवली असून **चार्ल्स ड्यूक**च्या शिपायांची तुकडी तिकडे आली आहे अशी खात्रीलायक माहिती मला मिळाली आहे. म्हणून तें शहर टाळून **मेझ** नदीच्या डाव्या बाजूनें पण सुरक्षित मार्गानें **लीज**ला जावयाचें मीं ठरविलें आहे. तेव्हां

या वाटबदलीबद्दल आपली अनुमति आहे ना?" त्यांनी मोठ्या आनदाने त्याच्या बेताला अनुमति दिली. **हायराडिन**नें मार्ग बदलण्याला फारसें आढेवेढे घेतले नाहीत. मग या नव्या मार्गानें ते **लीज**ला निर्विघ्नपणें येऊन पोंहोचले. **बिशप**साहेब शहराबाहेरील एका मैलावर असलेल्या आपल्या मजबूत किल्ल्यांत राहत होते. या मंडळींचें त्यांनीं मनःपूर्वक स्वागत केलें. बाया **बिशप**च्या बहिणीकडे गेल्या; व **किंटिन**ला **बिशप**च्या खोल्या-नजीकची चांगली खोली राहण्यास देण्यांत आली. **हायराडिन**ही हलक्या नोकरवर्गात जाऊन मिसळला. येथें त्याच्याबद्दल कोणी तक्रार केली नाहीं.

याप्रमाणें आपल्या शौर्यानें, धूर्ततेनें व प्रसंगावधानानें बायांना नेमल्या ठिकाणीं सुरक्षित पोंहोचविण्याची कामगिरी केल्याबद्दल **किंटिन**ला समाधान वाटलें. अशा आनंदमय मनःस्थितींत तो **लीज** शहर पाहण्यास बाहेर पडला; पण तो जरासा पुढें जातो तों मोठमोठ्या आरोळ्या, आरडाओरड, माणसांची गर्दी व गडबड त्याला ऐकूं आली. तेव्हां **हायराडिन**च्या म्हणण्याच्या सत्यतेची त्याला खात्री पटली. आपल्याकडे कांहीं शहरवासीय चमत्कारिक चेहऱ्यानें पाहत आहेत, तर कांहीं आनंदानें बघत आहेत असें **किंटिन**च्या ध्यानांत आलें. एक चांगला पोशाख केलेला नागरिक **किंटिन**चा स्कॉटिश तिरंदाजाचा पोशाख व विशिष्ट खूण ओळखून आनंदानें ओरडला. "**लीजकरां**चा विजय असो. फ्रान्सच्या **लुई** राजाकडून आपल्याला व **विलियम ला मार्क**ला मदत करण्याकरितां लष्कर येत आहे, व हा तिरंदाज त्यानीं पुढें पाठविला आहे." एकदां अशी हूल उठल्याबरोबर नागरिकांच्या झुंडीच्या झुंडी **किंटिन**च्या सभोंवतीं जमल्या व त्यानें **लुई** राजाचा संदेश लोकांना सांगावा म्हणून त्याला त्या झुंडींतील लोक बळजबरीनें नगराच्या सभागृहाकडे घेऊन चालले. अशा कठीण प्रसंगीं त्याला दोन सभ्य व्यापारी भेटले. ते दोघेही नगरसभेचे सभासद होते. त्यांचीं नांवें **रासलर** व **पॅव्हिलॉन** हीं होतीं. "आपल्याला या प्रसंगांतून सोडवून **लीज**च्या **बिशप**च्या किल्ल्यांत पोंचवावें अशी **किंटिन**नें त्यांना विनंति केली. त्यांनीं जमलेल्या मंडळींस सांगितलें कीं **लुई** राजानें आमच्या-कडे आपला तिरंदाज पाठविला आहे, तरी त्याला आमच्या घरीं नेऊन मग सभागृहाकडे आणतों." हें ऐकून लोक दुसरीकडे गेले; व हे त्रिवर्ग **पॅव्हिलॉन**च्या प्रशस्त वाड्यांत आले. त्या वाड्यामागें मोठी बाग असून त्याला

लागून **मेझ** नदी वाहत होती; व तेथें एक होडी होती. **पॅव्हिलॉनचा** वाडा' त्यांतील उंची व बहुमोल सामानसुमान व एकंदर वाड्याचा सुंदर देखावा पाहून हा राजवाडाच आहे असें **क्विंटिनला** वाटलें व या शहरांतले व्यापारी भारी श्रीमंत असले पाहिजेत असा त्यानें तर्क केला. **पॅव्हिलॉननें** त्याची आपल्या **गरट्रूड** नांवाच्या मुलीशीं ओळख करून दिली. तिनें त्याला स्वादिष्ट सुका मेवा व उत्तम मद्य आणून दिलें. त्याचा स्वीकार करून व त्यांचे आभार मानून तो होडीमधून नदीमार्गानें **बिशपच्या** किल्ल्याच्या नजीक येऊन तेथें उतरला व मागल्या दारानें आंत शिरला तेव्हां रात्रीच्या भोजनाला मंडळी बसली होती. त्याच्याकरितां राखून ठेवलेल्या जागेवर तो जाऊन बसला व त्यानें लगेच जेवणास सुरुवात केली. शहरांत काय घडलें म्हणून मंडळीनें त्याला विचारलें. त्यानें कोणाचें नांव न घेतां "**लीज** शहर बंड वाल्यांच्या व **विलिमय दि ला मार्कच्या** ताब्यांत गेलें असून त्यांचा रोख किल्ल्यावर हल्ला करण्याचा असावा" असा इशारा मंडळींस दिला. एका भिक्षूनें (Monk) सांगितलें कीं बाया येथून जास्त सुरक्षित ठिकाणीं तावडतोब जाण्यास तयार आहेत व त्यांनीं **लुई** राजाला एका निरोप्याबरोबर पत्र देऊन त्याला आतांच बाहेर पाठविलें आहे." हें ऐकून रात्र झाली असतांना सुद्धां त्या बायांना भेटण्याकरितां **क्विंटिन** त्यांच्या निवासस्थानाकडे गेला. तो त्यांच्या खोलीशीं येतो तों खिडकी एकदम उघडली गेली व एक चिठी बाहेर फुलझाडावर हळूच टाकण्यांत आली व खिडकी लगेच बंद झाली. त्यानें विस्मित मुद्रेनें पण प्रमुदित मनानें ती चिठी घेऊन तिचें चुंबन घेतलें व मग ती वाचून पाहिली. त्यांत "**क्विंटिनची** प्रेमयाचना करून आपण त्याच्याशीं लग्न करण्यास तयार आहों; व त्यानें दुसरे दिवशीं मागच्या दारीं आमची वाट पाहत राहावें म्हणजे आम्ही आपल्याबरोबर येऊं." अशा अर्थाच्या चिठीच्या खरेपणाची खूण म्हणून एक रत्नाची अंगठी चिठीच्या पाकिटांत ठेविली होती. ती त्यानें घेतली व आपलें दैव खरोखरीच उघडलें म्हणून त्याला विलक्षण आनंद झाला. तो आपल्या खोलींत परत आला व त्या चिठीचें सारखें चुंबन घेत तिचें पारायण करूं लागला.

त्यानें **लीजला** पोंहोचल्याच्या चवथ्या दिवशीं **लुई** राजास इत्थंभूत

हकीकतीचें पत्र लिहिलें; तसेंच **लॉर्ड क्राफर्ड** व **बेलेंफ्रे** यांनाही पत्रें लिहिलीं, व आजपासून आपण **लुई** राजाची नोकरी सोडली असा त्यात मजकूर लिहिला व सर्व पत्रें शिपायाबरोबर धाडलीं.

अशा रीतीनें हवें ते करण्यास व हवा तेथे जाण्यास तो आता मोकळा झाला. म्हणून त्याने त्या प्रेम-पत्रिकेंतील सूचनेप्रमाणें वागण्याचें ठरवून तो झोपीं गेला. पण थोड्याच वेळात किल्ल्याच्या पुढच्या बाजूला गडबड व आरडाओरड चालू आहे, इतकेंच नव्हे तर किल्ल्यावर हल्ला होऊन किल्ल्यात बंडवाले शिरले असावेत असे त्यास वाटलें. म्हणून त्यानें बागेकडची खिडकी उघडली. बागेकडे शातता होती असें त्याला दिसलें; इतक्यात त्याच्या खोलीच्या दारावर कोणी थाप मारली; त्यानें झटपट आपला पोशाख व हत्यारें अंगावर घातलीं व मग दार उघडलें. तों **हायराडिन** त्याचेपुढें उभा. तेव्हा, तो कांहीं नवे गडांतर आपल्यावर आणतो कीं काय अशी त्याला शंका आली. पण **हायराडिन** कळकळीनें म्हणाला, " तुमचे ग्रह सध्यां उचीचे आहेत. तरी त्या बायांसकट बाहेर पडा. क्षणाचा विलंब लावूं नका. किल्ल्यांत लढाई चालू आहे; पण तुम्हाला त्याच्याशीं काय करावयाचें आहे ? " ती विचार करण्याची वेळ नव्हती. कसाही प्रसंग येवो त्याला तोंड देण्याच्या निश्चयाने तो बाहेर जाण्यास कबूल झाला. ती सर्व मंडळी किल्ल्याबाहेर आली. तेथें घोडे दोनच दिसले; **हायराडिन**ला **क्विंटिन**नें विचारण्यापूर्वीच त्यानें उत्तर दिलें, " लढाईच्या धांदलीत दोनच घोडे मिळाले. तेव्हा तुम्ही दोघेजण एका घोड्यावर बसा. **मार्था** ही आमच्यांतली आहे; ती आमच्यात मिसळून जाईल. **क्विंटिन**नें विचारलें, " पण दुसरी कौंटेस कोठें आहे ? " तो उत्तरला " **विलियम दि ला मार्क**चा राग अनिवार न व्हावा म्हणून मीं एकीला मागें ठेविली आहे." इतक्यांत **कौंटेस**नें बुरखा काढला तोंच ती **हॅमेलाइन** आहे असें **क्विंटिन**ला कळलें. त्याला **हायराडिन**चा विलक्षण राग आला व त्यानें तत्क्षणीं त्याचा प्राण घेतला असता. पण रागाचा आवेश आवरून आधीं **कौंटेस इझाबेला**ला त्या लढाईच्या होमकुंडांतून सोडवून आणण्याकरितां तो वाऱ्यासारखा धांवत जाऊन किल्ल्यांत शिरला. त्यानें खोल्या न् खोल्या तपासल्या. जिकडेतिकडे प्रेतेंच प्रेतें पडलीं होतीं. पेट्या फोडून सामान अस्ताव्यस्त टाकण्यांत आलें होतें. शेवटीं, तो एका जिन्याशीं आला तों कण्हण्याचा आवाज त्याला ऐकूं आला. तेव्हां एका माणसाच्या अंगावर दोन प्रेतें पडून

त्याखालीं तो चेंगरला असून कण्हत आहे असें दिसलें. **किंटिन**ला त्याची दया येऊन त्यानें तीं प्रेतें दूर केलीं. तो कण्हत असलेला माणूस त्याचा उपकर्ता **पॅव्हिलॉन** होय असें **किंटिन**नें ओळखलें. **पॅव्हिलॉन**नेंही त्याला तात्काळ ओळखलें. पण **कौंटेस इझाबेला** अजून आंत आहे, तिचा आधीं शोध करूं या; म्हणून ते दोघेही आणखी आंत गेले. तेथें एका सेंटच्या मूर्तीपुढें प्रार्थना करीत असलेली **इझाबेला किंटिन**च्या दृष्टीस पडली. तिनेंही त्याला पाहतांच त्याच्या गळ्याला मिठी मारली. त्यानें तिला आपल्या हातावर अल्लद उचलून धरली व तो **पॅव्हिलॉन**ला बरोबर घेऊन बाहेर जाऊं लागला. पण **पॅव्हिलॉन** म्हणाला, " किल्ल्याचे सर्व दरवाजे बंद आहेत; **ला मार्क**च्या परवान्याशिवाय कोणालाही बाहेर जातां येणार नाहीं." तेव्हां आतां जीव कसा वांचवावयाचा या विवंचनेंत **पॅव्हिलॉन** पडला. पण, या वेळीं **किंटिन**चें शहाणपण, धोरण व प्रसंगावधान उपयोगीं पडलें. तो **पॅव्हिलॉन**ला धीर देऊन म्हणाला, " तुम्हीं **लीज**चे प्रमुख व्यापारी आहां; **विलियम ला मार्क**च्या पक्षाचे आहांत. तेव्हां तुम्हांला व तुमच्या कामगारांना **ला मार्क** कसा अटकाव करील? असें केल्यास मित्रांनाच बंदिवान् केल्यासारखें होईल." तो म्हणाला, " पण या **कौंटेस**चा बचाव कसा करावयाचा? ही बिचारी बकरी त्या **डुकरा**च्या आयतीच मुखांत पडेल." **किंटिन** म्हणाला, " ती तुमची तात्पुरती मुलगी झाली म्हणजे झालें. मग तिच्यावर हात टाकण्याची कोणाची छाती आहे." ही युक्ति **पॅव्हिलॉन**ला पसंत पडली; व त्याच्या युक्तिबाजपणाबद्दल **पॅव्हिलॉन**नें त्याची मनापासून वाखाणणी केली. जीवरक्षणार्थ **कौंटेस**ही त्याची मुलगी बनण्यास कबूल झाली; तिनें आपल्या तोंडावर व अंगावर घट्ट व जड कापडाचा बुरखा घेतला. **पॅव्हिलॉन**नें तिचा हात धरला. मग तीं तिघेजण व **पॅव्हिलॉन**चे दहाबारा कामगार अशी मंडळी **विलियम दि ला मार्क**च्या समोर गेली. तो त्या वेळीं विजयानें व मद्य पिऊन बेहोष झाला होता. त्यानें आपल्या शिपायांस **बिशप ऑफ लीज**ला आपल्यासमोर आणण्यास फर्माविलें. तदनुरूप **बिशप**ला त्याचें-समोर उभें करण्यांत आलें. **ला मार्क** रागानें व आवेशानें उद्गारला," आपणा दोघांमध्यें सख्य व सलोखा असावा अशाबद्दल मीं आपल्याला नम्रतापूर्वक विनंति केली होती. पण त्या वेळीं ती तुम्हीं झिडकारली. आतां तुम्ही माझ्या तावडींत सांपडला आहां. तेव्हां पूर्वकर्माचें प्रायश्चित्त भोगण्यास तयार व्हा.

पण अझूनही तुम्हांला जगण्याची एक संधि मी देतों. तुम्ही माझ्याकरितां काय करतां ? बोला." बिशपनें गंभीरपणानें व धीटपणानें उत्तर दिलें, "**ला मार्क** तूं माझ्या प्रजाजनांस यमसदनीं पाठविलेंस; **लीज** शहराची लुटालूट केलीस. या अपराधाबद्दल प्रायश्चित्त म्हणून **रोम**ची यात्रा कर व पोपच्या पायांवर डोकें ठेवून त्यांची क्षमा माग." हे बिशपचें भाषण ऐकून **ला मार्क** अधिकच संतापला. त्यानें मारेकऱ्यांस बिशपचें शिर धडापासून वेगळें करण्यास हुकूम दिला व ते राक्षसी कृत्य ताबडतोब पार पाडण्यात आलें !

तें पाहून तेथें असलेल्या लोकांच्या अंगावर शहारे उभे राहिले; इतकेंच नाहीं तर **लीज**च्या लोकांचीं मनें **विलियम**विरुद्ध चिथरलीं; व त्यापैकीं कांहींजण "सूड, सूड" असे ओरडले. त्याबरोबर **आरडेनीस**चा डुक्कर **ला मार्क** गुरगुरला, "तुम्ही माझ्याविरुद्ध जाऊन माझा सूड घेणार काय ?" "या सूड सूड ओरडणाऱ्या लोकांचा आधीं समाचार घ्या पाहूं" असा त्यानें शिपायांस हुकूम केला. तदनुरूप **ला मार्क**च्या शिपायांनीं हातीं लागतील त्या नागरिकांवर हत्यारें उगारलीं; पण प्रत्यक्ष हत्यार कोणीही चालविलें नाहीं हें भाग्य ! कारण, **ला मार्क**चा हुकूम सर्वांना विलक्षण व चकित करणारा वाटला. या वेळीं **क्विंटिन**नें विलक्षण धैर्य करून **ला मार्क**च्या नाजूक भावनेच्या ज्ञानाचा योग्य उपयोग केला. त्यानें तेथें असलेल्या **ला मार्क**च्या मुलाच्या मानगुटीवर तरवार ठेवून तो मोठ्यानें म्हणाला, "तुम्हीं नागरिकांना मारण्याचा खेळ चालविला तर मी ह्या तुमच्या आवडत्या मुलाला मारण्याचा खेळ खेळतों." हे शब्द ऐकल्याबरोबर **ला मार्क**ची धुंदी उतरली. तो ओरडला, "थांबा थांबा, **लीज**च्या लोकाना मारा हें मी थट्टेनें म्हणालों. मी आपल्या मित्रांना दुखापत करीन काय ? शिपायांनो, तुम्ही हात आटोपा व मित्रमंडळींमध्यें तंट्यास कारण झालेलें हें बिशपचें प्रेत बाहेर न्या." नंतर तो **क्विंटिन**कडे वळून म्हणाला, "तुम्ही कोण येवढे शिष्ट माझ्याशीं बरोबरीच्या नात्यानें बोलतां व माझ्याकडून **ओलीस** घेता ?" **क्विंटिन** न डगमगतां धीटपणें उत्तरला, "मी **लुई** राजाच्या स्कॉटिश तिरंदाज-पलटणींतील एक तिरंदाज आहे. येथली हकीकत राजेसाहेबांस कळविण्याचें काम माझ्याकडे आहे. येथें तर मी सैतानी कृत्यें व राक्षसी मारामाऱ्या पाहत आहे. **ड्यूक चार्ल्स**चें सैन्य तुमच्यावर स्वारी करण्यास निघालें आहे. फ्रेंच राजाची मदत पाहिजे असल्यास तुम्हीं ख्रिस्ती माणसासारखें सभ्यपणाचें वर्तन केलें पाहिजे."

नंतर तो **लीज** नागरिकांकडे वळून त्यांना म्हणाला, "**लीज**चे नागरिक हो, तुम्हीं आतां मुकाट्यानें आपआपल्या घरोघरीं जा." त्याप्रमाणें लोक भराभर जाऊं लागले. **ला मार्क**च्या मनांत **किंटिन**चें एका घावासरशीं दोन तुकडे करावे असें आलें. पण आपले सर्व शिपाई फ्रेंच लोक आहेत; आपल्याला फ्रान्सकडून मदत मिळालेली आहे; तेव्हां त्याच्या पलटणींतील अंमलदारावर हात टाकणें आत्मघातकीपणाचें होईल हें मनांत आणून त्यानें **किंटिन**वर हात टाकण्यास हुकूम दिला नाहीं.. उलट तो म्हणाला, "**लीज**च्या नागरिकांनो, तुमच्या हक्कांस मी बिलकूल बाध आणणार नाहीं. तुम्हीं खुशाल येथून जा."

ही संधि आपल्यास निघून जाण्यास बरी आहे असें पाहून **किंटिन**ला व **इझाबेला**ला घेऊन **पॅव्हिलॉन** आपल्या कामगारांसह आपल्या घरीं आला. तेथें त्याच्या **गरट्रूड** मुलीनें **कौंटेस**चें व **किंटिन**चें स्वागत केलें. तिनें सुका मेवा व मद्य आलेल्या मंडळींस दिलें. मग ती म्हणाली, "पण, तुम्हीं अशा वेळीं येथें राहतां कामा नये. तुम्हीं आमचे येथें असल्याचें **ला मार्क**ला कळलें तर तुमचा व आमचा सर्वांचाच घात होईल. आतां तुम्ही सामान्य **फ्लेमिश** पद्धतीचा पोशाख करून वेषांतरानें जाल तरच तुम्ही **फ्लँडर्स** प्रांताच्या बाहेर सुरक्षितपणें पोंहोचाल. **फ्लेमिश** पोशाखासंबंधीं तुम्हांला काळजी नको. मी **कौंटेस**ना माझ्या पोशाखापैकीं एक देते; **किंटिन**ला आमच्या तरुण पुरुषांच्या पोशाखांतील एक पोशाख देतां येईल. शिवाय, तुमच्या दिमतीस मी आपल्या आवडत्या कामगाराला देतें." ही आपल्या मुलीची योजना **पॅव्हिलॉन**ला पसंत पडली. मग तिनें **कौंटेस**ला आपल्या पोशाखाच्या खोलींत (dressing room) नेलें व **पॅव्हिलॉन**नें **किंटिन**ला आपल्या खजिन्याच्या कोठडींत आणलें. तेथें किती तरी लोखंडाच्या तिजोऱ्या होत्या. त्यांपैकीं एक उघडून त्यानें **गिल्डर्स** नाण्यानें भरलेली पिशवी **किंटिन**पुढें केली व म्हटलें, "तुम्हांला पाहिजे तितके पैसे पुढील प्रवासाकरितां तुम्ही घ्या. माझा जीव वांचविणाऱ्या पाहुण्यास जेवढें बक्षीस द्यावें तेवढें थोडेंच होईल." **लुई** राजानें प्रवासास निघतांना दिलेले पैसे संपल्यामुळें त्याला पैशाची जरूरी होती. म्हणून त्यानें गरजेपुरते दोनशें **गिल्डर्स** घेऊन आपल्या पैशाच्या पिशवींत ठेवून दिले. **पॅव्हिलॉन**चे आभार घालून तोही वेषांतर करण्यास पोशाखाच्या खोलींत गेला. त्यानें आपलीं सर्व हत्यारें अंगावर

घातलीं व वरून **फ्रेमिश** फॅशनचा लांब कोट घातला. त्यांच्याकरितां घोडे तयार ठेवण्यांत आले होते. **कौंटेस**नें आतां ठरविलेल्या **ब्रिटेन** प्रांतांतील शहराकडची वाट दाखविण्यास आपला एक चाकर व मुलीचा कामगार **पॅव्हिलॉन**नें त्यांचेबरोबर दिले.

**पॅव्हिलॉन** व त्याच्या घरची मंडळी यांचा निरोप घेऊन **क्विंटिन**ची टोळी मार्गस्थ झाली. त्यांना **ब्रिटेन**च्या वाटेला लावून नोकर परत गेला. ही मंडळी **ब्रिटेन** मुलखांत थोडेसे मैल पुढें गेली नाहीं तोंच मागाहून दोन घोडेस्वार आपला पाठलाग करीत भरधांव येत आहेत असें **क्विंटिन**ला दिसलें. त्या लोकांचा प्रतिकार करण्याचा निश्चय करून तो आपली तरवार म्यानांतून बाहेर काढून लढाईला सज्ज झाला. पण असा लढाईचा प्रसंग आला नाहीं. कारण, त्याच वेळीं पुष्कळ घोडेस्वारानिशीं एक सरदार तेथें येऊन पोहोचला. तो **कौंट क्रेव्हेकूर** आहे असें ओळखून ती घोडेस्वाराची दुकल **कौंटेस इझाबेला**च्या मंडळींस कांहीं एक त्रास न देता पळून गेली. **कौंट**च्या आगमनानें आपली संकटांतून सुटका झाली हें समजल्यावर **कौंटेस इझाबेल**नें त्यांच्यामार्फत **ड्यूक ऑफ बरगंडी**ला शरण जाण्याचा निश्चय केला. **क्विंटिन**ला मात्र हलकेंच पण दुःखित अन्तःकरणानें तिनें सांगितलें, "तुमच्यावर माझें प्रेम जडलें आहे, तरी मी दुसऱ्या कोणाशीं विवाह करणार नाहीं; प्रसंग आल्यास मी मठवास पत्करीन." **कौंट क्रेव्हेकूर**ला कौंटेस **इझाबेला**इला पाहून साश्चर्य आनंद वाटला. त्यानें तिला धीर देऊन आश्वासनपूर्वक म्हटलें, "आतां तुम्हांला काळजी करण्याचें कारण नाहीं." तिनें म्हटलें, आम्हांला वाट दाखविणाऱ्या **पॅव्हिलॉन**च्या कामगारास **लीज**ला परत जाऊं द्यावें. आमचा जीव वांचविणारा व सबंध प्रवासभर आमचें सरंक्षण करणारा **क्विंटिन** याला आपल्याबरोबर घेऊन **ड्यूक**साहेबांच्या सैन्यांत सामील करून घ्यावा. त्यानें **लुई** राजाची नोकरी नुकतीच सोडली आहे." हें ऐकून **कौंट**नें **क्विंटिन**कडे पाहिलें व त्याच्या शौर्याची वाखाणणी केली.

नंतर ही सर्व मंडळी **ड्यूक**च्या **पेरोम** येथील राजवाड्याकडे जाण्यास निघाली. **ला मार्क**च्या मदतीने **लीज**च्या असंतुष्ट शहरवासीयांनीं **ड्यूक चार्ल्स**च्या विरुद्ध बंड करून शहरांत लुटालूट केली व **ला मार्क**नें **लीज**च्या **बिशप**ला निर्दयपणें मारविलें; ही हकीकत **क्विंटिन**नें **कौंट**साहेबांना सांगितली. या घडलेल्या गोष्टींनीं **ड्यूक चार्ल्स** **लुई** राजावर अत्यंत संतापेल

असें **काँटला** वाटलें. इतक्यांत, त्याला आश्चर्यकारक व काळजीकारक बातमी कळली कीं **लुई** राजा थोड्याशा हुजऱ्यांसह **ड्यूकला** भेटण्याकरितां **पेरोम** येथें आला असून खुद्द राजवाड्यांत राहत आहे.

ही विलक्षण घटना घडून येण्याचें कारण **लुई**चा ज्योतिषावरील व आपल्या प्रसंगावधानी धोरणावरील विश्वास होय. कारण, ज्या **गिलोट्टी** नांवाच्या प्रख्यात **इटालियन** ज्योतिषाला **लुईनें** आपल्या पदरीं ठेविलें होतें त्यानें **क्विंटिन**ची नाजूक कामावर नेमणूक, व **पेरोम**मध्यें **ड्यूक**ची भेट या दोन्ही बाह्यतः विलक्षण वाटणाऱ्या गोष्टी राजाच्या व राज्याच्या खऱ्या हिताच्या होतील असें सांगितलें होतें.

तदनुरूप **लुई** एकाएकीं **पेरोम**च्या राजवाड्यांत येऊन **ड्यूक**पुढें उभा राहिला. **लुई** हा सार्वभौम राजा या नात्यानें **चार्लस**ला नाखुषीनें पण सन्मानपूर्वक त्याचें स्वागत करणें भाग पडलें. "आपआपसांतील तक्रारी व गाऱ्हाणीं खासगी बैठकींत समाधानकारक रीतीनें मिटविण्याकरितां मी स्वतः सैन्यविरहित आलों आहे, या योगें लढाईचा प्रसंग टळून दोन्ही देशांत शांतता नांदून लोकांना सुख होईल." अशी **लुईनें** नम्रतेनें व मनमोकळेपणानें विनंति केल्यावर **ड्यूकला** कबूली देण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. **लुई** राजाप्रमाणें **चार्लस ड्यूक**ला शिकारीचा नाद असल्यामुळें त्यानें दररोज शिकारीचा कार्यक्रम ठेवला. त्यामुळें राजाचा औपचारिक मानमरातब ठेवण्याची गरज पडली नाहीं. तरी पण एक राजकीय थाटाची मेजवानी **लुई** राजाच्या भेटीच्या स्मरणार्थ व सन्मानार्थ करणें **ड्यूक**ला भाग होतें. त्याप्रमाणें किल्ल्याच्या दरबार दिवाणखान्यांत थाटाची मेजवानी दिली गेली. मेजवानी चालू असतांना **लीज** शहरातील बंडाळी व **लीज**च्या **बिशप**चा अमानुष खून याबद्दलची हकीकत **क्रेव्हेकूर काँट** यांचे तोंडून **ड्यूकला** कळली. तो विलक्षण संतापला. त्या भरांत त्यानें **लुई** राजाच्या गुप्त प्रोत्साहनानें व मदतीनें या असंभाव्यप्राय गोष्टी घडून आल्या असल्या पाहिजेत, असा भर दरबारांत **लुई**वर आरोप केला व त्याला किल्ल्याच्या बुरुजांत प्रतिबंधांत ठेविलें.

ज्योतिष्यानें दिलेल्या सल्ल्यानें वागल्याचा परिणाम आपल्या जिवावर बेतण्यांत झालेला पाहून राजानें ज्योतिष्याला बोलावून आणलें व देहान्त शिक्षा

देण्याची धमकी घातली. राजाचा ज्योतिषाबाबतचा भोळसरपणा ज्योतिषीबुवांना ठाऊक असल्यामुळें, "माझ्या मरणापासून चोवीस तासांत तुमचा मृत्यु आहे" असें त्यानें राजास ठासून सांगितलें. या युक्तीनें ज्योतिषीबुवा मरणाच्या संकटांतून सुटले.

इकडे **ड्यूकनें** आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेतला. एका मंत्र्याच्या मते **लुईशीं** तह करावा; कारण, असा तह राजाच्या असहाय स्थितींत, **बरगंडी** देशाला फायद्याचा होईल. **कौंट क्रेव्हेकूर** म्हणाला, "**लुई** राजाला **बिशप**-च्या खुनाची बिलकुल माहिती नव्हती; व त्याचा या खुनाशीं कांहीं एक संबंध नव्हता. हें **क्विंटिन डरवर्ड**च्या साक्षीवरून सिद्ध करतां येईल." हें सर्व ऐकून **ड्यूक चार्ल्सनें लुई** राजाची चौकशी मंत्र्यांसमक्ष भरदरबारात करण्याचें निश्चित केलें.

ही गुप्त बातमी व **ड्यूक**च्या मनांतील खरा आशय याची माहिती **लुई**-च्या पैशाच्या व बहुमोल देणग्यांच्या लाचानें लाचार झालेल्या एका मंत्र्याने **लुईला** दिली. तो म्हणाला, "**ड्यूकना बिशप**च्या खुनाबद्दल अत्यंत त्वेष आलेला आहे व खून करणाराचें पारिपत्य केल्यावांचून त्यांचें समाधान होणार नाहीं. असें पारिपत्य करण्यास तुमची संमति व मदत **ड्यूक**साहेबाना मिळाली पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे **कौंटेस इझाबेला**चें लग्न तुमचा युवराज **ऑरलियन्स** याच्याशीं करून टाकण्याचा **ड्यूक**चा निश्चय झाला आहे ही होय. हा निश्चय आपल्या बेताविरुद्ध दिसतो खरा, पण तुम्हांला **ड्यूक**च्या म्हणण्याला वरपांगी रुकार देण्यास हरकत नाहीं. कारण, मला खालीलायक बातमी लागली आहे कीं, **इझाबेला**चे प्रेम **क्विंटिन**वर बसलें आहे, इतकेंच नव्हे तर त्या दोघाच्या परस्पर आणाभाकाही झाल्या असल्या पाहिजेत. तेव्हां, **इझाबेला** आपलें सर्व संस्थान व सर्व संपत्ति **ड्यूक**च्या स्वाधीन करून मठवासी संन्याशिनी (Nun) बनेल, पण **क्विंटिन**-खेरीज दुसऱ्याशी लग्न करणार नाहीं. तेव्हां **ऑरलियन्स**ला शेवटीं तुमची मुलगी पसंत करणें भाग पडेल. तिसरी गोष्ट, ड्यूकचा लीज नगरावरही फार राग आहे; कारण सध्याची बंडाळी ही तिसरी होय; तेव्हां तुम्हांला **ड्यूक**-च्या कृत्यास उघड संमति देऊन मदत करावी लागेल."

याप्रमाणें **लुई** राजाला **ड्यूक**च्या गुप्त खलबताची व मानसाची बातमी लागली. आपला धोक्यांत पडलेला जीव बचावतो व आपणावर अपमानकारक

अटी लादल्या जात नाहींत येवढ्याबद्दल **लुईला** समाधान वाटलें. शिवाय, **इझाबेलाला क्विंटिनसारखा** तरुण, सुंदर, व शूर पुरुष पति लाभत असून आपला जीव वांचवणाऱ्या कुलीन तरुणाला मोठी पदवी व अधिकार मिळत असल्यानें आपला एक कायमचा विश्वासू मित्र **ड्यूकचा** मांडालिक बनत आहे ही गोष्ट आपल्या फायद्याची आहे असें **लुईस** वाटलें. आणखी, त्या तरुणाविषयींचें आपलें भविष्य खरें होणार म्हणूनही **लुईला** आनंद झाला.

ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं मोठा दरबार भरविण्यांत आला. प्रथम **लुई**-वरील आरोपांची चौकशी झाली; व त्याबाबत **इझाबेला** व **क्विंटिन** यांच्या साक्षी घेण्यांत आल्या. **इझाबेला** आपल्या साक्षींत म्हणाली, "फ्रान्सच्या राजाच्या आश्रयास जाण्यास आम्हांस कोणीही सांगितलें नाहीं. आम्ही स्वतः होऊन वेडेपणानें त्यांचेकडे गेलों. दारीं आलेल्या पाहुण्या बायांस घराबाहेर घालवून देणें गैर व असभ्यपणाचें होईल, म्हणून मोठ्या नाखुषीनें त्यांनीं आम्हांला आश्रय दिला; पण लगेच आमची गुप्तपणें **लीजच्या बिशप**-कडे रवानगी केली. त्यांनीं दिलेल्या **क्विंटिन** तिरंदाजानें कित्येक संकटांत आपला जीव धोक्यांत घालून आमचें संरक्षण केलें व आम्हांला **लीजला** सुरक्षित रीतीनें पोंहोचविलें."

**क्विंटिननें** हीच हकीकत सांगितली. शिवाय, "**हायराडिन** वाटाड्याचें **ला मार्कच्या** माणसाशीं झालेलें संभाषण मला ऐकण्यास सांपडलें म्हणून, **नामूर** शहरापासून मीं बायांच्या संरक्षणाकरितां रस्ता बदलला; व त्यामुळें कांहीं एक अडथळा न येतां आम्ही **बिशपच्या** किल्ल्याला सुखरूप पोंहोचलों. **लीज** शहरांत बंड होऊन तेथें लुटालूट झाली. **विलियम दि ला मार्क** विजयमदानें व मद्यपानानें बेहोष झाला होता. त्या धुंदींत त्यानें **बिशपला** आपल्यासमोर ओढीत आणविलें व मग त्यांचा निर्दयतेनें अमानुष खून करण्यांत आला. त्या ठिकाणीं चाललेला दंगा व **ला मार्कचे** क्रूर हुकूम बंद पाडण्याकरितां मी स्कॉटिश तिरंदाज असून **लुई** राजे व **चार्ल्स ड्यूक** हे आपापलीं सैन्यें घेऊन बंडखोरांचें पारिपत्य करण्याकरितां येत आहेत असें पदरचें सांगितलें; पण त्या योगें लोक भ्याले व आपापल्या घरोघर गेले. अधिक प्राणहानि व मालमत्तेचा नाश होऊं नये म्हणून मीं आपल्या जबाबदारीवर ही गोष्ट केली. त्याबद्दल शिक्षा भोगण्यास मी तयार आहे."

वरीलप्रमाणें संक्षिप्त हकीकत इतक्या सविस्तरपणें, सुसंगत रीतीनें, स्पष्ट तऱ्हेनें व धिटाईनें **किंटिन**नें सांगितली, कीं त्याच्या म्हणण्याची सत्यता सर्वांना तत्काळ पटली. तसेंच, **कौंटेस इझाबेला**चे नम्रतापूर्वक पण निश्चयाचें भाषणही परिणामकारक झालें. यामुळे **लुई** राजाचा निरपराधीपणा पूर्णपणें सिद्ध झाला. तो आनंदानें **ड्यूक**ला म्हणाला, "पहा, माझ्याबद्दल कसे खोटेनाटे गैरसमज पसरविण्यांत आले होते. **लीज**च्या **बिशप**च्या खुनाबद्दल व **लीज**च्या नागरिकाच्या बंडखोरीबद्दल गुन्हेगारांचे पारिपत्य करण्यास मी तयार आहे. **ड्यूक ऑरलियन्स** व **कौंटेस इझाबेला** यांची परस्परांची संमति असल्यास त्यांच्या विवाहाविरुद्ध मी नाही."

याप्रमाणें **ड्यूक**च्या बहुतेक मागण्या **लुई**नें तावडतोब भरदरबारांत कबूल केल्यामुळें **ड्यूक**ला कांहीं एक बोलतां येईना.

याप्रमाणें **ला मार्क**वर भरदरबारांत **बिशप**चा खून व **लीज**च्या बंडवाल्या लोकांना मदत हे आरोप केले जात असतांनाच, **ला मार्क**कडून एक दूत (herald) आला आहे व तो दरबारांत येण्याबद्दल विनंति करीत आहे अशी वर्दी आली. सर्व दरबारी आश्चर्यचकित् झाले; पण **ड्यूक**च्या हुकुमानें त्याला दरबारांत येऊं दिलें. तो आल्याबरोबर मोठ्यानें ओरडला, "**विलियम दि ला मार्क** यानी **कौंटेस हॅमेलाइन**शीं विधिपूर्वक लग्न केल्यामुळें तिच्या सर्व जमीनजुमल्याचा, संपत्तीचा व तिच्या संस्थानचा तो मालक झाला आहे. तसेंच, त्यानें **लीज**च्या **बिशप**ची पदवी धारण केली आहे. तरी, **ड्यूक**साहेबांनीं हे हक्क मान्य करून आपल्या दरबारांतील एक मानकरी **कौंट ऑफ क्रोये** म्हणून **ला मार्क**ला घेतले जावे." या दूताच्या उद्दाम मागणीनें **इझाबेला** व **किंटिन** यांनीं सांगितलेल्या हकीकतीचें प्रत्यंतर सर्वांना पटलें. हा निरोप खरा आहे किंवा नाहीं याची चौकशी दरबारच्या पदवी-शास्त्रज्ञांकडून करण्यात आली. तेव्हां तो तोतया दूत आहे असें दिसून आलें. त्याचा दूताचा पोशाख काढण्यांत आल्याबरोबर तो **हायराडिन** आहे असें **किंटिन** व **लुई** राजाबरोबरचे लोक यांनीं तावडतोब ओळखलें. **लुई** राजानें त्याला बाहेर घेऊन जाऊन तात्काळ फाशी द्या असा आपल्या लोकांस हुकूम केला. तात्काळ, त्या लोकांनीं **हायराडिन**ला दरबारांतून बाहेर नेलें. "मला क्षणभर **किंटिन**ची भेट घेऊं द्या" असें त्यानें त्या लोकाच्या हातांवर भरपूर चिरीमिरी ठेवून त्यांना विनविलें. म्हणून **हायराडिन**ला

**क्विंटिन**शीं दहा मिनिटें बोलण्याची परवानगी देण्यांत आली. **क्विंटिन** जवळ आल्यावर **हायराडिन** म्हणाला, " आपल्यावर **चार्ल्स** **ड्यूक**चा लवकर हल्ला होणार, म्हणून **ला मार्क** आपल्या लोकांना फ्रेंच शिपायाचा पोशाख देऊन व स्वत: **ऑरलियन्स**च्यासारखा पोशाख करून **ड्यूक**च्या छावणीवर छापा घालणार आहे. वेषांतरानें शत्रु-मित्र ओळखण्याची पंचाईत पडून आपल्याला **ड्यूक**च्या सैन्याचा पाडाव करतां येईल अशी **ला मार्क**ची अपेक्षा आहे. या सत्य बातमीचा तुम्ही हवा तो उपयोग करा. शेवटीं, एकच विनंति मी करीत आहे. माझा **क्रूपर** नांवाचा घोडा येथून एका मैलावर एका झोपडीशेजारीं बांधलेला आहे. त्याच्याजवळ तुम्ही जाऊन त्याचें नांव घेऊन अशी शीळ (तो शीळ घालून दाखवितो) घाला; व हा लगाम (तो क्विंटिनचें हातीं देऊन) त्याच्या तोंडांत घाला; व मग थोडेंसें चुचकारून त्याच्यावर स्वार व्हा. तो मग तुमचा सेवक व सहचर होईल. असा घोडा मिळणें दुरापास्त आहे. दिवस असो कीं रात्र असो, चांगली वाट असो कीं वाईट वाट असो, ऊन असो कीं पाऊस असो, कशाही स्थितींत तो तुम्हांला लीलेनें हवा तेथें घेऊन जाईल." त्या निर्दय माणसाच्या हृदयांतहि प्रेमाला व दयेला एक स्थान आहे हें पाहून **क्विंटिन**ला नवल वाटलें. त्यानें **हायराडिन**चा घोडा संभाळण्याचें कबूल केलें. तो लगेच घोड्याकडे जाऊन त्याच्यावर स्वार होऊन क्षणांत दौडत परत आला.

इकडे **ड्यूक**च्या उतावळ्या स्वभावाप्रमाणें त्यानें **लुई**जवळ सैन्याची मागणी केली व म्हटलें, " **लीज**च्या लोकांचें व **ला मार्क**चें पारिपत्य करण्यास फार सैन्य नको. तुमचे निवडक तिरंदाज व इतर चार-पांचशें शिपाई पुरे होतील." त्याप्रमाणें तावडतोब तजवीज करण्याचें **लुई**नें कबूल केलें.

तसेंच **ड्यूक ऑरलियन्स**, व **कौंटेस इझाबेला** यांना बोलावून आणून त्यांनीं एकमेकांना पसंत करून लग्नाचें कायम करावें असें म्हणून त्यांना आपल्यापुढें बोलाविलें. **ऑरलियन्स** कुरूप **जोएन**च्याऐवजीं **इझाबेला**शीं लग्न करण्यास एका पायावर तयार झाला. पण तिनें पुन्हा एकदां आपला निश्चय प्रगट केला व आपण आपली संपत्ति व संस्थान **ड्यूक**च्या हवालीं करून मठांत जाणार असें निर्वाणीचें उत्तर दिलें. तेव्हां **ड्यूक**ला फार राग आला व तो ओरडला, " तूं **ऑरलियन्स**ला पति म्हणून पतकरलेंच पाहिजेस. नाहीं तर तुला आम्ही बळजबरीनें प्रार्थना-मंदिरांत नेऊन तेथें तुझा

विवाह लावून टाकूं." पण दरबारांत बसलेली **कौंटेस फ्रेव्हेकूर** निर्भीडपणें म्हणाली, "कुलीन व उच्च घराण्यांतील स्त्रियांचा बळजबरीनें विवाह करतात काय? **ड्यूकसाहेबांनीं** असें भलतेंच गैरवर्तन करूं नये." **ड्यूक** मनांतल्या मनांत फार जळफळला; पण आपल्या सरदार स्त्री-पुरुषांचा कल पाहून त्याला आपला राग दाबून ठेवावा लागला. तेव्हां तो जरा मऊपणाच्या स्वरांत म्हणाला, "**क्रोयेचें** संस्थान खालसा करण्याची आमची इच्छा नाहीं. उलट **इझाबेलानें** आमच्या शूर वीर सरदारांपैकीं कोणास तरी पसंत करून त्याच्याशीं लग्न करावें. तेंहि तिला पसंत नसेल तर मध्य युगांतील पद्धतीचा अवलंब करून लढाईमध्यें जो कोणी सर्वांत शूर ठरेल त्याला **इझाबेलानें** वरलें पाहिजे आम्ही उद्यांच स्वारीवर निघणार. तेव्हां **ला मार्क**ला मारून त्याचें डोकें जो कोणी भाल्यावर घेऊन येईल त्याला **इझाबेला** व तिचें संस्थान देऊं." हें **ड्यूक**चें म्हणणे सर्वांना पसंत पडलेंसें दिसलें.

तदनुरूप स्वारीची तयारी झाली. शिपायामध्यें मोठा आवेश उत्पन्न झाला. कारण, **ला मार्क**चें डोकें उडविणारास मोहक व मौल्यवान बक्षीस मिळणार होतें. **किंटिननें चार्ल्स**ला व **लुई**ला **ला मार्क** शिपायांना फ्रेंच पोशाख देऊन रात्रीचा छापा घालण्याचा गुप्त बेत कळविला. तेव्हा, **लुईने** आपल्या सर्व सैनिकांना आपल्या अस्तनीवर पांढरा शुभ्र पट्टा बांधून छाप्याचा प्रतिकार करण्यास तयार राहण्याचा हुकूम दिला.

दोन्ही सैन्यांची तयारी झाल्यावर **लुई** व **चार्ल्स** हे घोड्यावर स्वार होऊन **लीज** शहरावर चाल करून गेले. **ला मार्क ऑरलियन्स**चा पोशाख करून वेषांतराने लढणार आहे हें फक्त **किंटिन**ला ठाऊक असल्यामुळें तो **ला मार्क**च्या शोधात होता; व तो दिसताच **किंटिन** त्याच्यावर चालून गेला व त्यांचें द्वंदयुद्ध सुरू झालें; **किंटिननें ला मार्क**ला निःशस्त्र केलें; पण इतक्यांत, आपली उपकारकर्त्री **गरट्रूड पॅव्हिलॉन** ही दंगलींत सापडल्यामुळें मदतीकरितां ओरडत असलेली ऐकून तो तिला मदत करण्यास गेला. पण इकडे **बॅलेंफ्रेनें ला मार्क**चें डोकें उडविलें. म्हणून **इझाबेला**वर त्याचा हक्क लागू झाला. "**किंटिननें ला मार्क** निःशस्त्र करून खालीं पाडले होतें, म्हणून मला त्या अस्वलाचें डोकें उडविता आलें. तेव्हां **इझाबेला**वर खरा हक्क माझ्या भाच्याचा आहे व त्यालाच ती योग्य आहे." असें सर्वांदेखत **बॅलेंफ्रे** म्हणाला; या त्याच्या उदारतेनें सर्वांना आनंद झाला.

**ड्यूक चार्ल्स**लाही **किंटिन**च्या विजयानें फार आनंद झाला व म्हणून त्यानें मोठ्या खुषीनें **इझाबेला**चा हात **किंटिन**च्या हातांत दिला. आपला एक पूर्वीचा विश्वासू नोकर, व आतांचा जिव्हाळ्याचा मित्र, **ड्यूक**चा मांडलिक झाला म्हणून, आणि **किंटिन**च्या नशिबीं वैभव व उच्च पदवी मिळण्याबद्दलचें आपलें भविष्य खरें झालें म्हणून, **लुई** राजाला आनंद झाला. दोन्ही राजांमध्यें कांहीं काळ तरी मैत्री व सलोखा झाला म्हणून सर्वांना आनंद झाला.

**किंटिन** व **इझाबेला** यांचा विवाह मोठ्या थाटानें व दोन्ही राजांच्या आशीर्वादानें साजरा झाला; **किंटिन**ला सुंदर बायको, संपत्ति व सरदारकी मिळून तीं दोघें सुखानें कालक्रमणा करूं लागलीं.

---

## लघुकथा दुसरी

# ब्राइड ऑफ लॅमररमूर

[ लॅमरमूरची वधू ]

इंग्लंड व स्कॉटलंड या प्रतिस्पर्धी।व परस्परापासून वेगळया असलेल्या देशांचें एकीकरण सन १७०७ मध्यें आपोआप, बिनतक्रार, व बिनबोभाट घडून आलें. कारण, **एलिझाबेथ** राणीच्या पश्चात्, स्कॉटलंडचा सहावा **जेम्स** राजा हा इंग्रज राजघराण्याशीं शरीरसंबंधानें सरळ व जवळचा वारस असल्यामुळे तो लंडन राजधानीस राहण्यास येऊन इंग्लंडचा पहिला जेम्स म्हणून राज्यकारभार करूं लागला. जास्त संपन्न व सामर्थ्यवान् देशाचे राज्यपद मिळाल्यानें त्याचे वैभव व महत्त्व वाढले. स्कॉटलंडांतील किती तरी सरदार राजाबरोबर लंडनला गेले. पण, यामुळें स्कॉटलंडच्या लोकाची या स्थानत्यागी जमीनदारांच्या ( absentee-Land-lords ) जाण्यानें दुर्दशा झाली. **जेम्स** राजा जरी जुलमी व स्वभावानें देवदत्त राजहक्काचा (Divine right of rule) पुरस्कर्ता असला तरी त्याचेकडून प्रजेच्या खासगी तंटयात व तक्रारींत त्यांना योग्य न्याय मिळत असे. पण, राजा कायमचा दूर गेल्यानें खालच्या दर्जाच्या न्यायाधिशांना व अधिकाऱ्याना लाचलुचपतीस सवड मिळूं लागली. यामुळे स्कॉटलंडांतील हलक्या पण हुशार लोकांचें फावलें. सोन्याचांदीचीं भांडीं व पैशाच्या पिशव्या राजाच्या मंत्र्यांना हव्या तितक्या मिळूं लागल्या व असे लोक संपन्न व मानकरी बनले. परंतु, पूर्वीची खानदानीचीं घराणीं खालावलीं; व त्यांची पुरातन मालमत्ता, शेतवाडी व राहते किल्ले या नव्या उपटसुंभ्या ( upstart ) लोकांचे ताब्यांत आले.

वर वर्णन केलेल्या रीतीनें **विलियम ॲशटन** नांवाच्या कायदेपंडित गृहस्थानें चढत चढत स्कॉटिश न्यायखात्यांतील मानाची **प्रीव्ही कौन्सेलरची** व **लॉर्ड कीपरची** जागा पटकावली. त्याने एका पुरातन सरदार घराण्यांतील बाईशीं लग्न केलें. जरी **लेडी ॲशटन** आपल्या पतींना योग्य आदर दाखवी व जरी घराण्याचें वैभव वाढविण्याच्या कामांत दोघांचें एक

मत होतें; तरी ती आपल्या नवऱ्याला मनांतून **उपटसुंभ** ( upstart ) समजे. या दांपत्याला तीन अपत्यें झालीं. पहिला मुलगा **डग्लस ॲशटन** दोन्ही देशांच्या एकीकरणानंतर लवकरच देशांतरीं प्रवासास गेला. पण तो **ॲशटन** घराण्याचे अनर्थ प्रसंगीं घरीं आला होता. त्यांचें दुसरें अपत्य सतरा वर्षांची **लुसी** नांवाची मुलगी होती; व तिसरें अपत्य **हेन्री** नांवाचा चौदा वर्षांचा मुलगा होता. स्कॉटिश पार्लमेंटाची बैठक चालू असतांना **सर विलियम ॲशटन** आपल्या मुलांमाणसांसह **एडिंबरो** शहरीं राहत; पण, बाकी वेळीं ते आपल्या **रॅव्हन्सवुड** नांवाच्या पुरातन किल्ल्यांतील प्रशस्त वाड्यांत राहत असत.

या पुरातन किल्ल्याची मूळ मालकी स्कॉटलंडांतील एका पहिल्या प्रतीच्या शूर व वजनदार सरदार घराण्याकडे होती. पण हें घराणें पिढीजाद **टोरी** पक्षीय व स्कॉटिश **एपिसकोपेलियन** धर्मपंथीय होतें. यामुळें त्यानें अन्तः-कलहांत ( civil strife ) वारंवार भाग घेऊन आपलें वैभव व सामर्थ्य कमी केलें. या घराण्याच्या **ॲलन रॅव्हन्सवुड** नांवाच्या पुरुषानें तर सन १६८७ च्या राज्यक्रांतींत भाग घेतल्यामुळें त्याची सरदारकीची पदवी सरकारनें काढून घेतली. पण, या दुर्दैवानें शहाणपण न शिकतां **ॲलन**नें इतमामानें व उधळपट्टीनें राहून किल्ल्याच्या विस्तृत शेतवाडीच्या तारणावर **सर ॲशटन**कडून कर्ज काढलें. पुढे त्या कर्जाबाबत फिर्यादी झाल्या. त्या कायदे-बाज न्यायाधीशानें आपलें वजन खर्चून आपल्या बाजूचा व आपल्याला फायदेशीर निकाल वरिष्ठ कोर्टाकडून मिळविला. शेवटीं, **ॲलन**ला आपला वडिलोपार्जित प्रख्यात किल्ला व मोठी मौल्यवान मालमत्ता कर्जाच्या मोबद-ल्यांत **सरसाहेबांना** द्यावी लागली. त्या विस्तीर्ण किल्ल्याच्या समुद्राकडील तटाला लागून असलेला एक मोठा बुरूज व त्याच्या सन्निधचा दिवाणखाना व एकदोन राहत्या खोल्या, इतका एकीकडचा भाग **ॲलन**कडे राहिला. त्यांत त्याला दैन्यावस्थेंत दिवस कंठावे लागले.

**ॲलन**चा एकुलता एक मुलगा **एजर रॅव्हन्सवुड** हा वीस वर्षांचा होता. **सर विलियम**च्या कावेबाजपणामुळें आपल्याला वैभवहीन स्थितींत व दैन्यावस्थेंत राहण्याचा प्रसंग आला म्हणून पितापुत्र **सरसाहेबांचा** द्वेष करीत.

अशा मनःस्थितींत **ॲलन** आजारी पडला व **सरसाहेबांना** शिव्या-शाप देत व आपल्या मुलाला त्यांचा सूड घेण्याची जणूं कांहीं आज्ञा करीत त्यानें प्राण सोडला.

तो दिवस नोव्हेंबरचा असून वेळ सकाळची होती; व सर्वत्र दाट धुकें पडलें होतें. अशा उदासवाण्या व गंभीर समयीं **ॲलनची** प्रेतयात्रा पूर्वीच्या थाटामाटानें त्याच्या नातेवाईक मंडळींनी करण्याचे ठरवून आपआपल्या निशाणाखालीं व आश्रितांसकट प्रेताच्या पेटीमागून कबरस्थानीं ती सर्व मंडळी आली. प्रेतपेटी थडग्याजवळ ठेवल्यावर **स्कॉटिश एपिसकोपेलियन** पंथाचा पाद्री प्रेतसंस्काराच्या प्रार्थनेला प्रारंभ करणार तोंच **सर ॲशटनचा** हुकूम घेऊन सरकारी धर्मखात्यांतला **प्रिसबिटेरियन** न्यायाधिकारी यानें त्या पाद्याला प्रतिबंध केला. तत्क्षणीं जमलेली सर्व मंडळी संतापली; **एजरनें** (त्याचें लोकप्रिय नाव **मास्तर रॅव्हन्सवुड** होतें) तर म्यानातून तरवार काढली व न्यायाधिकाऱ्यास जीवाची जरूर असेल तर प्रतिबंध न करण्यास बजावून त्यानें आपल्या पाद्र्यास प्रार्थना करण्यास हुकूम केला. न्याया-धिकाऱ्यानें "आजच्या सरकारी आज्ञाभंगाचें प्रायश्चित्त तुम्हांला मिळाल्या-वांचून राहणार नाहीं" असें **रॅव्हन्सवुडला** बजावलें. तरी पण सर्व प्रेत-संस्कार यथाविधि पार पडल्यानंतर सर्व मंडळी परतून बुरुजाच्या दिवाण-खान्यांत आली. **एजर** मोठ्यानें म्हणाला, "कोणाच्या भात्यातून हा बाण सुटला आहे हें मी जाणतों; ज्यानें आमच्या घराण्याचा नाश व बेअब्रू केली त्यावर व त्याच्या घरावर तसाच प्रसंग आणल्यावांचून मी राहणार नाहीं." त्या काळच्या रीतीप्रमाणें **रॅव्हन्सवुडनें** जमलेल्या मंडळींस प्रेतयात्रेनिमित्त चांगली मेजवानी व नंतर उत्तम मद्य दिलें. सर्व मंडळींना आपआपल्या घरीं जाण्यास निरोप देऊन **मास्तरनें** त्या रिकाम्या दिवाणखान्यांत दुःख व संताप या मिश्रमनोविकारांच्या मनःस्थितींत एका जुनाट आरामखुर्चीवर अंग टाकलें.

दुसरे दिवशीं सकाळी न्यायाधिकाऱ्यानें **लॉर्ड कीपर सर ॲशटन** यांजकडे येऊन झालेला प्रकार तिखटमीठ लावून सांगितला व मग तो निघून गेला. तो गेल्याबरोबर **ॲशटनसाहेब** खुर्चीवरून उठले व दिवाण-खान्याभर येरझारा घालीत आवेशानें व आनंदानें म्हणाले, "तरुण **रॅव्हन्सवुड** आतां माझ्या चांगला तावडींत सापडला आहे. याच्या

बापानें समेटाच्या वाटाघाटी नाकारून कोर्टात फिर्यादीअर्यादी करून माझ्या अब्रूवर शिंतोडे उडविले. हा **एजर** पोरगा रागीट व मूर्ख आहे. त्यानें आपली होडी बंदराबाहेर धडपणें काढली नाहीं तोंच तिच्यावर नौका-भंगाचा ( Shipwreck ) प्रसंग आणला आहे. मी जी हकीकत **प्रीव्ही कौन्सिलला** लिहून कळविणार आहे, तिच्या भाषेवरून सरकारच्या बिन-लष्करी धार्मिक अधिकाऱ्यांची अवज्ञा त्यानें केली आहे असा स्पष्ट अर्थ निघेल. मग तो जबर दंडास पात्र होईल. त्याला **एडिंबरो** किल्ल्यांत किंवा **ब्लॅकनेस** किल्ल्यांत स्थानबद्ध करतां येईल. त्यानें केलेल्या भाषणांतील कांहीं कांहीं शब्दांवरून त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवतां येईल. परंतु मी हें प्रकरण त्या थरापर्यंत नेऊं इच्छीत नाहीं. माझ्या हातीं असलें तरी मी त्याचा जीव घेणार नाहीं. परंतु हल्लींच्या मंत्रिमंडळाची सत्ता संपेपर्यंत तो जिवंत राहिल्यास मला त्याची मालमत्ता परत करण्याचा प्रसंग येईल तो न यावा इतकी मीं खबरदारी घेतली म्हणजे पुरे." असें स्वगत भाषण करून **सरसाहेब** लिहूं लागले. थोडासा मजकूर लिहून झाल्यावर त्यांनीं दिवाणखान्याच्या भिंतीकड-च्या खांबावर **रॅव्हन्सवुड** घराण्याच्या शिरस्त्राणाचें ( family crest ) चित्र पाहिलें. तें चित्र एका काळ्याभोर बैलाच्या डोक्याचें असून त्या खालीं **'मी योग्य संधीची वाट पाहत आहे'** (I bide my time) अशा अर्थाची म्हण रंगविली होती. ती म्हण पडण्याचें कारण एका दंतकथेंत होतें. या घराण्याच्या एका पूर्वजाचा हा किल्ला व त्याचें आवार त्याजपासून बळजबरीनें घेतलें गेलें होतें. पण, योग्य संधि आल्याबरोबर मूळ मालकानें बळकावणारा मालक मेजवानींत व मद्यप्राशनांत गर्क असतां मेजवानीच्या मेजावर काळ्या बैलाचें डोकें आणून ठेवून मंडळीवर एकदम छापा घालून सर्वांना ठार मारलें; व त्यानें अशा अचाट रीतीनें किल्ला व आवार परत मिळविलें. **लॉर्ड कीपरला** माहीत असलेली ही भयंकर कहाणी आठवून त्याची लेखणी हातांतून मेजावर पडली. इतक्यांत, त्याला आपल्या **लुसी** मुलीचा सतारीच्या साथीवर गाईलेल्या मधुर गाण्याचा आवाज ऐकूं आला. गाणें संपल्यावर तो **लुसी**च्या खोलींत शिरून म्हणाला, " लुसी, तुझा संगीत तत्त्वज्ञानी तुला जगाचा अनुभव येण्यापूर्वीं तें तुच्छ लेखण्यास शिकवितो काय ?" **लुसी** किंचित् लाजली. गाण्याच्या मतलबावरून आपल्या मताचा

तर्क करणें रास्त नाहीं असें म्हणून वडिलांच्या सांगण्यावरून सतार खालीं ठेवून ती त्यांच्याबरोबर फिरावयास निघाली.

तीं दोघें हातांत हात घालून गर्दच्छाय वृक्षराजीनें शोभायमान झालेल्या सहलसडकेनें थोडा वेळ चालत गेली. वाटेंत त्यांना हातांत धनुष्य-बाण घेतलेला उपवनरक्षक ( park-keeper ) भेटला. त्यानें हरिणाची शिकार पाहण्यास चलण्याची त्याना विनंति केली. **सरसाहेबांनीं** सध्यां नको म्हणून त्याचे हातावर एक **डॉलर** ठेवला व सहज म्हणून त्याला **मास्तर रॅव्हन्सवुड**-च्या नेम मारण्याच्या पटाईतपणाबद्दल प्रश्न विचारला. तो मोठ्या अभिमानानें म्हणाला. हरिणांतील प्रचंड व चवताळलेला नर एका शिकाऱ्यावर धावून आला असता केवळ सोळा वर्षांच्या **मास्तरनें** आपल्या तरवारीनें त्या प्राण्याचें धड शिरापासून वेगळें केलें." **सरसाहेबांनीं** विचारलें "तो बंदूक मारण्यांतही पटाईत आहे काय ?" **उपवनरक्षक** उत्तरला, "माझा अंगठा व बोट यांमध्यें धरलेला रुप्याचा **डॉलर** तो ऐंशी यार्डावरून बोटांना इजा न करतां खालीं पाडील. नजर, हात, दिशा व बंदुकगिरी ( eye, hand lead and gunpowder ) यांचा योग्य मेळ घालून लक्ष्यवेध् ( target ) करण्याचें त्याचें कसब अजब आहे !" नतर **सर ॲशटननें** आपल्या मुलीस विचारलें, "या **रक्षकाला** पूर्वीच्या घराण्याबद्दल आदर व अभिमान आहेसें दिसतें." ती उत्तरली, "जर त्या कुटुबाची तुम्हांला माहिती पाहिजे असेल तर वृद्ध **ॲलीस** ती बरोबर देऊं शकेल. शिवाय, ती वृद्ध बाई वीस वर्षांखालीं आंधळी झाली असून सुद्धां तिच्या अवलोकनशक्तीचा बारकावा व वागणुकीचा सभ्यपणा आश्चर्यकारक आहे. तरी तिच्याकडे जाऊं या." असें म्हणून **लुसीनें** आपल्या वडिलांना तिच्या झोपडीकडे ओढीतच नेलें. तिनें झोपडीपुढील छोट्या बागेचा दरवाजा उघडला व त्या वृद्धबाईकडे पाहून ती म्हणाली, "**ॲलीस,** माझे वडील तुला भेटावयास आले आहेत." त्या बाईनें आलेल्या पाहुण्याकडे वळून व त्यांच्याकडे आपली मान फिरवून म्हटलें, "**मिस् ॲशटन,** त्यांचें मी स्वागत करत्यें व तुमचेंही करत्यें." **लॉर्ड कीपर** म्हणाले, "माई, तुमच्या मधमाशांना आजची सकाळ छान आहे ना ?" **ॲलीसच्या** बाह्य स्वरूपाप्रमाणें तिचें भाषण आहे किंवा नाहीं हें पाहण्याकरितां वरील प्रश्न त्यांनीं विचारला. ती उत्तरली, "महाराज, मला तसेंच वाटतें; अलीकडे हवा जास्त सौम्य ( mild ) झाली आहे. त्यांनीं

विचारलें, "तुम्हीं स्वतः या मधमाशांकडे बघतां कीं दुसरें कोणी मदतीस घेतां?" **ॲलीस** म्हणाली, "ज्याप्रमाणें राजेलोक आपल्या प्रजेचा कारभार प्रतिनिधीतर्फे चालवितात, त्याप्रमाणें मी माझ्या मधमाशांचा चालविते; मला **पंतप्रधान**ही चांगला मिळाला आहे." असें बोलून तिनें बोलावण्याच्या रुप्याच्या शिळीनें पंधरा वर्षांच्या बेबीला बोलाविलें. तदनुरूप, नीटनेटका पोशाख केलेली, तरतरीत व चलाख मुलगी आपल्या मालकिणीपुढें येऊन उभी राहिली. **ॲलीस** म्हणाली, "बेटा, **लॉर्ड कीपर**ना व मिस **ॲशाटन**ला मध व भाकरी आणून दे. मात्र ती जलदीनें आण व ती निर्मळ आहे असें पाहून आण; मग तुझ्या अडाणीपणाकडे ते दुर्लक्ष करतील." आपल्या आश्रितांना व कुळाडाळांना क्वचित् भेटणाऱ्या आपल्या मालकाकडे आश्चर्यानें पाहत **बेबी** घरांत गेली व लगेच स्वच्छ व निर्मळ केळीच्या पानांवर मध व भाकरी आणून तिनें दोघांच्यापुढें नम्रतेनें ठेविली. **लॉर्ड कीपर**नें त्याचा साभार स्वीकार केला. मध-भाकरी हातावर घेऊन खात खात ते म्हणाले, "या शेतवाडीवर तुम्ही पुष्कळ दिवस आहांत?" ती उत्तरली, "**रॅव्हन्सवुड** येथें राहावयाला आल्याला आम्हांला आतां सुमारें साठ वर्षे झालीं." त्यांनीं विचारलें "तुमच्या बोलण्याच्या पद्धतीवरून तुम्ही मूळच्या या प्रांतांतल्या दिसत नाहीं." ती म्हणाली "नाहीं, मी जन्मानें इंग्लिश बाई आहे." ते म्हणाले "पण, तुम्हीं जणूं कांहीं या देशाच्या आहांत असें तुमच्या या देशाच्या भक्तीवरून भासतें." ती आंधळी बाई म्हणाली, "देवानें दिलेला सुखदुःखाचा पेला मीं येथें चाखला. मी एका प्रामाणिक व प्रेमळ पतीसह वीस वर्षे येथें संसार केला. त्या काळांत मला सहा अपत्यें झालीं. परंतु, दुर्दैवानें तीं साहीही अपत्यें येथें मृत्युमुखीं पडलीं व येथल्याच पडक्या प्रार्थनामंदिराच्या कबरस्थानांत त्यांना पुरण्यांत आलें. ते जिवंत असेपर्यंत त्यांना दुसरा देश नव्हता व ते गेल्यावर मला त्यांचाच देश आपलासा वाटतो." तिच्या घराकडे पाहत **सरसाहेब** म्हणाले "पण, तुमचें घर अति मोडकळीस आलें आहे."

**लुसीनें** वडिलांचें म्हणणें ऐकून भीत भीत पण उत्सुकतेनें त्यांना विनविलें "बाबा, तुम्हांला पसंत असेल तर तें घर नीट करावयास हुकूम द्या." ती आंधळी बाई **लुसीला** म्हणाली, "माझ्या प्रिय लुसीताई, सध्यांचें घर बरें आहे." **लुसी** म्हणाली, "पण, एकदां तुमचें घर चांगलें होतें व तुमची

स्थितीही संपन्नतेची होती. परंतु, आतां तुमच्या म्हातारपणीं या भिकार खोपटात राहणें वाईट आहे." ती म्हणाली, "**मिस लुसी**, माझ्या योग्यतेनुरूप माझें घर आहे. मी ज्या हालअपेष्टा सोसल्या आहेत व दुसऱ्यांना सोसतांना पाहिलें आहे, त्यांनीं जर माझें हृदय फुटले नाहीं, तर तें मजबूत होतें हें खास. सध्यां मी पूर्वीपेक्षां अशक्त झाले आहे असें मला वाटत नाहीं." **लॉर्ड कीपर** म्हणाले, "तुम्हीं पूर्वीच्या स्थितींत पुष्कळ फरक झालेले पाहिल्यासारखें दिसतें. पण तुमच्या पूर्वअनुभवावरून अशा फरकांची तुम्हांला अपेक्षा झाली असेलच." ती उत्तरली, "अपेक्षा असो नसो काळानें मला ते सोसण्यास शिकविलें आहे येवढें खरें. तुम्ही ज्या वृक्षाशेजारीं बसला आहे व ज्यानें माझ्या घरावर छाया पाडली आहे तो उंच व भव्य वृक्ष कधीं तरी आपोआप पडणार किंवा कुऱ्हाडीनें कापला जाणार हें मला समजतें; पण माझ्यादेखत तरी तो माझ्या घरावर सुखकर सावली देत राहावा असें मला वाटणें स्वाभाविक आहे." **लॉर्ड कीपर** म्हणाले, "माझ्या शेतवाडीच्या पूर्वीच्या मालकाच्या काळचे दिवस आठवून तुम्हाला वाईट वाटत आहे याबद्दल तुमच्यावर मी नाखुष होईन असें समजूं नका. त्यावर तुम्हीं प्रेम करावें असें त्यांचें निःसंशय वर्तन असलें पाहिजे व या तुमच्या कृतज्ञतेबद्दल मला तुमचें कौतुक वाटतें. मी तुमच्या घराला दुरुस्त्या करण्यास हुकूम देतों. आपला एकमेकाचा अधिक परिचय झाला म्हणजे आपण एकमेकांचे मित्र होऊं." ती वृद्ध बाई म्हणाली, "नवे मित्र जोडण्याचें माझें वय नाहीं. तुमच्या उदार बुद्धीबद्दल मी आभार मानतें. परंतु मला पाहिजे तें माझ्याजवळ आहे व आपल्याकडून मला कांहीं जास्त नको आहे." **लॉर्ड कीपर** म्हणाले, "तें असो, पण तुम्ही बाहेरून दिसतां त्यापेक्षां जास्त शिक्षित व समंजस आहांत असें मला वाटतें. तुम्ही तुमच्या हयातीभर माझ्या शेतवाडीवर बिनकरानें खुशाल रहा." ती वृद्ध बाई म्हणाली, "ही बाब क्षुल्लक म्हणून तुमच्या लक्षांत नसेल; पण, मला स्मरतें कीं **रॅव्हन्सवुड** शेतवाडीची विक्री झाली, तेव्हां विक्रीखतांत आमची घरजमीन बिनभाड्यानें व बिनकरानें आमचेकडे ठेवण्याचें कलम आहे." **सरसाहेब** गोंधळून म्हणाले, "होय, मला तें आठवतें. तुमची तुमच्या जुन्या मालकावर इतकी भक्ति दिसते कीं, तुम्हीं नव्या मालकाकडून कांहीं एक मदत किंवा सवलत घेऊं इच्छीत नाहीं." ती म्हणाली, "तसें मुळींच नाहीं.

जरी मी आपण देऊं केलेली मदत नाकारीत असलें तरी आपल्याबद्दल माझ्यामध्यें कृतज्ञताबुद्धि आहे. परंतु आतां मी जें आपल्याला सांगणार आहे त्यापेक्षां निराळ्या रीतीनें मला माझी कृतज्ञता व्यक्त करतां आली असती तर बरें झालें असतें." मग ती अधिक गंभीरपणें व मनावर ठसण्यासारख्या रीतीनें म्हणाली, " महाराज, तुम्ही काय आरंभलें आहे त्याचा काळजीपूर्वक विचार करा. तुम्ही भयंकर कड्याच्या निमुळत्या टोकावर उभे आहां." ती बाई राजकीय परिस्थितीला उद्देशून बोलत आहे असें समजून **लॉर्ड कीपर** म्हणाले, " तुमच्या कानांवर एखाद्या कटाची किंवा कारस्थानाची कुणकुण लागली आहे काय? ( Has anything come to your knowledge— any plot or conspiracy ? )

ती उत्तरली, "नाहीं. महाराज, जे असल्या फंदांत पडतात ते वृद्ध, आंधळ्या व दुर्बळ इसमांना कटांत घेत नाहींत. माझा इशारा निराळ्या कोटींतला आहे. तुम्हीं **रॅव्हन्सवुड** घराण्याविरुद्ध फार कडक उपायांची योजना करीत आहांत. पण मी तुम्हांला सांगतें कीं तें घराणें भयंकर आहे. जिवावर उदार झालेल्या माणसाशीं फार जपून व सावधगिरीनें वागलें पाहिजे." **कीपर** म्हणाले, " वा, त्यांत काय आहे? आमच्या व्यवहारांत माझ्या स्वतःच्या पदरचें कांहीं नाहीं. सर्व गोष्टी कायद्याबरहुकूम झाल्या आहेत व होतील; व जर त्यांना त्यांत फेरबदल करून घ्यावयाचा असेल तर त्यांनीं कायद्याची कास धरली पाहिजे." ती म्हणाली, " पण दुसरे उपाय हरले म्हणजे ते कायदा आपल्या हातीं घेतील." **लॉर्ड कीपर** म्हणाले, " तुमच्या म्हणण्याचा काय अर्थ? तरुण **रॅव्हन्सवुड** अत्याचार करील कीं काय?" ती म्हणाली, " देवदयेनें तसें न होवो. तो उदार, स्वतंत्र वृत्तीचा व थोर मनाचा आहे. तथापि, तो **रॅव्हन्सवुड** घराण्यांतला आहे व त्यांच्या घराण्याची म्हण "**मी संधीची वाट पाहत आहे**" ही तुम्हांला ठाऊक आहे. तसेंच, या घराण्यांतील **चेसले** नांवाच्या पुरुषानें केलेलें भयंकर कृत्य तुम्हांला व विशेषतः **मिस ॲशटन**ला ठाऊक आहे. म्हणून मी म्हणतें, तुम्ही त्याला कायद्याच्या कचाट्यांत आणण्यासारखें कांहीं एक करूं नका." त्यानें म्हटलें, " तरुण **रॅव्हन्सवुड** हा मानधन माणूस ( a man of honour ) आहे व तो भलतेंच करणार नाहीं." असें म्हणून घाईघाईनें **ॲलीस**बाईचा निरोप घेऊन ते **लुसी**सह किल्ल्याकडे परत येण्यास निघाले.

**लॉर्ड कीपर** सुमारें पाव मैल अगदीं मुकाट्याने चालले. त्या काळीं मुलां-मुलींना जी वागण्याची रीत व शिस्त शिकविली जात असे, तदनुरूप आई-बापांची आज्ञा पाळण्याची व त्यांचें भय बाळगण्याची **लुसीला** सवय झाली होती; शिवाय, ती स्वभावतः भित्री होती म्हणून तीही कांहीं न बोलतां बापाबरोबर चालली होती. शेवटी, तिच्याकडे एकदम वळून तिच्या वडिलांनीं तिला विचारलें, "**लुसी**, तू इतकी घाबरलीस का ?" त्या रानांत चरत असलेल्या व **न माणसाळलेल्या** ( undomesticated ) काळया केसाळ बैलाच्या टोळीकडे तिनें न बोलता बोट दाखविलें. त्या क्रूर व भयंकर बैलांना पाहून **सर ॲशटन** आपल्या मुलीचा खादा धरून वृक्षराजीमधून जलद पावलें टाकीत जोरानें पुढे गेले. या पळपुट्या वृत्तीमुळें व **लुसी**च्या निळया झग्यानें त्या टोळीतील पुढचा बैल बुजला व आपल्या खुरांनीं जमीन खरवडीत, मधून मधून डुरकवण्या फोडीत, व आपल्या शिंगांनीं रेती उंच आकाशांत उडवीत त्यांच्यावर चालून आला. त्या जवळ येऊन ठेपलेल्या संकटप्रसंगीं पितृवात्सल्यानें प्रेरित होऊन आपल्या जिवाची पर्वा न करतां **लुसी**चे वडील तिच्यापुढें उभे राहून त्या हल्ला करणाऱ्या प्राण्याचा हातानें व शरीराने होईल तितका प्रतिकार करण्यास सज्ज झाले. या प्रतिकाराच्या देखाव्यानें बैल अधिकच बिथरला. आतां बापलेक किंवा दोघेंही त्या प्राण्याच्या रागाला बळी पडणार तोंच बंदुकींतून सूं सूं आवाज करीत एक गोळी नीट नेमाने त्या प्राण्याची मान व कण्याचें हाड यामधल्या मर्मस्थानात घुसली. लगेच, तो बैल भयंकर वेदनांनीं हंबरडा फोडीत कोलमडून बापलेकींपासून नऊ दहा फुटांवर येऊन कण्हत पडला व तत्काळ गतप्राण झाला. त्या भयंकर प्रसंगानें **लुसी** बेशुद्ध होऊन जमिनीवर पडली व तिच्या बापाची जवळ जवळ तीच स्थिति झाली. आपली जीवजाई संकटांतून अचानक सुटका झाल्यामुळें त्याला साश्चर्य आनंद झाला. इतक्यांत, त्याची नजर झाडीच्या खांद्यांमधून बदूक हातांत घेतलेल्या आकृतीकडे वळली. यामुळें, सुटका कोणी केली हे तत्क्षणीं त्याच्या ध्यानांत आलें. **लुसी**कडे पाहतो तों तिला मदतीची अत्यंत जरूरी आहे असें त्याला दिसलें म्हणून, आपला प्राणरक्षक स्वतःचा अरण्य-रक्षक असावा असें समजून त्यानें त्यास, **लुसी**ला तात्काळ मदत करण्यास सांगितलें; व तो अधिक माणसांची मदत आणण्याकरितां **ॲलीस**च्या झोपडी-कडे घाईघाईनें गेला. तो शिकारी **लुसी**जवळ आला व त्यानें तिला एका

जुन्या मोडक्या तोडक्या अपशकुनी कारंज्यापाशीं नेलें. ( या कारंज्यासंबंधीं अशी दंतकथा होती कीं, **रॅव्हन्सवुड**च्या एका पूर्वजाच्या प्रियाराधनांत त्याच्या प्रियपात्रानें कारंज्याच्या कुंडांत रागानें जलसमाधि घेतली होती.) तेथें तिला नेल्यानंतर व तिच्या अंगावर कारंज्याचें गार पाणी शिंपडल्यावर ती शुद्धीवर आली तेव्हां आपले वडील आपल्याजवळ नाहींत हें तिला कळलें. अर्थात् ती हलकेंच पण दुःखानें उद्गारली " माझे वडील कोठें आहेत ? " तो परका पुरुष उत्तरला, " **सर विलियम** हे सुरक्षित आहेत व ते ताबड-तोब येथें येतील." ती उद्गारली, " तुम्हांला त्याची खात्री आहे ? बैल आमच्या अगदीं जवळ आला होता. कृपा करून मला थांबवूं नका. माझ्या वडिलांना शोधण्याकरितां मला गेलेंच पाहिजे." म्हणून ती उठूं लागली, पण तिला इतकी अशक्तता आली होती कीं, त्या निव्वळ उठण्याच्या प्रयत्नानें ती खालींच पडती; पण इतक्यांत त्या परकी पुरुषानें तिला आपल्या हातांवर घेतलें व लगेच एका दगडावर उभें केलें व म्हटलें, " मी खरो-खरी सांगतों कीं **सर विलियम ॲशटन** पूर्णपणें सुरक्षित आहेत; व मीं आतांच सांगितल्याप्रमाणें इतक्यांत ते परत येतील. तेव्हां त्यांच्याबद्दल बिलकुल काळजी करूं नका. सुदैवानें त्यांची असामान्य तऱ्हेनें सुटका झाली आहे. बाईसाहेब, तुम्हांला थकवा आला आहे. माझ्यापेक्षां जास्त योग्य मदत येईपर्यंत तुम्हीं येथून उठण्याचा प्रयत्न करूं नका."

**लुसी** आतां चांगली सावध झाली होती. म्हणून, तिनें त्या परक्या पुरुषाकडे लक्ष देऊन पाहिलें. त्याच्या शिकारी पोशाखावरून व सपक्ष टोपी-वरून त्याचा उच्च दर्जा दिसून येत होता. दिसण्यांतही तो रुबाबदार व उमदा, पण किंचित् काळवंडलेला व उदासवाणा दिसत होता, तरी त्याचा चेहरा आकर्षक होता. ती किंचित् गोंधळून खालीं पाहूं लागली. पण, आपली व आपल्या वडिलांची प्राणांतिक संकटापासून सुटका करणाराशीं कृतज्ञतेच्या आवाजानें तिला बोलल्याविना राहवेना. परंतु कृतज्ञतेचे शब्द ऐकण्यास नकोत असें दाखविणाऱ्या मुद्रेनें तो म्हणाला, " बाईसाहेब, तुम्ही आज ज्यांची **संरक्षक देवता** ( guardian angel ) आहां त्यांच्या संरक्षणाखालीं मी तुम्हांला ठेवून जातों." या संदिग्ध भाषणाचें **लुसीला** आश्चर्य वाटून ती उद्गारली, " कृतज्ञता व्यक्त करण्यांत माझी

कांहीं तरी चूक झाली असावी. खरोखरी तसेंच झालें असलें पाहिजे. परंतु, माझे वडील **लॉर्ड कीपर** येईपर्यंत तुम्ही थांबलात तर ते तुमची चौकशी करून नांव विचारून योग्य शब्दांनीं कृतज्ञता व्यक्त करतील." तो परकी पुरुष म्हणाला, "माझें नांव कळण्याची अवश्यकता नाहीं. **सर विलियम**ना तें लवकरच कळेल. पण तें कळल्यानें त्यांना बरें वाटेल कीं वाईट वाटेल तें ईश्वर जाणे!" **लुसी** मनापासून बोलली, "तुम्ही त्यांच्याबद्दल शंका धरूं नका. स्वतःच्याकरितां व माझ्याकरितां ते तुमचे आभार मानतील. तुम्हांला माझ्या वडिलांची माहिती नाहीं किंवा त्यांच्या सुरक्षिततेबद्दल तुम्ही मला उगाच असत्य सांगत आहां. कदाचित्, ते त्या भयंकर प्राण्याच्या रागाला बळी पडले असतील." असे म्हणून ती वृक्षराजीकडे जाऊं लागली; तोंच तो नाखुषीनें म्हणाला, "बाईसाहेब, मी शपथपूर्वक पुन्हा सांगतों कीं तुमचे वडील पूर्णपणें संकटमुक्त झाले आहेत. परंतु रानटी बैल चरत असलेल्या बाजूकडे जाऊन तुम्ही आपला जीव पुन्हा धोक्यात घालूं नका. तुमचा जाण्याचा निश्चयच असला तर माझा खांदा धरून तरी चाला." तदनुरूप **लुसी**नें त्याच्या खांद्यावर आपला भार टाकून ती चालूं लागली. इतक्यांत, **ॲलीस**ची मोलकरीण व दोन लाकूडतोडे यांना घेऊन **सर विलियम** आले व **लुसी**ला पाहतांक्षणींच आनंदाने उद्गारले, "माझ्या लाडके **लुसी**, तूं सुरक्षित व खुशाल आहेस ना?" इतकेंच बोलून त्यांनीं तिला आलिंगन दिलें. ती आनंदानें म्हणाली, "देवदयेनें मी खुशाल आहे; पण तुम्हांला तसेंच पाहून मला जास्त हर्ष होत आहे. हे गृहस्थ..." इतकें अर्धवट बोलून ती थांबली. तोंच **सर विलियम** म्हणाले, "माझा व माझ्या प्रिय मुलीचा जीव वांचविणाऱ्या गृहस्थाचे मी मनापासून आभार मानतों व मी विनंति करतों कीं......" कठोर व खड्या आवाजांत तो म्हणाला, "महाराज, मला कसलीही विनंति करूं नका. मी **मास्तर रॅव्हन्सवुड** आहे." लगेच तो झाडींत शिरून दिसेनासा झाला. **सर विलियम** आश्चर्यचकित होऊन उद्गारले, "काय! आमचे प्राण वांचविणारा तरुण **मास्तर रॅव्हन्सवुड** होता!" लगेच सर्व मंडळींसह **सर विलियम** निर्विघ्नपणे घरी आले. पण, तेव्हांपासून **लुसी**च्या ध्यानीं, मनीं, स्वप्नीं आपला प्राण वाचविणाऱ्या त्या सुंदर व भव्य पुरुषाची मूर्ति दिसूं लागली. तिनें त्या वेळपर्यंत मनावर छाप बसविणारा पुरुष पाहिला नव्हता. यामुळें त्यावर तिचे प्रेम जडले.

**सर विलियमनीं** आपल्या संकटाची व सुटकेची मोघम बातमी एडिंबरोस असलेल्या आपल्या पत्नीस कळविली.

दुसरे दिवशीं **सरसाहेबांनीं** आदल्या दिवशीचा लेख काढला. **रॅव्हन्स-वुडच्या** गैरवर्तणुकीला फार सौम्य रूप देऊन धर्मखात्यांतील धर्माधिकाऱ्यास हुकुमाची फाजील कडक अंमलबजावणी केल्याबद्दल दोष दिला. **प्रीव्ही कौन्सिलनें रॅव्हन्सवुडबद्दल** आपला लेख फक्त दप्तरीं दाखल करून कांहीं एक न करतां निकालांत काढावा अशी **कौन्सिलला** शेवटीं **सर-साहेबांनीं** विनंति केली.

ज्या दिवशीच्या सकाळीं **सर विलियम ॲशटन** व **लुसी** यांची प्राणसंकटांतून सुटका झाली त्या दिवशीच्या सायंकाळीं **वूल्फ्सक्रॅग** व **रॅव्हन्सवुड किल्ला** यांपासून सारख्याच अंतरावर असलेल्या खाणावळींत दोन इसम बोलत होते. त्यांतला एक सुमारें चाळीस वर्षांचा होता. त्याचे डोळे शोधक होते. तो उंच व सडपातळ होता. त्याचें नाक बाकदार होतें व त्याचा चेहरा धूर्तता पण खलवृत्ति दाखविणारा होता. दुसरा माणूस सुमारें पंचवीस वर्षांचा असून ठेंगू, मजबूत, निश्चयी, तांबड्या केसांचा, लाल चेहऱ्याचा, खुल्या दिलाचा व आनंदी स्वभावाचा होता. दोघेही वाट पाहत असतांना सारखी दारू पीत होते. शेवटीं, तरुण पुरुष उद्गारला, “इतका वेळ **मास्तरला** कां लागला? बहुधा त्याचा बेत फसला असावा. त्याच्या-बरोबर तुम्हीं मला कां जाऊं दिलें नाहीं?” तो उंच व वडील माणूस उत्तरला, “तो एकटा काम फत्ते करण्यास समर्थ आहे. पण त्यानें ध्यानांत ठेवणें जरूर होतें कीं, त्याच्याकरितां येथपर्यंत येण्यांत आम्ही आपले जीव धोक्यांत घालीत आहोंत.” पहिला तरुण म्हणाला, “क्रेगनगेल्ट, तुम्ही भित्रे भागूबाई दिसतां.” आपल्या तरवारीवर हात ठेवून **क्रेगनगेल्ट** म्हणाला, “जास्त जोखमीचें काम माझ्या अंगावर नसतें तर मीं तुमचा समाचार घेतला असता.” त्याचा सोबती म्हणाला, “तुमचें म्हणणें बरोबर आहे. मला दंड होऊन व माझी मालमत्ता जाऊन जर मी निष्कांचन झालों नसतों तर तुझ्यासारख्याच्या वचनावर विसंबून **आयरिश ब्रिगेडमध्यें** कमिशन मिळण्याच्या भानगडींत पडलों नसतों. मला त्या पलटणीशीं काय करावयाचें आहे? माझ्या वडिलांप्रमाणें मी साधा स्कॉटिश माणूस आहे. माझी चुलत-पणजी ( grand aunt ) **गिरनिंग्टन** कांहीं अमर नाहीं.” **क्रेगनगेल्ट**

म्हणाला, " **बकलों**, परंतु आणखी कित्येक वर्षे ती जगेल. तुमच्या वडिलांनीं काटकसरीनें व बिनव्यसनानें राहून आपली जमीन व मालमत्ता राखली." **बकलों** म्हणाला, " दुर्दैवाने तुमच्यासारख्या लोकांच्या नादीं लागून मी माझी उत्तम इस्टेट गमावली. पण तुम्ही मास्तरसारख्या समजूतदार माणसाला आपल्या जाळयांत कसा अडकविलात ?" **क्रेगनगेल्ट** उत्तरला, "त्याच्या सूडाच्या इच्छेला उत्तेजन देऊन. तो माझ्यावर कधीही विश्वास ठेवीत नसे. परंतु मी संधि पाहत होतों. अपमान व अन्याय याच्या तीव्र जाणीवेनें त्याचें मन जळत असतां मीं नेमका त्यावर घाव घातला. आतां तो **सर विलियम**ची कानउघाडणी करण्यास गेला आहे. परंतु जर ते हमरीतुमरीवर आले तर **मास्तर** त्यांचा जीव घेईल. त्याच्या डोळयांतील भयप्रद चमकेवरून रागाच्या भरात तो अत्याचारास खात्रीनें प्रवृत्त होणार. तो गुन्हा राजद्रोहाचा ठरणार. मग आपला जीव वांचविण्याकरिता त्याला स्कॉटलंड सोडलें पाहिजे; व आपल्या-बरोबर निघालें पाहिजे. मग, आपण सर्वजण **आयमाउथ** बंदरानजीक नांगरलेल्या गलबतांतून फ्रान्सला जाऊं." **बकलों** म्हणाला, " बरें आहे. मला आतां स्कॉटलंडमध्यें राहण्याची मुळींच इच्छा नाहीं. **मास्तर**ला आपल्याबरोबर घेण्यानें जर आपलें काम साधत असेल तर बरेंच झालें. तेव्हां, **कीपर**च्या डोक्यात गोळी मारून **मास्तर** येथें यावा अशी माझी इच्छा आहे. या पाजी मुत्सद्द्यापैकीं एखाद दुसरा दरवर्षी मारला जावा म्हणजे बाकीचे चांगल्या तऱ्हेनें वागतील." **क्रेगनगेल्ट** म्हणाला, " तें अगदीं खरें आहे; पण आपल्या घोड्यांना दाणापाणी वैरण मिळून ते ताजेतवाने झाले आहेत कीं नाहीत हे मला पाहिलें पाहिजे. कारण, खरोखरी तसें कृत्य झालें असल्यास विलंब न लावतां आपण येथून निघून गेलें पाहिजे." तो दारापर्यंत जाऊन काळजीच्या स्वरानें **बकलों**ला म्हणाला, " मीं **मास्तर**ला असें भयंकर कृत्य करण्यास उत्तेजन दिलें नाहीं हें तुम्ही ध्यानांत ठेवा." **बकलों** बोलला " तुम्हीं तसें अक्षरही काढलें नाहीं खरें. **युक्ति व प्रयुक्ति** (art and part) हे दोन भयंकर शब्द उच्चारण्याचा धोका तुम्हांला चांगला ठाऊक आहे. घड्याळ बोललें नाहीं; पण त्यानें मुकाट्यानें खुनाच्या आकड्यावर काटा आणला तसें तुमचें बोलणें आहे." **क्रेगनगेल्ट** म्हणाला, " **बकलों**, मला केव्हां केव्हां वाटते कीं तूं रंगभूमीवरील नट होण्यास योग्य आहेस. तुला सर्व गोष्टी काल्पनिक व चेष्टेच्या वाटतात." **बकलों** म्हणाला, " मला स्वतःला

केव्हां केव्हां तसें वाटतें. जीवजाई कटांत सामील होण्यापेक्षां तसें करणें सुरक्षितपणाचें आहे. परंतु तुम्हीं मोतद्दार आहांत तरी त्याप्रमाणें मोतद्दाराची भूमिका घेऊन घोड्याकडे पहा." **बकलॉ** स्वगत बोलला, "नट, रंगभूमीवरील पात्र ! असें म्हणणारा भित्राभागूबाई नसता तर त्याला मीं गुद्दा दिला असता. बाकी, तो धंदा मला आवडला असता हें खचित्." इतक्यांत **क्रेगनगेल्ट** घाबरत आंत आला व दुःखानें उद्गारला, "**मास्तर**चा घोडा काढणींत अडकून पडला आहे; व आतां तो अगदीं पंगू झाला आहे. त्याच्या सामानाचें तट्टू एका दिवसाच्या चालीनें थकलें आहे. त्याच्याजवळ दुसरा ताज्या दमाचा घोडा नाहीं, तेव्हां त्याला निघतां येणार नाहीं." **बकलॉ** म्हणाला, "जलद पळतां येणार नाहीं एवढेंच ना ? तुमचा घोडा त्याला तुम्हीं द्या." **क्रेगनगेल्ट** म्हणाला, "तसें केलें तर मी धरला जाईन." **बकलॉ** म्हणाला, "पण मला नाहीं वाटत कीं, **मास्तर लॉर्ड कीपर**सारख्या वृद्ध व अशस्त्र माणसावर हात टाकील. बरें, किल्ल्यांत कांहीं बाचाबाची झाली असली तरी त्यांत तुमची **युक्तिप्रयुक्ति** (art and part) नसल्यानें तुम्हांला भिण्याचें मुळींच कारण नाहीं." तो घाबरून म्हणाला, "पण, माझ्या **सेंटजर्मेज**च्या कामाची काय वाट ?" **बकलॉ** म्हणाला, "तुम्हीं जर आपला घोडा मास्तरला देणार नाहीं, तर मी आपला देईन. जर माझ्या मित्राला मीं एका कामांत उत्तेजन दिलें आहे तर तें पुरें करण्यास किंवा त्यांतून सुरक्षित सुटून जाण्यास त्याला मदत करणें माझें काम आहे." **क्रेगनगेल्ट** म्हणाला, "तुम्ही तुमचा घोडा देईन म्हणतां; पण तुम्ही किंमतीचा विचार केला आहेत काय ?" तो म्हणाला, "मीं माझ्या घोड्याला वीस गिनी दिले आहेत; पण मास्तरच्या तट्टाची कांहीं तरी किंमत येईल. शिवाय त्याचा स्वारीचा घोडा बरा झाल्यावर त्याच्या तट्टाच्या दुप्पट तरी किंमत खास येईल. त्याला बरा करण्याचीं औषधें मला ठाऊक आहेत. तरी माझा घोडा त्याला ठेवून मी त्याच्या घोड्याची इजा पाहण्यास व त्यावर उपाय करण्यास जातों." परंतु इतक्यांत त्याला घोड्याच्या टापा ऐकूं आल्या. थोड्याच वेळांत दुःखित चेहऱ्यानें **मास्तर** खोलींत आला व एका रिकाम्या खुर्चीवर त्यानें अंग टाकलें.

दोघांनीं एकदम व उत्सुकतेनें त्यास विचारलें, "काय झालें ? तुम्हीं काय केलें ?" त्यानें नकारात्मक उत्तर दिलें. त्यांनीं पुन्हा विचारलें, "कांहीं नाहीं !

जी हानि त्या वृद्ध खलपुरुषानें केली तिच्याबद्दल त्याजजवळून जाब घेण्याचा निश्चय करून तुम्ही गेलांत; तो तुम्हांला भेटला असून पुष्कळ दिवसांच्या त्याच्या दुष्कृत्याबद्दल त्याचें पारिपत्य केल्यावांचून तुम्हीं परतला ? **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड**च्याकडून असें घडेल अशी आमची अपेक्षा नव्हती." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, "तुमची अपेक्षा कांहीं असो. पण, तुम्हांला माझ्या वर्तनाचें कारण सांगण्याची माझी इच्छा नाहीं." **क्रेगनगेल्ट** म्हणाला, "कांहीं तरी अपघातानें मास्तरला आपला बेत तडीस नेता आला नसेल. पण, माझ्यासारख्या व तुमच्यासारख्या त्याच्या मित्राच्या कळकळीच्या चौकशीबद्दल तो आम्हांला क्षमा करील." **रॅव्हन्सवुड** ताठ्यानें उद्गारला, "मला मित्र मानावयासारखी तुमची व माझी ओळख कधींची ? आमच्या मैत्रीचा अर्थ इतकाच कीं माझ्या वाडवडिलाचा जुना किल्ला पाहून व त्याचा सध्यांचा **ताबेवाला** ( Possessor )–त्याला मी **मालक** ( Proprietor ) समजत नाहीं—याला भेटून तुमच्याबरोबर स्कॉटलंड सोडण्याचा मीं बेत केला होता." **बकलॉ** म्हणाला, "होय, आणि आम्हाला वाटले कीं तुम्ही आपला जीव धोक्यात आणाल. मी व **क्रेगनगेल्ट** या आम्हाला धोका असतांना तुमच्याकरितां आम्ही थांबलों. **क्रेगी**बद्दल फारशी फिकीर नको. त्याच्या जन्माबरोबर फाशीची शिक्षा त्याच्या कपाळावर कोरलेली आहे. परंतु दुसऱ्याच्या कामांत आपला जीव घालविण्याइतक्या हलक्या कुळात माझा जन्म झाला नाहीं." **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड** म्हणाला, "गृहस्थ हो, तुम्हांला जर गैरसोय सोसावी लागली असली तर मला त्याबद्दल वाईट वाटतें; परंतु माझ्या हिताची गोष्ट कोणती हें ठरविण्याचा मला हक्क आहे. माझें मत आतां बदललें आहे व या मोसमांत (Season) देश सोडून जाण्याचा माझा बेत नाहीं." **क्रेगनगेल्ट** उद्गारला, "मास्तर, तुम्ही देश सोडून येत नाहीं ? मीं इतका त्रास सोसला, सांपडण्याची धास्ती बाळगली व गलबताचा **नोर** ( Freight ) व **विलंबभाडें** (Demurrage) भरलें त्याचें काय ?" आपल्या खिशांत हात घालून व आपली पैशाची पिशवी कॅप्टन **क्रेगनगेल्ट**पुढें टाकून मास्तर म्हणाला, "**नोर** व **विलंबभाडें** याबद्दल मला कांहीं माहिती नाहीं. तरी या पिशवींतून योग्य रक्कम तुम्ही घ्या." परंतु येथें **बकलॉनें** त्याला अडवून म्हटलें, "**क्रेग**, ती जाळीदार हिरवी पिशवी घेण्यास तुमचे हात वळवळत आहेत. पण मी शपथपूर्वक सांगतों

कीं जर तुम्हीं पिशवीला हात लावाल तर मी माझ्या मोठ्या चाकूनें ( whinger ) तो हात तोडीन. ज्या अर्थी **मास्तर**नें मन बदललें आहे त्या अर्थी आपल्याला येथें अधिक थांबण्याचें कारण नाहीं—पण मी त्याला सांगण्याची परवानगी घेतों कीं,——" **क्रेगनगेल्ट** म्हणाला, "तुम्ही त्याला कांहींही सांगा. पण, आमची संगत सोडण्यापासूनची गैरसोय, येथें राहण्यापासून भीति आणि माझ्यासारख्या **व्हर्सेल्स** व **सेंट जर्मेन** येथें निकट संबंध असणाऱ्या माणसाच्या शिफारशीशिवाय तेथें प्रवेश मिळण्याची अडचण, या सर्व गोष्टींचा मास्तरनें विचार करावा असें मी सांगतों." **रॅव्हन्सवुड** उत्तरला, "अहो, मी तुम्हांला पुनः एकदां सांगतों कीं, तुमच्या माझ्या तात्कालिक संबंधाला फाजील महत्त्व तुम्ही देत आहां. जेव्हां मी परदेशाला जाईन, तेव्हां **क्रेगनगेल्ट**सारख्या कुलंगड्या कारस्थानी माणसाची ( intriguing adventurer ) किंवा **बकलॉ**सारख्या रागीट पुंडाची ( hot-headed bully ) मला जरूरी नाहीं." असें म्हणून तो त्या खोलींतून बाहेर पडून, **वूल्फ्सक्रॅग ( अस्वलकडा )** कडे जाण्यास निघाला. पण आपल्या स्वारीचा घोडा पायानें लंगडत आहे असें पाहून तो आपल्या **सामानाच्या तट्टावर** ( hackney-horse ) बसून असंतुष्ट मनःस्थितींत सावकाश चालूं लागला. **क्रेगनगेल्ट** झटदिशीं घोड्यावर स्वार होऊन दौडत गेला. **बकलॉ** मागें राहून खानावळवाल्यास मास्तरच्या घोड्यास काय उपचार करावयाचे ते सांगत बसला. **क्रेगनगेल्ट** कोठें गेला व त्यानें तिघांची रात्रीं राहण्याची कोठें सोय केली होती हें ठाऊक नसल्यामुळें **बकलॉ** भरधांव **मास्तर**च्या मागें गेला व त्यानें त्याला लवकरच गांठलें. मग **क्रेगनगेल्ट**च्या दानतीबद्दल व त्याच्या बेताच्या खरेपणाबद्दल बोलत बोलत ते सावकाशपणें **वूल्फ्सक्रॅग**च्या वाटेनें चालले. इतक्यांत, खाणावळींतील एक पोऱ्या गाढवावर बसून दौडत त्यांचेकडे आला व मोठ्यानें ओरडला, "**कॅप्टन**साहेबांना सरकारी शिपायांनीं धरून नेलें व ते **बकलॉ**ची चौकशी करीत होते; तरी तुम्ही पळा; तरच तुमचा जिव वांचेल." **बकलॉ**ला कोठें जावें व काय करावें हें सुचेना. तेव्हां **रॅव्हन्सवुड**नें उदारपणें म्हटलें, "जरी मला तुमच्या योग्य तुमचा पाहुणचार करतां येणार नाहीं; तरी **वूल्फ्सक्रॅग** बुरुजांत तुम्हांस लपण्यास हव्या तेवढ्या गुप्त खोल्या आहेत." मग **बकलॉ** व **मास्तर** हे जलद जलद

बुरुजाकडे जाऊं लागले. पण पुढे इतकें दाट जंगल लागलें व रस्ता इतका बिकट लागला कीं त्यांना रस्त्यात बरोबर जाता येईना. म्हणून **मास्तर** पुढें गेला व त्याचे मागोमाग **बकलों** गेला. शेवटी ते बुरुजाच्या विस्तीर्ण आवारांत आले. **रॅव्हन्सवुडनें** आपल्या **कॅलेब** नोकरास मोठ्यानें हाका मारल्या; तेव्हा तो मेणबत्ती घेऊन हळूहळू जिना उतरून अंगणांत आला. आपला मालक इतक्या लवकर परत आल्याबद्दल त्याला साश्चर्य आनंद झाला. दोघांनी आपले घोडे तबेल्यात नेऊन त्याना दाणावैरण दिली. मग ते दिवाणखान्यात आले. तो दिवाणखाना अस्ताव्यस्त स्थितींत होता. **मास्तर** म्हणाला, "वडिलाच्या अत्यविधीच्या मेजवानीमध्यें घरांत सर्व खाद्यपेय खर्च करण्यात आलें. तेव्हा जी गडबड झाली व मारामारीची वेळ आली तीमुळे या दिवाणखान्याकडे कोणी आलें नाही." नंतर तो **कॅलेबला** म्हणाला, "काय खाण्यापिण्यासारखें असेल ते लवकर घेऊन ये. गार व शिळेंपाकें असलें तरी चालेल."

नंतर **कॅलेबनें** वातट मास, खारट मासे व बुरसट दारू मेजावर आणून ठेवली व दोघाचें स्वतःच्या दुःस्थितीबद्दल बोलत बोलत भोजन झाले. मग, **बकलोंला** झोपण्याकरितां पधरावीस वर्षे तरी उपयोगात न आणलेली गुप्त खोली द्यावी असें **रॅव्हन्सवुडनें कॅलेबला** सागितलें व पाहुणे लपून राहण्याकरितां आपल्याकडे आले आहेत तरी त्याच्या येथें राहण्याबद्दल बभ्रा करूं नकोस व आमची दोघाची कशी तरी जेवणाची सोय कर, असे म्हणून त्यानें आपली पैशाची पिशवी त्याचे हवालीं केली. पण, **कॅलेबने** ती धन्यास परत देऊन सर्व व्यवस्था बरोबर करतों म्हणून आश्वासन दिलें.

हां हां म्हणता चार आठवडे होऊन गेले. **बकलोंसारख्या** तरण्याबाड शिकारशोकी माणसास या लपंडावी व निरुद्योगी राहण्याचा कंटाळा आला. पण त्याच्या सुदैवाने एका पहाटेस शिकारी लोकाचा गलबला व घोड्यांच्या टापांचा आवाज स्पष्टपणें त्याला ऐकूं आला. म्हणून तो तातडीनें उठला व दोघांचे घोडे स्वारीला सज्ज करून त्यानें **रॅव्हन्सवुडला** उठविलें. जरी त्याला दुःखद विचारांनीं रात्रीं झोप आली नव्हती, तरी तो उठला व उद्गारला, "आपल्या इतक्याजवळ कोणाच शिकारी कुत्रे आले?" इतक्यांत **कॅलेब** खोलींत आला व म्हणाला, "लॉर्ड **बिटलब्रेनचे** शिकारी कुत्रे आपल्या

शिकारी रानांत आले आहेत. त्यांनीं जरी आपल्या रानाचा शिकारी हक्क मिळविला असला, तरी त्यांनीं सभ्यपणानें सध्यांच शिकारीची **पार्टी** काढावयाची नव्हती.'' **मास्तर** म्हणाला, "माझा मोठा कोट दे म्हणजे मी पाहुण्याच्या हौसेकरितां शिकार पाहण्यास जातों.'' **कॅलेब** म्हणाला, तिकडे बाया आल्या आहेत. तेव्हां तुमचा चांगला शिकारी पोशाख करून तुम्ही जा.'' तसें करून **रॅव्हन्सवुड** घोड्यावर बसला व दोघेही दौडत बुरुजापुढील अरुंद व बिकट रस्त्यानें पुढें जाऊन रानांत शिरले. **बकलॉ** आपल्या घोड्याला भरधांव काढून दौडत चालला. पण, **रॅव्हन्सवुडचा** घोडा ठाणावर फार दिवस बंदा राहिल्यानें बिथरल्यासारखा झाला व म्हणून त्याला **बकलॉच्या** बरोबर भरधांव जातां येईना. गरिबीमुळें आपल्याला शिकारीसारख्या मर्दानी खेळांत भाग घेतां येत नाहीं म्हणून त्याला वाईट वाटत होतें, तोंच त्याला एका अपरिचित घोडेस्वारानें विचारलें, "तुमचा घोडा बरोबर दिसत नाहीं. माझा घोडा मी आपल्याला देऊं काय?'' **रॅव्हन्सवुडला** बरें वाटण्याऐवजीं आश्चर्य वाटून तो उद्गारला, "अपरिचित मनुष्याचेकडून मीं अशी उसनवारीची मदत कां घ्यावी हें मला कळत नाहीं.'' फार लांब नसलेला **बकलॉ** म्हणाला, "अशा वेळीं शंकाकुशंका काढूं नये. देव देईल तें खुषीनें घ्यावें. तुमचा घोडा बिथरला आहे. त्याची मी क्षणांत हड्डी नरम करतों. तुम्ही माझा घोडा घ्या.'' तदनुरूप आपल्या घोड्याची लगाम **रॅव्हन्सवुडकडे** फेकून अपरिचितानें दिलेल्या घोड्यावर स्वार होऊन तो भरधांव दौडत चालला. अपरिचितानें **रॅव्हन्सवुडचें** नांव गांव विचारलें पण तें न सांगतां उलट त्यानें त्या अपरिचितास त्यांचें नांव विचारलें व पुढें म्हटलें, "तुमचा घोडा क्षणभर मला द्याल व त्यानें दिलेला तुम्ही घ्याल तर मी तुम्हांला सांबराच्या चीत होण्यानंतर भेटेन व सर्व गोष्टींचा खुलासा आपोआप होईल.''

इतक्यांत सांबर शिकाऱ्यांच्या पूर्ण आटोक्यांत आल्याच्या आरोळ्या तेथें ऐकूं आल्या. **बकलॉ** जो एकदां पुढें झटकला तो सांबराच्या नजीक गेला. शिकारी कुत्र्यांच्यावर सांबर उलटून हल्ला करण्यास धांवला. तें पाहतांच **बकलॉनें** घोड्यावरून उडी टाकून आपल्या छोट्या शिकारी तरवारीनें सांबराच्या मागच्या डाव्या पायावर असा जोराचा वार केला कीं नरडी आवळल्याप्रमाणें सांबर जमिनीवर पडला. मग शिकारी कुत्र्यांस बाजूस

सारून त्यानें भीति व अनुकंपा यांनीं किंचित् दूर असलेल्या व पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसलेल्या स्त्रीस आपला चाकू गुडघे टेकून सादर केला. तिनें काळा रेशमी शिकारी मुखवटा ( mask ) घालून आपलें तोंड लपविलें होतें. परंतु तिच्या उंची पोशाखावरून व घोडयाचा सतेजपणा व बांकदारपणा (mettle and form) यांवरून ती शिकारी रानांतील प्रमुख स्त्री असावी असें **बकलॉ**ला वाटलें. साबराच्या हृदयाचा काप (incision) काढून मृग-मांसाचा ( venison ) मासला मिळविण्याकरितां सादर केलेल्या चाकूचा स्वीकार त्या बाईनें न केल्यामुळे **बकलॉ**नें तिच्याकडे तुच्छतेनें पाहिलें, पण तिच्याजवळ बोलण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं. तिने शिकार यशस्वी केल्या-बद्दल **बकलॉ**चें सभ्यपणें व सुविनीतपणें आभार मानले.

**रॅव्हन्सवुड** वृद्धानें दिलेल्या घोड्यावर बसून भरधाव पुढे जातो तो शिकाऱ्यांच्या आनंदी आरोळ्यांनीं व तुताऱ्यांच्या उल्लसित स्वरांनीं सांबराची शिकार संपली असें सुचविलें. म्हणून तो उदासीनपणे सावकाश मागें येऊन त्या वृद्ध शिकाऱ्यास त्याचा घोडा आभारपूर्वक परत देऊन **वूल्फ्सक्रॅग**कडे जाऊं लागला. पण वृद्ध शिकारी घोडेस्वार त्याचा जणू कांही पाठलाग करीत दौडत होता. **रॅव्हन्सवुड** '**वूल्फ्सक्रॅग**'च्या जुन्या पुलाजवळ येतो तोंच वृद्ध घोडेस्वारही तेथें आला व वादळ वाढविणाऱ्या मेघांनीं जास्त काळा दिसूं लागलेल्या त्या पुरातन किल्लेवजा बुरुजाकडे पाहून तो उद्गारला "स्कॉटलंड-च्या इतिहासांत उल्लेखिलेला हा पुरातन बुरुज काय?" **रॅव्हन्सवुड**नें उदासीनपणे अस्पष्ट हुंकार दिला. त्याच्या उदासीन उत्तरानें निराश न होता अपरिचित पुन्हा उद्गारला "सन्मान्य **रॅव्हन्सवुड** घराण्याचा सर्वांत आधीच्या ताब्याचा हा बुरुज होता." **मास्तर** उत्तरला, "सर्वांत आधींचा पण आतां बहुधा शेवटला ताबा होणार." बोलूं न बोलूं अशा मनःस्थितीचा प्रतिकार करून व खाकरून घसा साफ करून तो म्हणाला "अशा पुरातन व पहिल्या प्रतीच्या घराण्याला दैन्यावस्था येऊन तें नष्ट होण्याचा प्रसंग येत आहे अशाबद्दल महाराणीकडे अर्ज केला गेला तर कांहीं तरी तडजोडीनें तो भावी नाश थांबवितां येईल." त्याला मध्यें थांबवून **मास्तर** मगरूरपणें म्हणाला, "यापुढें हा विषय जास्त विवादण्याची आपण तसदी घेऊं नये. त्या दुर्दैवी घराण्याचा वारस **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड** मी आहे. आपण रीतभात जाणत असून सुसंस्कृत आहां; तेव्हा आपणाला कळेल कीं दैन्यावस्थेबद्दल अनपेक्षित

अनुकंपाही दुःखदायक असते." घोडेस्वार म्हणाला,"तुम्ही घराण्याचे वारस असें न कळल्यामुळें मी बोलून गेलों. पण त्याबद्दल मी तुमची क्षमा मागतों. **रॅव्हन्सवुड** उत्तरला, "क्षमेची मुळींच जरूरी नाहीं. येथूनच आपले रस्ते निरनिराळे होतात; व मी तुमची खातरजमा करतों कीं मी तरी तुमचा शांत मनानें ( with equanimity ) निरोप घेतों." असें म्हणून त्यानें आपल्या घोड्याची मान **वूल्फ्सक्रॅग** बुरुजाच्या अरुंद व सखल पुला (narrow causeway) कडे वळविली. परंतु त्या वृद्ध सोबत्यानें त्याला पुढें जाऊं न देतां थांबविलें. इतक्यांत मागें उल्लेखिलेली स्त्री आपल्या परिवारासह तेथें येऊन पोंहोचली. तेव्हां त्या वृद्ध सोबत्यानें तिला आपला काळा मुखवटा ( dark mask ) दूर करण्यास सांगून म्हटलें, "मुली, हे **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड** बरें का." या परिचयाचा योग्य स्वीकार करणें स्वाभाविक होतें; पण या अनपेक्षित व विलक्षण प्रसंगानें व त्या स्त्रीच्या सभ्य व विनयपूर्ण आकृति-विशेषानें तो इतका आश्चर्यचकित झाला कीं त्याच्या तोंडून अक्षरही बाहेर पडेना. त्याच क्षणीं जो मेघ त्या पर्वतमाथ्यावर उतरत होता तो काळा-कभिन्न व दाट होऊन सभोंवार व समुद्रावर पसरला व त्यानें दोनदां प्रचंड मेघगर्जना केली व विजेचा चमचमाट तर इतका विस्तीर्ण झाला कीं, त्यानें बुरुजाचे मनोरे व समुद्राच्या लाटा पांढऱ्या शुभ्र व दैदीप्यमान केल्या. यामुळें त्या शिकारी स्त्रीचा घोडा बुजला. मर्द किंवा सन्मान्य सद्गृहस्थ या नात्यानें त्या स्त्रीला वृद्ध बापाच्या किंवा परिचारकाच्या मदतीवर अवलंबून ठेवणें रास्त न वाटून तिच्या घोड्याचा लगाम धरून त्याला मास्तरनें हळूहळू चालीवर आणून पुढें चालविलें. इतक्यांत वादळ जोरानें सुटलें व त्या मंडळीला **वूल्फ्सक्रॅग**चा आश्रय केल्यावांचून गत्यंतर नाहींसें झालें. अर्थात् **रॅव्हन्सवुड**च्या तें ध्यानांत येऊन तो म्हणाला, "**वूल्फ्सक्रॅग** बुरुजाच्या छपराशिवाय जास्त मदत देण्यास मजजवळ कांहीं नाहीं." त्याला तो वृद्ध उत्तरला, "माझ्या मुलीची प्रकृति जात्या अशक्त; त्यांतच तिच्यावर भयंकर व जीवजाई नुकतेंच गुदरलेलें संकट; अशा स्थितींत आम्हांला आपल्या बुरुजाचा आश्रय घेणें अवश्य आहे." असें म्हणून त्यानें त्यास बुरुजाकडे नेण्यास विनंति केली. तदनुरूप ती सर्व मंडळी बुरुजाच्या आवारांत आली; व **रॅव्हन्सवुड**नें आपल्या एकट्या पुरुष नोकरास हाक

मारून त्यांना दिवाणखान्यांत नेण्यास व सर्वांच्या घोड्यांस तबेल्यांत घेऊन जाण्यास सांगितलें. याप्रमाणें तजवीज होऊन त्या अव्यवस्थित दिवाणखान्यांत जुन्यापान्या खुर्च्यांवर व मोडक्यातोडक्या मेजावर **सर विलियम** व **लुसी** बसली. **मास्तर** त्यांच्या उपाहाराची तजवीज करण्याकरितां खालीं गेला, **कॅलेब** व **मायसी** स्वयंपाकीण यांनीं कसेबसें करून वातट मासाचे तुकडे. खारवलेल्या माशांचे खंड व बुरसलेल्या दारूचे पेले मेजावर आणून ठेवले व मग त्या गरीबीच्या उपाहारास सर्वजण लागले. इतक्यात अंगणात **बकलॉ** आणि **बिटलब्रेन**चे व **सर विलियम**चे शिकारी मृगमांस ( venison ) यजमानास देण्यास आले. पण **सर विलियम**च्या खास हुजऱ्यानें मास्तरच्या स्वयंपाकखान्यातील नकारघंटा पाहून त्या मंडळीस शेजारच्या खेड्यांतील खाणावळींत चाहील तें मागून घेऊन खावें प्यावे व आनंदाने यशस्वी शिकारीची पूर्तता करावी; सर्वांचें होईल तें चिल साहेब देतील असें सांगितलें. **बकलॉ** व त्याच्याबरोबर आलेली सर्व मंडळी आनंदानें खाणावळींत गेली. तेथें **बकलॉ**ला अचानकपणें **कॅप्टन क्रॅगनगेल्ट** भेटला व त्यानें **बकलॉ**ला लपून राहण्याचें कारण नाहीं; आपणाला पुष्कळ पैसे मिळाले आहेत; तेव्हां तुम्हांला त्या मगरूर **मास्तरा**च्या पाहुणचाराची गरज नाहीं; मी तुमची जेवणाराहण्याची उत्तम तजवीज करतों असें सांगितलें. अर्थात् **बकलॉ**ची तूर्तची काळजी दूर झाली व म्हणून तो आनंदानें दारू पिऊन अपरात्रीनंतर खाणावळींत निजला.

इकडे जेवण आटोपल्यावर लगेच पाहुणेमंडळींची निजावयाची तजवीज करण्यांत आली. **मास्तर**नें आपली खोली साफसूफ करवून व गाद्यागिरद्या देववून ती **लुसी**ला दिली; **बकलॉ** निजत असे ती गुप्त खोली **सरसाहेबांना** देण्यांत आली. **मास्तर** स्वतः भयाण दिवाणखान्यांत जुन्या आरामखुर्चीवर आपला लांब कोट घेऊन पहुडला. रात्रीं त्याला स्वस्थ झोप आली नाहीं. सकाळीं उठतो तों त्याला **लुसी** दृष्टीस पडली.

तिच्या सौंदर्यानें व हसतमुख नेत्रकटाक्षानें **रॅव्हन्सवुड**चा सूड घेण्याचा निश्चय वितळला. **सर विलियमनीं** आदल्या रात्रीच्या व सकाळच्या संभाषणांनीं ती निश्चयवृत्ति पार नाहींशी केली. तिच्या ऐवजीं **रॅव्हन्सवुड**च्या मनांत त्यांचेबद्दल कृतज्ञताबुद्धि उत्पन्न झाली.

ती खालील कारणानें झाली. **ॲलन** सरदाराच्या अंत्यविधीच्या वेळच्या **मास्तर**च्या भाषणाला व वर्तनाला अति सौम्यरूप दिलेला आपला लेख त्यांनीं **मास्तर**ला दाखविला. त्या योगानें **रॅव्हन्सवुड**ची कारागृहाची भावी शिक्षा **लॉर्ड कीपर**च्या वजनानें व वचनानें वांचली असें **मास्तर**ला कळून आलें. शिवाय, **कॅप्टन क्रेगनगेल्ट**सारख्या पदच्युत राजाच्या वकिलाशीं संगनमत व **बकलॉ**सारख्या दंडाच्या शिक्षेस पात्र व व्यसनी सरदाराशीं सख्य व त्यांचेबरोबर **सेंट जर्मेन** येथें जाऊन शत्रूला मिळण्याचा बेत, हे केवढे गुन्हे आहेत व त्या बाबतींतही आपल्या आग्रहाच्या रद्-बदलीचा किती उपयोग झाला, याचा पाढा जेव्हां **सरसाहेबांनीं मास्तर**पुढें वाचला व **लुसी** व आपण **रॅव्हन्सवुड**च्या वारसाशीं उघड संबंध ठेवून व त्याच्या ठिकाणाला राहून **मास्तरच्या** बाबत सरकारचे झालेले गैरसमज कसे दूर होतील, हें **सरसाहेबांनीं** सांगून आपली मुत्सद्दे-गिरीची कहाणी संपविली. **रॅव्हन्सवुड**सारख्या वकिली डावपेंचाला अनभिज्ञ पुरुषाला ती कहाणी अक्षरक्षः खरी वाटावी हें स्वाभाविक होतें. शेवटीं, **सरसाहेब** म्हणाले, " तरुण माणसा, दीड दिवसाच्या सहवासानें व मनमोकळ्या संभाषणानें आपल्यामधला आडपडदा नाहींसा होऊन एकमेकांचे स्वभाव परस्परांस कळून आले; तेव्हां **रॅव्हन्सवुड** किल्ल्याला येण्याचें व तेथें थोडे दिवस राहण्याचें कबूल केल्यास एका बुडत्या नामांकित सरदार घराण्याचा पूर्वदर्जा त्यास मिळण्याबाबत काय करतां येण्यासारखें आहे हें पाहतां येईल."

अर्थात् या भाषणानें **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड**चा पूर्ण मनःपालट ( complete change of mind ) झाला. या पालटाला वडिलांचें वचनामृत किती व त्याच्या मुलीचा नेत्रकटाक्ष किती कारणीभूत झाला हें समजणें कठीण होतें. पण, मोठ्या आनंदांत सर्वांची न्याहारी झाल्यावर **रॅव्हन्सवुडनें** आपला उत्तम पोशाख चढविला. थोडे दिवस आपण **रॅव्हन्सवुड** किल्ल्यांत राहण्यास जातों म्हणून **कॅलेब**ला सांगून व त्याला थोडेसे पैसे—तो नको नको म्हणत होता तरी—देऊन **वूल्फसक्रॅग** येथली व्यवस्था करण्यास बजावून बापलेक व त्यांचा परिवार यांचेबरोबर तो जाण्यास निघाला. **सरसाहेबांनीं कॅलेब** व स्वयंपाकीण यांस उदार बक्षिसी देऊन व **मास्तर**बद्दल काळजी करण्यास नको म्हणून सांगून

त्यांचा निरोप घेऊन ती सर्व मंडळी घोड्यावर बसून किल्ल्याला दोनप्रहरच्या जेवणाच्या वेळेला येऊन पोंहोचली.

जेवणाची तयारी होती. म्हणून मंडळी लगेच खाण्यास बसली. आदल्या दिवशीच्या **वूल्फ्सक्रॅग**मधील जुन्या दिवाणखान्यांतील जेवणामध्ये व आजच्या दुरुस्त केलेल्या व नव्या तसबिरींनीं शृंगारलेल्या दिवाणखान्यांतील जेवणामध्ये जमीन-अस्मानचें अंतर होतें. **रॅव्हन्सवुड**ला त्याची दुःखद जाणीव झाल्याखेरीज राहिली नाही. पण, **लुसी**च्या सौंदर्यानें व **सर-साहेबां**च्या मार्मिक भाषणाने **मास्तर**ची उदास वृत्ति नाहींशी झाली.

दोन दिवस राहण्याच्या उद्देशानें आलेला **मास्तर** दहा दिवस राहिला; इतकेंच नव्हे तर **सर विलियम**च्या त्याला लष्करात अंमलदारीची जागा देवविण्याच्या आश्वासनावर विसंबून, **लुसी**च्या सुखद सहवासांत तो अनिश्चित काळ राहण्यास कबूल झाला.

एके सकाळीं **लुसीनें मास्तर**बरोबर जाऊन आंधळ्या **ॲलीस**ला भेटण्याचा बेत केला. अविवाहित तरुण-तरुणींच्या खाजगी भेटीचा व संभाषणाचा प्रसंग टाळण्यासाठीं **लुसी**चा धाकटया भाऊ बरोबर देण्यांत आला. पण त्याला पक्ष्यांचीं घरटी शोधण्याचा किंवा फुलपाखरे धरण्याचा नाद असल्यामुळें त्याचें लक्ष त्यांच्या संभाषणाकडे असणें शक्य नव्हतें. अर्थात् बोलत बोलत तीं दोघंजणें वृद्ध **ॲलीस**च्या दुरुस्त केलेल्या व म्हणून पूर्वीपेक्षा जास्त नीटनेटक्या दिसणाऱ्या झोपडीशीं आलीं. ती वृद्धा लोंबत्या फांद्यांच्या **बर्च** झाडाच्या खालच्या जागेवर बसून शरद् ऋतूंतील सूर्यकिरणांचें ( beams of the autumn Sun ) स्पर्शसुख घेत बसली होती. पाहुणे जवळ आल्याबरोबर तिनें आपलें डोकें त्यांच्याकडे वळविलें व ती म्हणाली, “ **मिस ॲशटन**, तुझे पाऊल मला कळलें; परंतु तुझ्या-बरोबरचे गृहस्थ तुझे वडील नव्हत.” **लुसी** म्हणाली, “ **ॲलीस**, तुला असें कां वाटावें ? या उघड्या हवेंत व या स्थिर जमिनीवर पावलांच्या आवाजावरून इतकें **बिनचूक** ताडतां येणें शक्य आहे काय ? ” ती उत्तरली, “ मुली, आंधळेपणामुळे माझे कान अधिक तीक्ष्ण झाले आहेत. तुमच्याप्रमाणें पूर्वी माझ्या कानाला सूक्ष्म स्वरभेद ओळखत नसे; पण माझ्या आंधळेपणानंतर अत्यंत सूक्ष्म स्वरभेदावरून बरोबर तर्क करण्याची शक्ति मला आली आहे. गरज ही कठोर पण उत्तम शिक्षकीण आहे.

( Necessity is a stern but excellent school-mistress. ) जिला डोळयांनीं सोडलें आहे तिनें दुसऱ्या इंद्रियांचे द्वारें माहिती मिळविली पाहिजे." **लुसी** म्हणाली, " बरें, मी कबूल करतें कीं पुरुषांचीं पावलें तुला ओळखतात; पण तीं माझ्या वडिलांचीं का नव्हेत ? ती उत्तरली, " माझे लाडके, वृद्धाचें पाऊल भीत भीत व सावधगिरीनें पडतें; त्याचा पाय जमिनी-वरून सावकाश उचलला जातो; व तो चांचपडत खालीं पडतो. परंतु आतां मीं जो पावलांचा आवाज ऐकला तो तरुणाच्या जलद व ठाम पावलांचा ( hasty and determined step ) आहे; व माझ्या मनांत आलेल्या विलक्षण विचारावर मी विसंबलें तर तो आवाज **रॅव्हन्सवुड**च्या पावलांचा आहे असें मी म्हणेन." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, " खरोखर ! मीं प्रत्यक्ष पाहिलें नसतें तर इंद्रियाची इतकी कुशाग्रता ( acuteness of organ ) असू शकते हें मला खरें वाटलें नसतें. **ॲलीस**, खरोखरी, मी तुझ्या वृद्ध मालकाचा मुलगा आहे." आश्चर्यचकित आरोळीच्या आवाजानें ( scream of surprise ) ती म्हणाली, " **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड**, तूं येथें या स्थळीं—व अशा संगतींत ? माझा त्याच्यावर विश्वास बसत नाहीं. मला तुझ्या डोक्यावरून हात फिरवूं दे, म्हणजे माझें स्पर्शेंद्रिय माझ्या कर्णेंद्रियाची खात्री करील." तिच्या बैठकीच्या लगतच्या जमिनीवर तिच्या शेजारीं **मास्तर** जाऊन बसला; व त्याच्या चेहऱ्यावर तिनें आपला कापरा हात फिरविला. मग ती उद्गारली, " खरोखरी, **रॅव्हन्सवुड**च्या गर्वानें उभारणाऱ्या शिरा आणि धीट व मगरूर स्वर मला कळला. परंतु तुझ्या शत्रूच्या जमिनीवर व शत्रूच्या मुलीबरोबर तूं काय करतोस ? " वृद्ध **ॲलीस** बोलतांना तिचा चेहरा क्षुब्ध झाला व त्यावरून आपला तरुण मालक पूर्वजांच्या मानानें सद्गुणभ्रष्ट ( degenerating ) झाला आहे असें तिला वाटलें असावें. या तिच्या कानउघाडणीचा स्वर न आवडून **लुसी** म्हणाली, " **मास्तर ऑफ रॅव्हन्स-वुड** माझ्या वडिलांना भेटायला आले आहेत." **ॲलीस** आश्चर्यचकित झाली आहे असें पाहून **लुसी** पुढें बोलली, " तुझ्या झोपडींत आणल्यानें त्यांना बरें वाटेल हें मला ठाऊक होतें; म्हणून आम्ही आलों." **ॲलीस** आपल्याशीं पुटपुटली, " काय आश्चर्य आहे; पण देवाचे मार्ग मानवांच्या सारखे नसतात व मानवी कल्पनेला अगम्य तऱ्हेनें ईश्वरी नेमा-नेम घडून येतात ! " मग ती मोठ्यानें म्हणाली, " तरुण मुला, ऐक; तुझे

वाडवडील दुराराध्य (implacable) पण प्रामाणिक शत्रु होते; पाहुणचाराच्या मिषानें (mask) आपल्या शत्रूंचा नायनाट करण्याचा ते प्रयत्न करीत नसत. तुला **लुसी ॲशटन**पाशीं काय करावयाचे आहे? **सर विलियम ॲशटन**च्या मुलीच्या पावलापाठीमागें तुझीं पावले कां पडावीं? तिच्या स्वराबरोबर तुझा स्वर व तिच्या तालाबरोबर तुझा ताल कां पडावा? तरुण माणसा, जो अप्रामाणिक साधनानें सूड घेऊं पाहतो..." **रॅव्हन्सवुड** कठोरपणें म्हणाला, "बाई, गप्प रहा, तुला कोण सैतान बोलवीत आहे? हे लक्षांत ठेव कीं, या तरुण मुलीचें, इजा किंवा अपमान यापासून, संरक्षण करणारा दुसरा मित्र तिला कोणी नाही." ती वृद्ध बाई बदललेल्या पण उदासीन स्वरानें म्हणाली, "असें आहे काय? तर मग, परमेश्वर तुम्हां दोघांना मदत करो." त्या म्हातारीनें काय सुचविलें हे बरोबर न कळल्यामुळें **लुसी** म्हणाली, "तसें होवो. **ॲलीस**, देव, तुला तुझे डोळे व तुझा सद्भाव परत देवो. आम्हां मित्रांचें स्वागत करण्याऐवजीं जर तूं गूढ भाषेत बोलूं लागलीस, तर लोक म्हणतात तें खरें असें आम्हांला वाटेल!" **ॲलीस** विसंगत (incoherent) बोलत आहे असें **रॅव्हन्सवुड**ला वाटून त्यानें विचारलें, "दुसरे लोक हिच्याबद्दल काय बोलतात?" इतक्यात तेथें आलेला **लुसी**चा भाऊ **हेन्री** उत्तरला, "**हॅडिंगटन** येथें **मारलेल्या** चेटकीप्रमाणें हीही चेटकी आहे व तिला उभी जाळली पाहिजे होती." त्या मुलाकडे वळून ती म्हणाली, "तूं काय म्हणत आहेस? मी चेटकी असून **हॅडिंगटन** येथें मारल्या गेलेल्या असहाय वृद्ध दुर्दैवी बायांप्रमाणें मलाही मारलें पाहिजे होतें." **हेन्री** पुन्हा पुटपुटला, "ऐका हिचें बोलणें." ती उद्गारली, "जर जबर व्याज घेणारा, छळ करणारा, गरीबांना डाग देणारा, पुरातन हद्दीच्या खुणा उपटणारा व जुन्या घरांचा उच्छेद करणारा (the usurer, the oppresser, the grinder of poor man's face, the remover of ancient landmarks and the subverter of ancient houses) यांना जर माझ्याबरोबर भाजावयाचें असेल तर देवाचें नांव घेऊन खुशाल आग लावा." **लुसी** म्हणाली, "हें म्हणणें भयंकर आहे. अशा मनःस्थितींत या गरीब बिचाऱ्या एकांतवासी बाईस मीं पूर्वी पाहिलें नव्हतें. परंतु गरिबी व वृद्धावस्था यांना निंदा सहन होत नाहीं. **हेन्री**,

चल, तिला **मास्तर**जवळ खासगी बोलावयाचें आहेसें वाटतें." **रॅव्हन्सवुड**-कडे पाहून ती म्हणाली, " आम्ही घराकडे जातों व **मरमेड**च्या विहिरीजवळ तुमची वाट पाहत बसतों." बहीण-भाऊ दूर गेल्याचें समजल्यावर **ॲलीस** म्हणाली, " तूं सुद्धां माझ्यावर रागावलास. परक्यांना राग यावा हें साहजिक आहे." **मास्तर** उत्तरला, " मी रागावलों नाहीं. परंतु तुझ्यासारख्या व्यवहारज्ञ समजल्या जाणाऱ्या बाईनें अपमानास्पद व निराधार शंकांवर विश्वासून बोलावें याबद्दल मला वाईट वाटलें." **ॲलीस** म्हणाली, " अपमानास्पद ! सत्य हें सदा अपमानास्पद असतें पण निराधार नसतें." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, " पण, तुमच्या कानांवर आलेली गोष्ट अगदीं निराधार आहे." ती म्हणाली, " तर मग जग बदललें आहे व **रॅव्हन्सवुड**-च्या पुरुषांचा वडिलोपार्जित स्वभाव बदलला आहे. किंवा माझ्या डोळ्यांपेक्षां माझे कान अधिक बधिर आहेत. त्या पुरुषांनीं सूडाच्या हेतूव्यतिरिक्त आपल्या शत्रूच्या घरांत गेलेल्याचें मला ठाऊक नाहीं. **एजर रॅव्हन्सवुड**, तूं घातकी रागानें किंवा घातकी प्रेमानें येथें आला आहेस ? " तो म्हणाला, " दोन्हीही गोष्टी खऱ्या नाहींत; मी शपथपूर्वक—नव्हे खात्रीपूर्वक सांगतों." **ॲलीस**ला त्याचे लाजरे गाल दिसले नाहींत; पण त्याचा मुळमुळीत आवाज तिला कळला व प्रथमतः शपथपूर्वक सांगणारे शब्द बदलून त्यानें त्या गोष्टी नाकारल्या, हें तिच्या ध्यानांत आलें व ती म्हणाली, " असें आहे काय ? म्हणून ती **मरमेड**च्या विहिरीजवळ थांबणार आहे. तें ठिकाण **रॅव्हन्सवुड** घराण्यांतील पुरुषाला घातक आहे असें म्हणतात; व पुष्कळ वेळां त्याप्रमाणें घडलें आहे. परंतु जुन्या म्हणी आजच्यासारख्या खऱ्या होण्याचा दिवस उगवला नव्हता." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, " **ॲलीस**, तूं मला वेड लावणार ! तूं म्हाताऱ्या **कॅलेब**पेक्षां अधिक मूर्ख व अधिक धर्मभोळी आहेस. पुरातन काळांतील घातक चालीप्रमाणें **ॲशटन** घराण्याशीं मी लढाई सुरू करीन किंवा तरुण मुलीच्याबरोबर चालतांक्षणींच मूर्खपणानें मी तिच्या प्रेमपाशांत अडकेन असें तुझ्यासारख्या धर्मशील बाईस वाटतें तरी कसें ? " **ॲलीस** म्हणाली, " माझे विचार माझ्यापाशीं आहेत. जरी माझे डोळे माझ्यासमोर घडत असलेल्या गोष्टी पाहूं शकत नसले तरी पुढें होणाऱ्या गोष्टी मला दिसतात. गर्विष्ठ **लॉर्ड कीपर**चा मित्र व नातेवाईक म्हणून खुषीनें तुझ्या वडिलांच्या मेजाच्या सर्वांत खालच्या जागेवर बसण्याची

तुझी तयारी आहे काय? त्याच्या मदतीनें राहण्यास तूं सज्ज आहेस काय? त्याचें कारस्थान ( intrigue ) व डावपेच ( chicane ) यांच्या मार्गानें पाऊल टाकण्यास व मांसल भाग खाल्ल्यावर राहिलेलीं हाडें चघळण्यास तयार आहेस काय? **सर विलियम**च्या म्हणण्याशीं, त्याच्या विचाराशीं, त्याच्या मतानुरूप मत देऊन त्याच्याशीं समरस होऊन तूं तुझ्या वडिलांचा खून करणाऱ्याला सासरा व आश्रयदाता मानण्यास कबूल आहेस काय? **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड**, मी तुमच्या घराण्याची पुरातनतम नोकर आहे. तरी पण मीं भविष्य केलेलें खरें होण्यापेक्षां तुझा अंत झालेला पुरवला असें मला वाटतें." **रॅव्हन्सवुड**च्या मनांत विलक्षण खळबळ उडाली. त्याच्या बंद केलेल्या मनःतारेवर ( chord ) घाव घालून **ॲलीस**नें त्या तारेला नादवती केलें. छोट्या बागेमध्यें तो इकडून तिकडे जलद पावलानें फेऱ्या घालूं लागला. शेवटीं, आत्मसंयमन करून व **ॲलीस**च्या अगदीं समोर येऊन तो उद्गारला, "बाई, तूं मरणाच्या दारीं असतांना तुझ्या मालकाच्या मुलाला सूड घेण्यास व रक्तपात करण्यास प्रवृत्त करणार काय?" गंभीरपणें **ॲलीस** म्हणाली, "देवदयेनें तसें न घडो; म्हणून, ज्या स्थळीं तुझें घातक प्रेम किंवा द्वेष यामुळें तुला अपकार किंवा अपमान खात्रीपूर्वक होणार तेथून तूं निघून जा. माझ्या सुरकुतलेल्या हातांत ( withered hand ) जर शक्ति असती तर **ॲशटन** घराणें, तुझें घराणें व दोन्ही घराणीं यांना रागद्वेषादि रिपूपासून दूर केलें असतें. त्या घराण्याशीं तुझा हितसंबंध नाहीं व उत्पन्न होतां कामा नये. तेव्हां, तूं त्यांच्या येथून ताबडतोब निघून जा. जर परमेश्वराला छळ करणाऱ्यावर सूड घ्यावयाचा असेल, तर निदान तूं त्याचें साधन होऊं नकोस." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, "तूं काय म्हणत आहेस त्याचा मी पूर्ण विचार करीन. मी जाणतों कीं तुझें म्हणणें सत्य व सत्य समजुतीचें आहे. परंतु जुन्या नोकराची योग्य वर्तनमर्यादा तूं ओलांडीत आहेस. परंतु मी तुझा निरोप घेतों. जर मला सुदैवानें सुस्थिति आली तर मी तुला सुखसोय करून देईन." त्यानें तिच्या हातावर सोन्याचें नाणे ठेवण्याचा प्रयत्न केला; पण तिनें तें न स्वीकारतां म्हटलें, "तें क्षणभर जमिनी-वर असूं दे व मग तें उचलून परत घे. तें सोन्याचे नाणें तुझ्या प्रेमपात्राचें प्रेमचिन्ह आहे. मी कबूल करतें कीं **लुसी** या नाण्याइतकी मौल्यवान् आहे. परंतु तिचें प्रियाराधन करण्याकरितां तुला अपमान सहन करावा लागेल

( abuse yourself ). माझ्याबद्दल म्हणशील तर मला अवशिष्ट आयुष्यांत रागद्वेष हीं नकोत किंवा सोनेंही नको. **एजर रॅव्हन्सवुड** पूर्वजांच्या स्थानापासून शंभर मैलांवर दूर गेला आहे व परत न येण्याचा त्याचा निश्चय आहे या बातमीनें मला बरें वाटेल." या आकस्मिक भेटीवरून अंदाजलेल्या माहितीपेक्षां तिला जास्त गुप्त बातमी कळली असली पाहिजे असें वाटून **मास्तर** म्हणाला, "माझ्या आईकडून तुझा समंजसपणा, तुझा चाणाक्षपणा व तुझा विश्वासूपणा याबद्दल मीं तुझी स्तुति ऐकिली आहे. **कॅलेब**प्रमाणें तूं सावलीला भिणारी नाहींस किंवा जुन्या म्हणीवर भरवंसा ठेवणारी नाहींस. जर एखादें संकट असेल तर तें कोठें आहे हें मला स्पष्टपणें सांग. मिस **अॅशटन**च्या प्रेमाबद्दल तुला जो माझा संशय आहे तो अगदीं निराधार आहे. **सर विलियम**पाशीं माझें कांहीं अनिवार्य काम आहे. तें संपल्याबरोबर मला दुःख देणाऱ्या स्थळीं पुन्हा न येण्याच्या निश्चयानें मी निघून जाईन." **अॅलीसनें** आपले दृष्टिहीन डोळे जमिनीकडे वळवून ती थोडा वेळ विचारमग्न झाली व मग आपलें डोकें वर करून ती म्हणाली, "मी खरें तेंच बोलत आहे. माझ्या मनाचा सरळपणा बरा असो, वाईट असो; पण मी माझ्या शंकेचें कारण तुला सांगतें. **रॅव्हन्सवुड**च्या सरदारपुत्रा, मिस **अॅशटन**चें तुझ्यावर प्रेम जडलें आहे." **मास्तर** म्हणाला, "तें अशक्य आहे." ती आंधळी बाई उत्तरली, "तिचें प्रेम किती तरी गोष्टींवरून मला अंदाजतां आलें आहे. तुझ्या हस्तें झालेल्या तिच्या सुटकेपासून तुझ्यावांचून तिच्या मनांत दुसरा तिसरा विचार येत नाहीं हें मीं तिच्या संभाषणावरून ताडलें आहे. हें तुला सांगितल्यावर, याकरितां तरी तूं येथून ताबडतोब निघून गेलें पाहिजे. तेलाभावानें जशी बत्ती विझते तशी तुझ्या दर्शनाभावानें तिची प्रेमज्योति नष्ट होईल. परंतु, तूं येथें राहिलास तर तिचा, तुझा किंवा दोघांचा नाश झाल्यावांचून राहणार नाहीं. मीं ही गोष्ट मोठ्या नाखुषीनें तुला सांगितली. बाकी, तुझ्या ध्यानांत ती लवकरच आली असती. एका अर्थीं माझ्याकडून ती तुला कळत आहे हें बरें आहे. **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड**, तूं येथून निघून जा. मीं मला कळलेलें गुपित तुला कळविलें आहे. **अॅशटन**च्या मुलीशीं लग्न करण्याचा निश्चय केल्यावांचून तूं जर सर **विलियम**च्या छपराखालीं एक तासभर अधिक काळ राहशील, तर तूं खलवृत्ति आहेस असें मी समजेन; पण जर तूं तिच्याशीं लग्न करण्याच्या

इराद्यानें तेथें राहत असलास तर तूं बुद्धिभ्रष्ट किंवा दैवायत्त मूर्ख आहेस असें मी समजेन." असे उद्गार काढून ती बाई उठली; तिनें आपली काठी हातांत घेतली व अडखळत चालून ती झोपडींत शिरली आणि तिनें झोपडीचें दार लावून घेतलें. अर्थात् रॅव्हन्सवुडला आतां विचार करण्यास सवड मिळाली.

पण त्याचे विचार मिश्र स्वरूपी होते. त्याला ज्या पेचप्रसंगाची (dilemma) भीति होती तोच त्याच्या मनापुढे उभा राहिला. लुसीच्या सहवासांत त्याला जें सुख वाटूं लागलें होतें त्याला आतां मोहक रूप आलें होतें; परंतु तें आपल्या वडिलांच्या शत्रूच्या मुलीशीं लग्न करण्याइतक्या स्थितीप्रत पोंहोचलें नव्हतें. तरी पण, जें ॲलीस बोलली ते खरें आहे असें त्याला वाटलें व आता रॅव्हन्सवुड किल्ल्याहून तावडतोब निघून जाणें किंवा लुसीचा प्रियकर (suiter) होणें यापैकी एक गोष्ट करणें आपल्या सभ्यपणाला योग्य आहे असें मनाशीं म्हणत तो दोन पाउलवाटांच्या तिठ्याशीं आला; एक मरमेडच्या कारंज्याकडे जात होती; दुसरी जरा वाकड्यातिकडया वळणानें किल्ल्याकडे जात होती. लुसीला काय सबब सांगावी याचा विचार करीत तो क्षणभर थाबला; इतक्यांत हेन्री धापा टाकीत त्याचेकडे धांवत आला व म्हणाला, "मास्तर, तुम्ही लुसीचा हात धरून तिला किल्ल्याला घेऊन जा; कारण, मला वर्तुळाकार सहली-करितां (ring-walk) नार्मनबरोबर जावयाचें असल्यामुळें तिला घेऊन मला जातां येत नाहीं; जरी सर्व रानटी बैलांना मारून टाकिले आहे तरी ती किल्ल्याला एकटी जाण्यास भीत आहे. तेव्हां तुम्ही तिच्याबरोबर जा."

वजनाच्या काट्याच्या पारड्यांत सारख्याच वजनाच्या वस्तू असतांना एका पिसाच्या वजनानें एकीकडचें पारडे जड होऊन खालीं जाते तशी मास्तरच्या मनाची स्थिति झाली. तो म्हणाला, "या रानांत लुसीला एकटीला सोडून जाणें बरोबर नाहीं. पण, आम्ही एकमेकांना वारंवार भेटत असल्यावर आणखी एका भेटीनें काय होणार आहे! शिवाय, किल्ला सोडण्याचा माझा निश्चय तिला कळविला पाहिजे." याप्रमाणें आपण करतों हें शहाणपणाचें कृत्य आहे इतकेंच नाहीं तर तें आवश्यकही आहे अशी आपल्या मनाची समजूत घालून तो त्या घातक कारंज्याच्या वाटेनें जलद जलद पावलें टाकीत लुसी एकटी बसलेल्या प्रवाहाशीं येऊन पोंहोचला.

मागें वळून त्याला पाहून तिनें न उठतां **मास्तर**ला प्रणाम केला व ती म्हणाली, "माझा अविचारी (madcap) भाऊ मला येथें टाकून गेला; पण तो थोडयाच मिनिटांत परत येईल. कारण, सुदैवानें त्याला एखाद्या गोष्टीचा नाद क्षणभरच लागतो; पण कोणतीही गोष्ट त्याला क्षणार्धापेक्षां जास्त वेळ आकर्षीत नाहीं." तिचा भाऊ लांबच्या सहलीवर गेला आहे व तो लवकर परत येऊं शकणार नाहीं हें **लुसीला** त्याच्यानें सांगवेना. तिच्यापासून कांहीं अंतरावर तो गवतावर बसला व क्षणभर स्तब्ध राहिला. ती स्तब्धता न आवडून **लुसी** म्हणाली, "हें स्थळ मला भारी आवडतें. स्वच्छ कारंज्याच्या बुडबुडयांचा मंजुळ स्वर, झाडांचें हालणें, गवत व रानफुलें यांची विपुलता हीं कादंबरींतील वर्णनासारखीं वाटतात. मला आवडणाऱ्या दंतकथेशीं हें स्थळ निगडित आहे असें मीं ऐकलें आहे." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, "हें स्थळ माझ्या घराण्याला घातक आहे असें म्हणतात; मला तसें वाटण्यास कारण आहे. कारण, या ठिकाणीं मीं तुला प्रथम पाहिलें व येथूनच मला तुझा शेवटचा निरोप घेतला पाहिजे." ती आश्चर्यचकित होऊन उद्गारली, "**मास्तर**, तुम्ही आम्हांला सोडून जाणार? असें घाईनें ठरविण्यास तुम्हांला काय कारण झालें? मला ठाऊक आहे **ॲलीस** माझ्या वडिलांचा द्वेष—निदान तिरस्कार करते. तिचें आजचें गूढ बोलणें मला कळलें नाहीं. परंतु मला ठाऊक आहे, कीं माझे वडील तुम्हीं आमच्यावर केलेल्या उपकाराबद्दल आभारी आहेत. तुमची मैत्री दीर्घ प्रयत्नानें (hardy,) मिळविल्यानंतर ती आम्ही सहजासहजीं (lightly) घालवणार नाहीं." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, "**मिस ॲशटन**, घालविण्याची गोष्टच नको. मी तुमचा सदा मित्र राहीन. परंतु माझें दुर्दैव माझ्या हात धुऊन पाठीस लागलें आहे. म्हणून मला गेलें पाहिजे. नाहीं तर, माझ्याबरोबर तुमचा घात होईल." **लुसी** म्हणाली, "असें असलें तरी सुद्धां, तुम्ही आमच्यापासून जाऊं नका." असें बोलून तिनें साधेपणानें व सलोख्यानें, त्याला थांबविण्याकरितां त्याच्या कोटाचें टोक धरलें. ती पुनः म्हणाली, "तुम्ही आम्हांला सोडणार नाहीं. माझे वडील वजनदार असून त्यांचे मित्र तर अधिक वजनदार आहेत. तेव्हां, वडिलांची कृतज्ञताबुद्धि तुमच्याकरितां काय करते हें पाहिल्याशिवाय येथून जाऊं नका. ते तुमच्याबद्दल आधींच **कौन्सिल**मध्यें खटपट करीत आहेत."

**मास्तर** म्हणाला, " ते खरे असेल. पण, माझा आयुष्यक्रम तुमच्या वडिलांच्या वजनानें यशस्वी करवून न घेतां मीं माझ्या स्वतःच्या कर्तबगारीनें यशस्वी केला पाहिजे. मी आधींच त्याची तयारी केली आहे. तरवार, व कोट, धीट हृदय व निर्धारी हात ( a sword, and a cloak, and bold heart and a determined hand ) इतकीं साधनें यशाला पुरेशी आहेत." **लुसीनें** आपल्या हातांनीं आपलें तोंड धरलें व तिची इच्छा नसताना तिच्या डोळयांतले अश्रु तिच्या बोटांमधून खालीं गळूं लागले. तिचा उजवा हात धरून **रॅव्हन्सवुड** म्हणाला, " मला क्षमा कर. मी उग्र, उद्धट व कह्यांत न राहणारा ( rude and rough and intractable ) माणूस आहे; मी तुझ्यासारख्या सौम्य व कोमल स्त्रीला योग्य नाहीं. तेव्हां तुला दिसलेलें स्वप्न तूं विसर." दुःखित **लुसी** सारखी रडत राहिली. थोड्या अश्रुपातानंतर तिचें दुःख किंचित् कमी झालें. **मास्तरनें** आपल्या जाण्याचा उद्देश जितका जितका तिला समजावून देण्याचा प्रयत्न केला, तितका तितका त्याचा राहण्याचा बेत उघड झाला. शेवटीं, तिचा निरोप घेण्याऐवजीं त्यानें तिला विवाहवचन दिलें व तिनेंही त्याला तसेंच प्रतिवचन दिलें. हें तात्कालिक रीतीनें व मनोविकारांच्या उन्मादांत घडून आले, आणि दोघांचे गाल व हात एकमेकांना मिळाले. त्यावरून त्यांच्या परस्परप्रेमाचा प्रांजलपणा दिसून आला. या विधिविहीन अन्तःकरणाच्या वाङ्-निश्चयानंतर त्यांनीं जुन्या काळांतल्याप्रमाणें औपचारिक विधिही केला. त्यांनीं एका पातळ सोन्याच्या नाण्याचे दोन तुकडे केले. त्यापैकीं एक **लुसीनें** आपल्या गळ्यांत बांधला व म्हटले, " हें प्रेमचिन्ह तुम्हीं परत मागितल्याशिवाय माझ्या गळयांतून मी कदापिही काढणार नाही." **रॅव्हन्सवूडनें** तसेंच केलें.

आतां फार उशीर झाला म्हणून तीं दोघें जलद पावलांनीं किल्ल्यांत आलीं. **सर विलियमनीं** त्यांना परत आलेलें पाहून म्हटलें, " **रॅव्हन्सवुड लुसी**-बरोबर होते म्हणून मला काळजी नव्हती. नाहीं तर तिच्या शोधाकरितां मीं मनुष्यें रानांत पाठविलीं असतीं." त्या दोघांचें वाढतें प्रेम **सरसाहेबांच्या** निदर्शनास आल्यावांचून राहिलें नाहीं. नंतर त्यांनीं **मास्तरचे** नातेवाईक **मार्किस** किल्ल्यांत पाहुणे म्हणून दोन दिवस राहण्यास येणार आहेत ही बातमी त्यास सांगितली. मग ते आपल्या वैभवाप्रमाणें त्यांचा पाहुणचार करण्याच्या तयारीस लागले.

आतां **बकलॉ** व **क्रेगनगेल्ट** यांच्याकडे वळूं या. **लेडी गिरनिंगटन** वारल्यामुळें **बकलॉ**ला तिची सर्व मालमत्ता, शेतवाडी, वाडा व पुष्कळ संपत्ति मिळाली. **क्रेगनगेल्ट**ला ओळखून **बकलॉ**नें आपला कारभार किंवा पैशाची देवघेव या बाबतींत त्याचें ऐकलें नाहीं; तरी पण, आपला मित्र म्हणून **क्रेगनगेल्ट**ला आपल्या घरीं ठेवून घेतलें. त्या दोघांना **रॅव्हन्सवुड**नें झिडकारून त्यांचा अपमान केला होता. तें अपमानशल्य दोघांनाही बोचत होतें. **रॅव्हन्सवुड**चें **लुसी**वर प्रेम असल्याचें त्यांना ठाऊक झालें होतें. तरी, आपण **लुसी**शीं लग्न करून त्याची फजिती करून त्याला **सर विलियम**च्या किल्ल्यांतून हुसकावून लावून देशोधडीला लावण्याचा बेत **बकलॉ**नें मनांत केला व तो **क्रेगनगेल्ट**ला म्हणाला, "हा बेत तडीस जाण्यास तुझी कठीण व नाजूक कामांत मला मदत पाहिजे." तो म्हणाला, " मित्राकरितां मी पाहिजे तें करण्यास तयार आहे." **बकलॉ म्हणाला**, " माझ्या बेताच्या सिद्धयर्थ **लेडी अॅशटन** येथें लवकर येणें आवश्यक आहे. **नार्दंबर्लंड** परगण्यामध्यें राहणारी **लेडी ब्लॅंकेनसॉप** माझी दूरची नातेवाईक आहे. तिच्या येथें सध्यां **लेडी अॅशटन** गेल्या आहेत. तेथें त्यांनीं माझें **लुशी**शीं लग्न ठरविण्याचा विचार चालविला आहे. इकडे तर **सर विलियम**च्या मनांत **लुसी रॅव्हन्सवुड**ला देण्याचा बेत दिसतो. तरी, **रॅव्हन्सवुड**चें किल्ल्यांत राहणें व त्याची **लुसी**शीं सदा संगती याबद्दल **लेडी अॅशटन**ना बातमी देऊन त्यांना लवकर घरीं येण्यास सांगावें. पण तुझा तेथें योग्य सत्कार होण्याकरितां तूं सभ्य पोशाख, सभ्य भाषा व सभ्य वर्तणूक यांचा अंगीकार केला पाहिजे. याकरितां हे पैसे घे व माझ्या तबेल्यांतील उत्तम घोडा घे." ही कामगिरी करण्याचें **क्रेगनगेल्ट**नें आनंदानें कबूल केलें. मग त्यांनीं **लुसी**च्या नांवानें मद्य-प्राशन केलें.

नवीन पोशाख करून व उत्तम घोड्यावर बसून **क्रेगनगेल्ट** आपल्या कामगिरीवर गेला व त्या बायांना भेटला. पहिल्याच भेटीला त्यानें त्यांच्यावर आपली छाप पाडली. त्यानें **रॅव्हन्सवुड** किल्ल्याकडील **रॅव्हन्सवुड-लुसी**च्या सर्वतोमुखीं झालेल्या भावी लग्नाची बातमी **लेडी अॅशटनला** तर सांगितली; शिवाय, **रॅव्हन्सवुड**चा नातेवाईक **मार्किस** किल्ल्यांत पाहुणा म्हणून येणार असल्याची खबरही त्यानें तिला सांगितली. आपला नवरा स्वपक्षत्यागी (turn-coat) होऊं पाहत आहे हें कळून तर तिला

जास्तच राग आला. म्हणून **मार्किस**च्या आगमनाचे आधीं पोंहोंचण्याच्या इराद्याने ती सहा घोड्यांच्या गाडीत, **कॅप्टन क्रेगनगेल्ट**ला आपला मुख्य **दरबारी** सरदार (Chief courtier) बनवून व इतर घोडेस्वार बरोबर घेऊन नवऱ्यास न कळवितां तातडीने निघाली.

इकडे मार्किस येण्याचा दिवस उजाडला. **सर विलियम**नें स्वागताची जय्यत तयारी करून बाराच्या सुमारास सर्व मंडळी गच्चीवर येऊन पश्चिम दिशेकडील वृक्षराजीच्या मार्गाकडे टक लावून बसली. त्यांना दूरवर आकाशांत उडणारी धूळ दिसली. पूर्वदिशेच्या तशाच वृक्षराजीच्या मार्गा-कडे **हेन्री**नें दृष्टि टाकली; तो तिकडूनही धुळीचा लोट येत आहे असें त्याला दिसलें व आपली आई **लेडी ॲशटन** येत असावी असें आघाडीच्या दोन स्वारांच्या विशिष्ट पेहेरावावरून (livery) त्याला वाटलें. ती बातमी कळतांच **लुसी** भीतीनें कावरीबावरी झाली. **सर विलियम**ची तर गाळण उडाली. **रॅव्हन्सवुड**ला ते न आवडून तो **लुसी**ला म्हणाला, "घरची धनीण फार दिवसांनीं घरीं येत असता आनंद वाटावा कीं भीति वाटावी व घाबरगुंडी व्हावी ?" **लुसी** उत्तरली, "तुम्हाला आमच्या आईचा स्वभाव ठाऊक नाहीं. तुम्हांला येथें पाहून ती काय म्हणेल व काय करील कोण जाणे!" **लुसी**च्या प्रश्नार्थक उद्गारानें रागावून त्यानें खालीं जाऊन आपला घोडा सज्ज ठेवण्यास नोकरास हुकूम केला व मग तो वर आला व पाहतो तों सर्व मंडळी खालीं गेलेली! तो एकटा गच्चीवर काय होतें याची वाट पाहत बसला.

इतक्यांत दोन्ही गाड्या समोरासमोर येऊन हाकणारांमध्यें प्रथम पोर्च-मध्यें जाण्याची चुरस लागली. **लेडी ॲशटन**नें प्रथमतः गाडी पुढे काढ-ण्याची हाकणारास आज्ञा केली; पण लगेच आपण आपल्या नवऱ्याच्या सन्मान्य व मोठ्या दर्जाच्या पाहुण्याचा अपमान करीत आहों असें वाटून हाकणारास गाडी सावकाश चालविण्यास फेरआज्ञा केली. तदनुरूप ती गाडी सावकाश चालूं लागली.

**मार्किस**ची हिरवी गाडी पोर्चांत आली व उंच काठीचा, रुबाबदार, छाप पाडणारा (commanding), प्रमाणबद्ध शरीराचा व डोळयांत महत्त्वा-कांक्षी चमक असलेला माणूस गाडींतून उतरला. **लेडी ॲशटन**च्या मनोमय मूर्तीनें घाबरलेल्या **सर विलियम**नीं **मार्किस**चें स्वागत केलें व चुकून

**लेडी ॲशटन** म्हणून **मिस ॲशटन**शीं त्यांचा परिचय करून दिला. **लुसी** लज्जेनें काळवंडली. इतक्यांत भानावर येऊन **सरसाहेब** म्हणाले, "मी चुकलों, ही माझी मुलगी **मिस ॲशटन.** परंतु **लेडी ॲशटन**ची गाडी पोर्चमध्यें येत असल्यामुळें माझ्या तोंडून भलतेच शब्द निघाले." मार्किस म्हणाले; "तुम्हांला खेद वाटण्याचें कारण नाहीं. तुम्ही तुमच्या पत्नीचें स्वागत करण्यास खुशाल जा. मी **मिस ॲशटन**चा जास्त परिचय करून घेतों." तदनुरूप **सर विलियम** पोर्चमध्यें जाऊन **लेडी ॲशटन**ला गाडींतून उतरण्यास मदत करूं लागले. परंतु त्यांचा हात दूर सारून **कॅप्टन क्रेगनगेल्ट**च्या हाताची मदत घेऊन ती मोठ्या दिवाणखान्यांत आली व तिनें **मार्किस मास्तर**शीं बोलत आहे असें पाहिलें. **मार्किस** व **मास्तर** यांखेरीज सर्वांच्या चेहऱ्यांवर त्रेधा उडाल्याचें दिसत होतें. **सर विलियम** आपल्या पत्नीचा परिचय करून देतील अशी क्षणभर वाट पाहून **मार्किस** स्वतःचा परिचय स्वतःच करून देतांना म्हणाले, "**लॉर्ड कीपर**नीं आतांच आपल्या मुलीचा पत्नी म्हणून परिचय करून दिला. त्यांना पत्नीचा आपली मुलगी म्हणून सहज परिचय करून देतां आला असता. कारण, तुम्ही **मिस ॲशटन**सारख्या दिसत आहांत. तुमचा जुना मित्र म्हणून मी येथें आलों आहे. ही भेट शांतताप्रस्थापक ( peace-making ) आहे. म्हणून माझा पुतण्या तरुण **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड** याचा मी तुम्हांला परिचय करून देतों." **लेडी ॲशटन** म्हणाल्या, **सर विलियम**पाशीं माझें जरूरीचें व निकडीचें काम आहे. म्हणून मी त्यांना घेऊन क्षणभर माझ्या खासगी खोलींत जातें." नंतर ती पुढें गेली व तिच्या मागोमाग **सर विलियम** गेले. दोघेंही खोलींत गेल्यावर तिनें खोलीचें दार लावून घेतलें व मग ती म्हणाली, "**लॉर्डसाहेब**, माझ्या पश्चात् तुम्ही जे संबंध जोडलेत त्याबद्दल मला आश्चर्य वाटतें. ते तुमच्या जन्माला व तुमच्या माणुसकीला योग्य आहेत. पण तुमच्या वर्तनानें मला निराश केलें आहे." **लॉर्ड कीपर** म्हणाले, "माझ्या लाडके **एलिनार**, तुम्ही मी काय म्हणतों तें शांततेनें ऐका म्हणजे माझ्या घराण्याच्या हिताकरितां व योग्यतेकरतां मीं काय केलें आहे तें मी सविस्तरपणें सांगतों." ती म्हणाली, "तुमच्या घराण्याचें हित व योग्यता याकडे तुम्हीं लक्ष देऊं शकाल हें मी जाणतें. पण, माझ्या घराण्याचें हित व योग्यता तुमच्याशीं निगडित

असल्यामुळें मला त्याच्याकडे पाहिलें पाहिजे." तिचे पति म्हणाले, "**लेडी ॲशटन** तुमची काय इच्छा आहे? मीं काय करावें असें तुमचें म्हणणें आहे?" ती म्हणाली, "तुमच्या सदसद्बुद्धीला विचारा. तुम्ही स्वपक्षत्यागी (renegade) होत आहांत; व आपल्या एकुलत्या एक मुलीचें लग्न **जाकोबाइट**पक्षीय, भुकेबंगाल व तुमच्या घराण्याच्या **अनिवार्य** शत्रूशीं करून देण्याच्या बेतांत आहांत?" **सर विलियम** म्हणाले, "माझ्या मुलीचा व माझा जीव वांचविणाऱ्या तरुण सद्गृहस्थाला घरांतून घालवून लावूं?" ती म्हणाली, "**कॅप्टन क्रेगनगेल्ट** व दुसरे पाहुणे भोजनास यावयाचे असल्यामुळें तुम्हांला किल्ल्यात राहतां येणार नाहीं असें खालीं जाऊन **रॅव्हन्सवुड**ला सांगा." भित्र्या माणसाचें मन ज्या प्रकारचा सल्ला देते तसा मनाचा सल्ला मिळून **सरसाहेब** म्हणाले, "**मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड**ला असभ्यपणें जा म्हणून मी कधींही सांगणार नाहीं. तुम्हांला त्याचा अपमान करावयाचा असेल तर तो तुम्ही स्वतःच्या जबाबदारीवर करा. पण मी अशा विपरीत वर्तनांत भागीदार होणार नाहीं." ती म्हणाली, "तर मग, घराण्याचा मान राखण्याचें काम मलाच केले पाहिजे." असें बोलून तिनें एक चिठी खरडली व आपल्या मोलकरणीस ती **रॅव्हन्सवुड**ला देण्यास फर्माविले. अर्थात् तिनें ती त्याला दिली. त्यानें वाचून ती **मार्किस**ला दिली. दोघेहि रागावले व तत्काळ जाण्यास निघाले. पण इतक्यांत, **सर विलियम**नीं **मार्किस**ची सखेद पण आग्रहाची विनंति केली कीं, निदान सायंकाळपर्यंत तरी राहावें. **मास्तर रॅव्हन्सवुड**-बद्दलचा **लेडी ॲशटन**चा गैरसमज दूर करण्याकरितां व राजकीय कामाकरितां थांबावें अशा इच्छेनें **मार्किस**नें मोठ्या नाखुषीनें थांबण्याचें कबूल केलें व ते **मास्तर**ला म्हणाले, "तूं येथून पांच मैलावर असलेल्या **टॉड्स होल** नांवाच्या खाणावळींत जाऊन तेथें थांब. मी आज संध्याकाळीं किंवा उद्यां सकाळीं खात्रीनें तेथें येतों. मग आपण आपल्या गाडींतून घरीं जाऊं." तदनुरूप **मास्तर** किल्ल्यांतून बाहेर पडला. झालेल्या प्रकारावर विचार करीत व आंधळ्या **ॲलीस**नें केलेल्या भविष्याची व उपदेशाची आठवण करीत तो खाणावळीस पोंहोचला. तेथें त्याला ती वारल्याचें कळलें. म्हणून तिच्या झोपडीकडे जाऊन तिच्या इच्छेप्रमाणें तिचें प्रेत पुरण्याची व्यवस्था करून व त्याकरितां लागणाऱ्या खर्चाचे पैसे देऊन तो **टॉड्स होल**मध्यें

परत आला व दुःखित मनानें **मार्किस**ची वाट पाहत बसला. तो दिवस व ती रात्र त्यानें कशीबशी त्या खाणावळींत काढली. सकाळीं **मार्किस**-साहेब आपल्या परिवारासह खाणावळींत आले. झालेल्या प्रकाराबद्दल व भावी राजकीय घडामोडीबद्दल त्यांचें पुष्कळ वेळ बोलणें झालें. तसें झाल्यावर आपल्या पुतण्यास परदेशीं त्याच्या योग्य काम देण्याचें व तेथपर्यंत त्याला आपल्या येथें आश्रय देण्याबद्दल **मार्किस**नीं कबूल केलें. त्याबद्दल **रॅव्हन्सवुड**नें त्याचे आभार मानले. खाणावळवाल्यानें मोठ्या पाहुण्यांची त्याच्याकडून होईल तितकी उत्तम व्यवस्था केली. सायंकाळीं व रात्रीं आपण **वूल्फ्सक्रॅग**मध्यें राहूं म्हणून **मार्किसनें** म्हटलें. तेथें सध्यां कांहीं एक सामान नाहीं व थोडया अवकाशांत व्यवस्था होणार नाहीं म्हणून **मास्तरनें** पुष्कळ सांगून पाहिलें, पण **मार्किस** ऐकेनात; म्हणून त्यानें **मार्किसच्या** नोकरास पुढें पाठविलें. पण, थोडयाच वेळांत **वूल्फ्सक्रॅगला** आग लागली म्हणून सांगत ते परत आले.

**संकटें कधीं एकटीं येत नाहींत** ( Misfortunes never come single ) असें वाटून **रॅव्हन्सवुड** खरोखरी काय झालें हें पाहण्याकरितां तडक **क्रॅगच्या** आवारांत गेला. तेथें त्याला **कॅलेब** भेटला. त्यानें पाहुण्यांनीं रात्रीं राहण्यास येऊं नये म्हणून आपण जुन्या गवतकाडीला व पुष्कळ दिवसाच्या सांचलेल्या कचऱ्याला आग लावून दिली; बुरूज, आंतील सामानसुमान व **मायसी** स्वयंपाकीण सुरक्षित आहे असें सांगितलें. तेव्हां **मास्तर**चा जीव खालीं पडला. त्यानें आपली पैशाची पिशवी त्याला **देऊन** आपण **मार्किसकडे** राहण्यास जात आहों व त्याच्या वशिल्यानें परदेशांत आपल्यायोग्य काम मिळणार आहे असें सांगून तो खाणावळींत परत आला व त्यानें **मार्किस**ला आग विझविल्याचें व पुरातन बुरूज, सुरक्षित राहिल्याचें वृत्त सांगितलें. ती रात्र त्यांनीं खाणावळींत काढली. सकाळीं निघून ती मंडळी **एडिंबरोस** सुखरूप पोंहोचली व **मार्किस**च्या घरीं **मास्तर** राहूं लागला.

दरम्यान **मार्किस**च्या अपेक्षेप्रमाणें स्कॉटलंड व इंग्लंड या दोन्ही ठिकाणीं **टोरीपक्षाचें** मताधिक्य होऊन तो पक्ष अधिकारारूढ झाला. तदन्वयें **व्हिग**पक्षीय लोकांच्या अधिकाराच्या जागा **टोरी**पक्षांतील लोकांना देण्यांत

आल्या. **सर विलियम अॅशटन**ची **लॉर्ड कीपर**ची जागा जाऊन तो निकामी झाला. कबूल केल्याप्रमाणें **मार्किस**नें **रॅव्हन्सवुड**च्या अन्याय्य निकालाविरुद्ध इंग्लिश **हाउस ऑफ कॉमन्स**पुढें तक्रारी-अर्ज (appeal) करण्याची तयारी केली. पण, **रॅव्हन्सवुड**नें **लुसी**च्या प्रेमाखातर समेट करण्याच्या इराद्यानें आपलें वडिलोपार्जित वैर विसरून तीन पत्रें लिहिलीं. पहिलें पत्र **लॉर्ड कीपर**ला होतें. त्यात त्यानें **लुसी**ची व आपली लग्नाबद्दल **आणभाक** (engagement) झाली असल्याबद्दल त्याना कळवून त्यांच्या संमतीची विनंति केली. **लेडी अॅशटन**च्या पत्रांत तोच मजकूर होता, आणखी आपल्या घराण्याचा **डगलस** घराण्याशीं अनेकदां झालेला संबध लक्षांत आणून व वैरभाव विसरून लग्नाला संमति देण्याची कळकळीनें विनंति केली होती. तिसरे पत्र **लुसी**ला होते. त्यांत त्यानें आपण तिच्या आईबापांची संमति मिळविण्याकरितां लिहिलेल्या पत्राचा उल्लेख केला असून, आपलें तिच्यावर प्रेम अढळ आहे, तसेंच तीही ठेवील व त्या प्रेमाला दुसरी दिशा लावण्याचा कोणी प्रयत्न केल्यास तो ती पार पाडूं देणार नाहीं अशी आशा व्यक्त केली होती. त्याच्या तिन्ही पत्रांना लगेच उत्तरें मिळालीं.

**सर विलियम**नें आपल्याला कुटुंबाच्या दुराग्रहाविरुद्ध तूर्त जातां येत नाहीं, पण काळ सुधारणा घडवून आणील, तरी घाईने कांहींही करूं नये असा मजकूर होता. **लेडी अॅशटन**चें उत्तर तर अत्यंत उद्धटपणाचें व अपमानकारक शब्दांनीं भरलेलें होतें व त्यांत **लुसी**चे नाव कायमचे सोडण्याचा **मास्तर**ला उपदेश केला होता. **लुसी**चे उत्तर फारच लहान होतें; त्यांत तिनें पुन्हा पत्र लिहिण्याच्या भानगडीत पडूं नये; त्यामुळें मला त्रास होईल असें लिहिलें होतें; सध्या मी दुर्दैवाच्या कचाट्यांत सांपडलें आहे; जोंपर्यंत माझी विचारशक्ति कायम आहे, तोंपर्यंत मी आपल्या आणभाकेला जागेन हा विश्वास ठेवा; तुम्ही सुखी असून तुमची सुस्थिति झाली आहे याबद्दल मला समाधान वाटत आहे असा मजकूर होता. या उत्तरांनीं त्याची पूर्ण निराशा झाली. लगेच **मार्किस**च्या शिफारशीने मिळालेल्या महत्त्वाच्या कामगिरीवर तो परदेशीं निघून गेला.

**रॅव्हन्सवुड**ची आडकाठी नाहींशी केल्यावर **लेडी अॅशटन**नें मुलीच्या कल्याणाकरितां आपल्या कारस्थानास सुरुवात केली. **लुसी**ची उदासीनता व तिची अशक्तता या सबबीवर **लुसी** व **बकलॉ** यांच्या फारशा भेटी तिनें

घडवून न आणतां **बकलॉ**वर तिचें प्रेम जडत आहे व तिला पूर्वीच्या तिच्या वर्तनाबद्दल वाईट वाटत आहे असें **बकलॉ**ला सांगितलें. **बकलॉ**पेक्षां अधिक चाणाक्ष माणसाच्या ध्यानांत आलें असतें कीं, **लुसी** ही आपल्या आईच्या आग्रहानें व तिच्या दडपणानें आपल्याशीं लग्न करण्यास तयार झाली आहे; पण ती वस्तुतः नाखूष आहे. **लेडी ॲशटन**ची इच्छा हा विवाह लवकर घडून यावा ही होती. पण, या बाबतींत मात्र **लुसी**वर तिची जबरदस्ती चालूं शकली नाहीं. अढळ निश्चयानें ती म्हणे, "**मास्तर**पाशीं मीं जी आणभाक वाहिली आहे व जो करारनामा लिहून दिला आहे त्यापासून त्यानें मला मुक्त केल्याचें पत्रानें किंवा स्वमुखानें कळविलें म्हणजे मी तुझ्या इच्छेप्रमाणें वागेन."

हें साधण्याकरितां **लेडी ॲशटन**नें **मास्तर**ला लिहिलेलीं तिचीं पत्रें त्याला न मिळण्याची तजवीज करून '**मौनता संमति दर्शविते**' (silence shows consent) या तत्त्वाचा अवलंब करून **लुसी**चें मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण ही पळवाट (subterfuse) **लुसी**ला पसंत होईना. म्हणून तिनें चेटकी मानलेल्या एका वृद्ध बाईला **लुसी**ची दाई म्हणून नेमिलें. तिनें **रॅव्हन्सवुड** घराण्यांतील पुरुष किती भयंकर, गैरविश्वासू व प्रियपात्राचा नाश करणारे आहेत अशाबद्दलच्या खऱ्याखोट्या गोष्टी **लुसी**च्या कानांवर घातल्या; पण **सर विलियम**च्या आग्रहावरून त्या बाईला दूर करण्यांत आलें.

मग एका पाद्र्याकडून तिला अपत्यांचें आईबापांविषयीं कर्तव्यकर्म व विवाहविषयक वचनाच्या मर्यादा याबद्दल **बायबल**मधून आधार काढून दाखविण्यांत आले. **लुसी**नें त्या पाद्र्याजवळ आपली प्रेमकहाणी मनमोकळेपणानें सांगितली. तेव्हां तिचें म्हणणें योग्य आहे असें त्यास वाटून तिची त्याला दया आली व म्हणून तो म्हणाला, "**मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड** जेथें सध्यां आहे तेथें माझा एक पाद्री बंधु जातो येतो. तेव्हां तुमच्या मातोश्रीनें तुमच्याकडून लिहून घेतलेल्या पत्राप्रमाणें तुम्ही एक पत्र लिहा; तें मी **रॅव्हन्सवुड**ला बिनाविलंब व बिनचूक मिळण्याची व्यवस्था करतों; त्याचें उत्तर खात्रीनें **सेंट ज्युडस** सणाचे आधीं येईल." तदनुरूप तिनें पत्र लिहिलें व तें ताबडतोब धाडण्यांत आलें.

यामुळें **लेडी ॲशटन**नें किती दिवस उत्तराची वाट पाहणार असें **लुसी**ला

विचारलें तेव्हां तिनें चटदिशीं उत्तर दिलें, " **सेंट ज्युडस्**सणापर्यंत. मग मी तयार आहे." या तिच्या कबुलीनें सर्वांना आनंद झाला. मग तिच्या लग्नाची जंगी तयारी सुरू झाली. **सेंट ज्युडस** सणाचे दिवशीं विधियुक्त विवाह करण्याचें ठरलें. त्याचे चार दिवस आधीं धर्माधिकाऱ्याला कायदेशीर नोटीस देण्यांत आली. **सेंट ज्युडस**चा दिवस उगवला; बारा वाजण्यापूर्वी सर्व विधि पुरा झाला म्हणजे लग्न सुखदायक होतें या समजुतीस्तव तसें करण्याचे ठरलें.

**लुसी**ला वैभवदर्शक सुंदर पोशाख घालण्यांत आला. तिच्या केसांत तर इतके हिरे घातले गेले कीं, त्यांचा सतेज प्रकाश व तिच्या अंगकांतीचा फिकटपणा यामध्यें विलक्षण विरोध दिसून आला. **लेडी ॲशटन**नें **लुसी**चा हात धरून तिला विवाहस्थळीं आणलें. **सर विलियम**, कर्नल **डगलस ॲशटन**, **बकलॉ** व त्याचा सोबती **क्रेगनगेल्ट** व धर्माधिकारी ही मंडळी तेथें आधींच आली होती.

लगेच धर्माधिकाऱ्यानें प्रसंगानुरूप प्रार्थना केली. ती संपल्याबरोबर विवाहपत्रावर **सर विलियम**, **कॅप्टन डगलस** व **बकलॉ** यांनीं यथाक्रम सह्या केल्या. शेवटीं **मिस ॲशटन**ची पाळी आली. ती प्रथम कोरड्या पेनानें सही करूं लागली; पण ती गोष्ट **लेडी ॲशटन**च्या लक्षांत येतांच तिनें रुप्याची दौत **लुसी**पुढें केली. पण, तिचा हात कापल्यामुळें अक्षरें बरोबर उठली नाहींत. शेवटची सही तर अर्धवट (incomplete), अस्पष्ट (defaced) व चिताडलेली (blotted) होती; इतक्यांत घाई-घाईनें येणाऱ्या घोडेस्वाराच्या टापा **लुसी**ला ऐकूं आल्या व तिच्या हातून पेन खालीं पडून ती किंचित् किंकाळत ओरडली " ते आले—ते आले."

सर्व मंडळी आश्चर्यचकित होऊन इकडे तिकडे पाहत आहेत तोंच काळा घोडेस्वारी पोशाख केलेला, दुःखानें, रागानें व लांबच्या घोडदौडीमुळें त्रासलेला **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड** दिवाणखान्याच्या मधोमध व **लुसी**समोर येऊन उभा राहिला! दोन क्षणभर कोणीच बोललें नाहीं. प्रथम **लेडी ॲशटन**नें बोलण्याचें धारिष्ट करून **मास्तर**ला विचारलें. " तुम्ही अनाहूत आगंतुक (uninvited intruder) येथें कां आला?" **कॅप्टन डगलस** व नवरदेव **बॅकलॉ** यानीं त्याच्याकडे रागीट मुद्रेनें पाहिलें. त्यांच्याकडे वळून तो म्हणाला, " सद्गृहस्थ हो, तुम्ही स्तब्ध रहा. माझें काम

**मिस ॲशाटन**जवळ आहे." असें बोलून व तिच्याकडे वळून तिचें शेवटचें पत्र तिला दाखवून त्यानें तिला विचारलें, " बाईसाहेब, हें पत्र तुमच्या हातचेंच आहे काय ? " तिच्या तोंडून अडखळत 'होय' म्हणून उत्तर आलें. नंतर परस्परांच्या कारारनाम्याचा कागद तिचेपुढें करून त्यानें पुन्हा तिला विचारलें, " हाही कागद तुमच्या हातचाच आहे ना ? " याला तिनें उत्तर दिलें नाहीं. भीति व गोंधळलेलें मन यांमुळें तिला विचारलेल्या प्रश्नाचा अर्थ बहुधा कळला नसावा. **सर विलियम** म्हणाले, " या कागदावरून जर कांहीं कायदेशीर हक्क स्थापन करण्याचा तुमचा इरादा असला, तर गैरकायदा प्रश्नाला उत्तर मिळण्याची तुम्ही अपेक्षा धरूं नका." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, " **सर विलियम ॲशाटन,** तुम्हांला व माझें बोलणें ऐकणारांना मला सांगावयाचें आहे कीं, माझ्या इराद्याबद्दल गैरसमज करून घेऊं नका. जर पत्रावरून दिसतें त्याप्रमाणें या तरुण स्त्रीला राजीखुषीनें आपला करारनामा माघारी घ्यावयाचा असेल, तर या कागदाची किंमत वाळलेल्या पानाइतकीही मी मानणार नाहीं. परंतु, तिच्या तोंडून खरें काय आहे तें मला ऐकलें पाहिजे व मी तें ऐकणार; त्याखेरीज मी येथून हलणार नाहीं; तुम्ही माझ्यापेक्षां संख्येनें अधिक आहांत, पण मी जिवावर उदार झालेला सशस्त्र माणूस आहे. तेव्हां पुष्कळ बळी घेतल्याखेरीज मी मारला जाणार नाहीं. हा माझा निश्चय आहे. त्याला तुम्ही हवें तें नांव द्या." असें म्हणून त्यानें तलवार उपसली व पट्ट्यांतील पिस्तूल हातांत घेतलें; पण दोन्हींचीं टोकें जमिनीकडे रोखून तो म्हणाला, "तुम्ही हा दिवाणखाना रक्तानें भरवणार किंवा देवाच्या व देशाच्या कायद्यानुरूप मला माझ्या **वाग्दत्त** (affianced) वधूशीं निर्णायक भेट ( decisive interview ) घेऊं देणार ? "

यावर पाद्री प्रथम बोलला, " या सद्‌गृहस्थाची मागणी सयुक्तिक आहे. केलेल्या विवाह-करारनाम्याबद्दल आपल्याला पश्चात्ताप झाला असून आतां आपण वडिलांच्या इच्छेप्रमाणें वागण्याचें ठरविलें आहे असें **लुसीला** स्वमुखानें म्हणूं द्या; म्हणजे तो येथून निघून जाईल." आश्चर्य व भीति नाहींशा झाल्यामुळें राग येऊन **लेडी ॲशाटन** उत्तरली, " नाहीं, **वाग्दत्त वधू** माझी मुलगी इजला मी या परक्याशीं खासगी भाषण करूं देणार नाहीं. ज्यांना बाहेर जायचें असेल त्यांनीं खुशाल जावें. मी येथें राहणार." पाद्री म्हणाला, " याला **रॅव्हन्सवुड** आक्षेप घेणार नाहीं. मीही जवळच

उभा राहतों." **रॅव्हन्सवुड** म्हणाला, "तुम्ही दोघेंजण जवळ राहण्यास माझी हरकत नाहीं. पण बाकीच्यांनीं बाहेर जावें." त्याप्रमाणें सर्वजण बाहेर गेले. मग, **रॅव्हन्सवुडनें** दार लावलें; व तो आपली टोपी काढून व केस बाजूला सारून **लुसीला** म्हणाला, "**मिस ॲशटन** मी अजून **एजर रॅव्हन्सवुड** आहेना कीं ज्यानें तुझ्या प्रेमाखातर आपली सूडबुद्धि सोडून, वडिलाचा छळ करणारा, लूट करणारा, बेअब्रू करणारा व खून करणारा ( oppressor, pillager, traducer and murderer ) याच्याशीं सख्य केलें." **लेडी ॲशटन** म्हणाली, "तुमच्या विषारी भाषेवरून **लुसीच्या** वडिलांचा घातक शत्रु तिच्याशी बोलत आहे हे तिला कळलें." **रॅव्हन्सवुड** उत्तरला, "बाईसाहेब, तुम्हांला शांत राहण्याची मी विनंति करतों." **लुसीकडे** वळून त्याने पुनः विचारलें, "जो पवित्र करारनामा तूं आतां मागें घेऊं व रद्द करूं इच्छितेस तो करारनामा तूं स्वेच्छेने माझ्याशीं केला होतास ना?" **लुसीच्या** रक्तहीन ओठातून अडखळत शब्द बाहेर आले, "माझ्या आईनें तें करविलें." **लेडी ॲशटन** म्हणाली, "ती खरें बोलते. दैवी व मानवी कायद्यान्वयें मीच तिला हतभागी व अविचाराचा करार रद्द करण्याची सल्ला दिली." तिनें पाद्र्याकडे पाहून त्याला बायबलमधला आधार काढून दाखविण्यास विनविलें. त्यानें बायबल उघडून त्यांतून वाचलें, "जर एखाद्या स्त्रीने बापाच्या घरांत राहत असतांना विवाहाची आणभाक घेतली व तिच्या बापाला ती कळून तो स्वस्थ राहिला, तर ती आणभाक कायदेशीर आहे." **रॅव्हन्सवुड** मध्येंच म्हणाला, "आमच्यासंबंधी अशीच गोष्ट घडली नव्हती काय?" पाद्री म्हणाला, "शांतपणें पुढें ऐका. पण, जर तिच्या बापाला कळल्याबरोबर त्यानें ती नाकारली, तर ती व्यर्थ होईल." **लेडी ॲशटन** जोरानें व विजयानें उद्गारली, "या बायबलांतील कायद्याप्रमाणें थेट आमच्या येथली गोष्ट झाली नाहीं काय? आईबापांना कळल्याबरोबर त्यांनीं **लुसीचा** करार व आणभाक अयोग्य असून पुरी करण्यासारखी नाहीं असें या माणसाला मुखाने व चिठ्ठीनें कळविलें नव्हतें काय?" **लुसीकडे** वळून **रॅव्हन्सवुड** म्हणाला, "हेंच काय तुला म्हणावयाचें आहे? पाद्र्यानें दाखविलेल्या तिरस्करणीय व वरपागी शब्दच्छलाच्या आधारावर राजीखुषीनें व परस्परप्रेमानें शपथपूर्वक केलेला करार तूं रद्द

करण्यास इच्छितेस काय?" **लुसी**च्या ऐवजीं **लेडी अॅशटन** उत्तरली, "**मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड**, लुसीच्या चेहऱ्यावरून तुम्हांला कळेल कीं, तुमच्या प्रश्नाचें उत्तर देण्यास ती समर्थ नाहीं; पण करार रद्द करण्याबद्दल तिच्या हातचें पत्र तुमच्याजवळ आहे. पण त्यापेक्षांही ताजा व पूर्ण पुरावा म्हणजे तिनें थोड्या वेळापूर्वीं सही करून पुरा केलेला नवा विवाह-करारनामा पाहा. हा या पाद्रीसाहेबांच्या देखत झाला आहे." असें बोलून तिनें **बकलॉ** व **लुसी** यांनीं सह्या केलेला करारनामा **मास्तर**ला दाखविला. दिङ्मूढ मनानें त्यानें तो कागद वाचला व पाद्र्याकडे पाहून त्यानें विचारलें, "फसवणुकीनें किंवा जुलूमजबरदस्तीनें या करारनाम्यावर **मिस अॅशटन**नें सही केली नाहीं ना?" पाद्री उत्तरला, "माझ्या पवित्र धर्माला स्मरून मी सांगतों कीं, तसा कांहीं प्रकार झाला नव्हता." **रॅव्हन्सवुड** कठोरपणें म्हणाला, "हा पुरावा नाकारण्यासारखा नाहीं; तेव्हां, निरर्थक कानउघाडणी करणें किंवा खरडपट्टी काढणें (remonstrance or reproach) हीं सारखींच अनावश्यक व लाजिरवाणीं आहेत." सही केलेला कागद व सुवर्ण नाण्याचा तुकडा **लुसी**समोर ठेवून तो म्हणाला, "तुझ्या पहिल्या आणभाकेचे हे पुरावे आहेत. माझ्या चुकीच्या विश्वासाचीं—नव्हे अवलक्षणी मूर्खपणाचीं—प्रतिचिन्हें परत करण्याची मी तुला तसदी देतों." तिनें आपल्या प्रियकराच्या उपहासात्मक नजरेला अवलोकनहीन नजर भिडविली. त्याच्या म्हणण्याचा अर्थ कळल्यासारखें करून तिनें आपल्या गळ्याभोंवतीं बांधलेल्या फितीची गाठ सोडण्याकरितां आपले हात उचलले; पण तिला गाठ सोडतां न आल्यामुळें **लेडी अॅशटन**नें फीतच तोडली; व तींतून सुवर्णनाण्याचा तुकडा वेगळा केला. विवाहाचा करारनामा तिनें लपवून आपल्याजवळ ठेवला होता. अभिमानी सभ्यपणानें **लुसी**नें दोन्ही पदार्थ **रॅव्हन्सवुड**ला दिले. सुवर्णनाणें पाहून त्याचें मन कोमल झालें. तो स्वतःशीं म्हणाला, "तिनें तें नाणें अजून आपल्या हृदयाशीं बाळगलें होतें." डोळ्यांत आलेलें अश्रू पुसून कठोरपणें तो म्हणाला, "तक्रारीचा काय उपयोग?" मग तो विस्तवाच्या चुलाण्याजवळ गेला व त्यांतील कोळसे बुटानें हालवून व ते पेटवून त्यानें तो कागद व तें नाणें जळत्या कोळशांवर टाकलें. **लेडी अॅशटन**कडे वळून नंतर तो म्हणाला, "मी आतां येथें अनाहूत आगंतुकासारखा राहत नाहीं." तुमच्या दुष्ट इच्छा व कारस्थानें यांची मुलीच्या मानाला व सुखाला

पुन्हा जरूरी न पडो." मग **लुसी**कडे वळून तो म्हणाला, "बाईसाहेब, मला अधिक कांहीं बोलावयाचें नाही. मी परमेश्वराची प्रार्थना करतों कीं, या बुद्धिपूर्वक व जाणूनबुजून घेतलेल्या खोट्या शपथेमुळें तुमचें नांव जगाच्या आश्चर्यमालिकेंत न जावो." असें बोलून **रॅव्हन्सवुड** दिवाणखान्यांतून निघून गेला. बाहेर आल्यावर तो आपल्या घोड्यावर स्वार होऊन **वूल्फ्स-क्रॅग**कडे प्रथम सावकाश व मग जलद गेला.

वर वर्णिलेल्या विलक्षण प्रसंगानंतर **लुसी** वेडसरासारखी वागूं लागली. विशेषतः ती वारंवार आपल्या गळयाभोंवतीं हात फिरवी व आपलें कांहीं तरी हरवलें आहे असें कळून दुःखी चेहरा करी. ती कधीं फाजील उदासीन दिसे, तर कधीं फाजील उल्लसित दिसे. तिच्या मनाची ही स्थिति जाणून **लेडी ॲशटन**नें तिला कोणालाही भेटूं दिलें नाही. विशेषतः **बकलॉ**ला तिची मनःस्थिति कळूं नये अशाबद्दल तिनें फार खबरदारी घेतली.

**लेडी ॲशटन** व **कॅप्टन डगलस** यांनीं निश्चित तिथीला विवाहविधि व तन्निमित्त मेजवानी, नाच वगैरे सामाजिक समारंभ उरकण्याचें ठरविलें. तदनुरूप दोन्ही घराण्याच्या वैभवाला शोभेशी तयारी करण्यांत आली. दोन्ही बाजूचे नातेवाईक, आश्रित व कुळेंडाळें अशी मंडळी जमत चालली.

सकाळींच **लुसी**ला उंची दागदागिने व उत्तम पोशाख घालण्यांत आला. **हेन्री**नें आपला नवा पोशाख घातला व त्याबरोबर आलेली तरवार हरवली म्हणून **डगलस**ची लांब तलवार घेऊन घोड्यावर स्वार होऊन तो तिच्या-बरोबर निघाला. सर्व मंडळी बंदुका व पिस्तुलें यांचे आवाज काढीत व **ॲशटन** व **बकलॉ** या नांवांच्या आरोळ्या मारीत गावाबाहेरील प्रार्थना-मंदिराशीं आली. मंदिराबाहेर जमलेल्या भिकाऱ्याना पुष्कळ भिक्षा घालण्यांत आली. धर्मविधि पुरे झाल्यावर मंडळी किल्ल्यांत परत येऊन मेजवानीस बसली. उत्तम उत्तम पक्वान्नें व उंची मद्य मेजावर ठेवण्यांत आलें.

नंतर नाचास सुरुवात झाली. नेहमींच्या रीतीप्रमाणें वधूवरानीं पहिला नाचाचा फेरा घ्यावयाचा. पण **लुसी**च्या नादुरुस्त प्रकृतीमुळे **बकलॉ**बरोबर **लेडी ॲशटन** नाचल्या. मग बाकीच्या नाचास सुरुवात झाली.

बरीच रात्र झाल्यावर **बकलॉ** व **लुसी** याना त्यांच्या खासगी खोलींत पाठविण्यांत आलें. दाराला कुलूप घातलें व त्याची किल्ली **हेन्री**जवळ दिली गेली. थोड्याच वेळांत त्या खोलींतून एक कर्कश व कानठळ्या बसविणारा

आवाज ऐकूं आला व सर्व आश्चर्यचकित झाले; तोंच पुन्हा तसाच आवाज झाला. त्याबरोबर **कर्नल ॲशटन**नें मशाल घेऊन खोलीच्या दाराशीं येऊन हाका मारल्या. पण गुदमरलेल्या कण्हण्याचा स्वर त्याला ऐकूं आला. तेव्हां त्यानें किल्ली मिळण्याची वाट न पाहतां दार फोडलें. तोंच त्याला दाराच्या उंबरठ्याशीं **बकलॉ** पडलेला असून ती जागा रक्तानें भरलेली आहे असें दिसलें. **कर्नल ॲशटन** खोलीशीं आलेल्या **लेडी ॲशटन**ला म्हणाला, "**लुसी**ला शोधा, तिनें नवऱ्याला मारलें असावें." लगेच शस्त्रवैद्य व पाद्री यांस बोलावून आणण्यांत आलें. त्यांनीं **बकलॉ**ला उचलून दुसऱ्या खोलींत नेलें. तेथें **बकलॉ**ची आप्तेष्ट मंडळी आली. शस्त्रवैद्यानें **बकलॉ**ची जखम तपासली व तो उद्गारला, "जखम जबर व भयंकर आहे, पण प्राणजाई नाहीं; मात्र त्याला येथून हलवितां येणार नाहीं." तेव्हां, **बकलॉ**चे चार नातेवाईक शुश्रूषा करण्याकरितां तेथें राहिले व बाकीचे परत गेले.

इकडे **लेडी ॲशटन** व **विलियम** यांनीं खोलींत **लुसी**ला शोधलें, शेवटीं ती खोलीच्या चुलाणाच्या भिंतीकडच्या धक्क्यावर बसलेली सांपडली. तिच्या कपड्यावर रक्त सांडलें होतें व ती वेड्यासारखी वाकुल्या दाखवीत होती. तिला धरून बाहेर काढतांना ती विकट हास्य करून म्हणाली, "तुमच्या छानदार ( bawny ) वराला घेऊन गेला ना." तिला पलंगावर निजविलें, पण तिला फेपऱ्याचे अनेक आचके आले व तिचें प्राणोत्क्रमण झालें. वेडाच्या लहरींत वधूनें वराला मारलें असा निकाल **कारोनर**नें दिला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं लुसीचें प्रेत **सर विलियम**नें आपल्या घराण्यांतील माणसांकरितां राखून ठेवलेल्या **कबरस्थानीं** नेण्यांत आलें. अगदीं निकटच्या नातेवाईकाखेरीज तेथें कोणीही नव्हतें. पण काळा सुतकी पोशाख केलेला एक माणूस **कर्नल डगलस ॲशटन**च्या नजरेस पडला. म्हणून, **लुसी**च्या प्रेताची पेटी पुरल्यावर तो त्या माणसाकडे गेला व माझ्यामागें या असें त्यास म्हणाला. त्याप्रमाणें ते दोघे एका एकांत स्थळीं गेले. मग, **कर्नल ॲशटन** कठोर व गंभीर स्वरानें त्यास म्हणाला, "तुम्ही **मास्तर ऑफ रॅव्हन्सवुड** नव्हे काय?" त्यानें होय म्हटलें. "तर तुम्हीच माझ्या बहिणीचा खून केला." तो दुःखावेगानें उत्तरला, "तुम्ही अगदीं खरें बोलला." मग **डग्लस मास्तर**ला म्हणाला, "याबद्दल तुम्हीं माझ्याशीं एकट्यानें द्वंद्वयुद्ध केलें पाहिजे. वेळ उद्यां सूर्योदयाबरोबरची व स्थळ

**वूल्फ्सहोम** गावच्या समुद्रकिनाऱ्यानजीकची वाळूची टेकडी." **मास्तरनें** कबुली दिल्याबरोबर **कर्नल ॲशटन** निघून गेला. त्यानें दिवस कसा तरी घालविला व सकाळीं वेळेवर पोंहोचण्याकरितां बऱ्याच रात्रीं तो **होप** गावच्या खाणावळींत निजला.

**मास्तर ऑफ रॅव्हन्सवुडनें** तो दिवस कसा घालविला हे कळलें नाहीं. पण बरीच रात्र झाल्यावर तो आपल्या **वूल्फ्सक्रॅग** बुरुजाकडे गेला. **कॅलेबनें** दार उघडून कोठच्या खोलींत बिस्तव व दिवा करूं म्हणून विचारलें. तो उत्तरला, "जेथें माझे वडील निजत व जेथें **लुसी** निजली होती तेथें बिस्तव व दिवा नेऊन ठेव व तूं जा." ती रात्र **रॅव्हन्सवुडनें** निद्रेशिवाय आपल्या दुर्दैवी घराण्याच्या इतिहासाचें सिंहावलोकन करण्यांत व आपण घराण्याचे शेवटचे पुरुष होणार या भविष्याबद्दल दुःखावेगानें विचार करीत जागून काढली. पहाटेस त्यानें शेजारच्या खोलीतून एक तरवार बाहेर काढली. **कॅलेबनें** दाराच्या भोकांतून तें पाहिलें व त्याला **मास्तरचा** हेतु कळला. म्हणून तो बाहेर आल्याबरोबर **कॅलेबनें** त्याचे पाय धरून "तुम्ही आज घराबाहेर पडूं नका; उद्या **मार्किस** येथें येत आहेत व ते सर्व व्यवस्था करतील" असें तो काकुळतीनें म्हणाला. पण **मास्तरनें** "माझें दुर्दैव माझ्या पाठीस लागलें असतांना मी किती काळ असा काढणार! आता तूं माझा मृत्युपत्र-व्यवस्थापक ( executor ) हो" असें म्हणून त्याचेकडे सोन्याच्या नाण्यांनीं भरलेली पिशवी फेकून घोड्यावर स्वार होऊन जवळच्या रस्त्यानें व जलद दौडत तो संकेतस्थळाकडे निघाला. **कॅलेब** गच्चीवर येऊन भरधाव जाणाऱ्या स्वाराकडे पाहतां पाहतां तो एकाएकीं अदृश्य झाला. दुसरीकडून **कर्नल ॲशटनही** तसाच भरधाव येत होता. **मास्तर** घोड्यासकट अदृश्य झाला हें पाहून तोही आश्चर्यचकित झाला. इतक्यात **कॅलेब** त्या स्थळीं आला. दोघांनीं **मास्तरचा** त्या वाळूंत शोध केला. पण त्या भुसभुशीत वाळूंतील घातकी भोकामध्यें घोड्यासकट **मास्तर** गडप झाल्यामुळें व वाळूनें भरकन ते भोक बुजविल्यामुळें त्यांचा मागमूस लागणें अशक्य झालें. दुःखानें व जड पावलांनीं परत येत असतांना मास्तरच्या टोपींतून गळून पडलेलें पीस **कॅलेबला** सांपडलें. बुरुजात गेल्यापासून विश्वासू कुत्र्याप्रमाणें आपल्या धन्याकारितां झुरत **कॅलेब** थोड्या दिवसांत मरण पावला.

या **रॅव्हन्सवुड घराण्याच्या** नायनाटानंतर **ॲशटन** घराण्याचाही तोच

प्रकार झाला. **कर्नल ॲशटन फ्रँडर्स**मध्यें गेला व तेथें एका द्वंद्वयुद्धांत मरण पावला. त्यानंतर **सर विलियम ॲशटन**ही लवकरच दिवंगत झाले. **हेन्री**ला अविवाहित स्थितींत मृत्यु आला. मात्र **लेडी ॲशटन** अति वृद्ध-दशेपर्यंत जगली. तिला आपल्या कृत्याबद्दल मनांतून पश्चात्ताप वाटला असला पाहिजे. परंतु सभोंवारच्या मंडळींस तिला खेद किंवा पश्चात्ताप झाला आहे असें दिसलें नाहीं. वर वर्णिलेल्या दुर्दैवी गोष्टी घडल्यानंतरसुद्धां बाह्यतः ती पूर्वीसारखीच धीट, उद्धट व दुसऱ्याकडून दबली न जाणाऱ्या स्वभावाची (Unbending character) राहिली. तिचें नांव, तिचे किताब व तिचे गुण यांचें वर्णन करणारा शिलालेख, तिचें कबरस्थान अलंकृत करीत आहे. परंतु तिच्या कारस्थानाला बळी पडलेल्या व्यक्तींच्या कबरी बांधल्या नाहींत; किंवा त्यांच्याबद्दल शिलालेख लिहिले गेले नाहींत.

या अनर्थांपैकीं दुसरी जिवंत राहिलेली व्यक्ति म्हणजे **बकलॉ**. पण, आपल्या दुखण्यांतून बरा झाल्यावर **बकलॉ** स्कॉटलंडहून कायमचा निघून युरोपला गेला. पण जाण्यापूर्वीं त्यानें **क्रेगनगेल्ट**ची खाण्या-राहण्याची तरतूद केली. तो मात्र सदा दुःखी राहिला; व विवाहानंतर काय व कसें घडलें याबद्दल तो कोणाजवळही अवाक्षर काढीत नसे.



## लघुकथा तिसरी

# टॅलिस्मन

## [ मंत्रसिद्ध ताईत ]

जरी क्रिश्चन धर्म सर्व युरोप खंडभर पसरला तरी त्या धर्माचें पवित्रतम यात्रास्थान **जेरुसलेम** शहर हे एशिया खंडांतील **पॅलेस्टाईन** प्रांतात असून तें मुसलमानधर्मीय असहिष्णु **टर्क्स सुलतानांच्या** ताब्यांत होतें. यामुळें युरोपांतून तिकडे जाणाऱ्या यात्रेकरूंना छळ, त्रास व हाल-अपेष्टा सोसाव्या लागत. याबाबतची तीव्र जाणीव **पीटर** नांवाच्या यात्रेकरूनें युरोपांतील राष्ट्रांमध्यें उत्पन्न केली. म्हणून युरोपच्या इतिहासांत वर्णिलेलीं धार्मिक युद्धें (Crusades) **जेरुसलेम क्रिश्चन** राजाच्या ताब्यात आणण्याकरितां करण्यांत आलीं. पहिलें युद्ध सन १०९५ मध्यें होऊन **जेरुसलेम** येथें **क्रिश्चन** राज्य व राजा स्थापन करण्यात आली. परंतु सन ११८७ मध्यें **टर्किश** सुलतान **महासॅलॅडिन** यानें ते पुनः जिंकून आपल्या अंमलाखाली आणलें. त्यामुळें पुनः युद्ध उद्भवलें.

सन ११८९ ते ११९३ मधल्या तिसऱ्या धार्मिक युद्धाचा सेनापति इंग्लंडचा **पहिला रिचर्ड** होता. त्याचा तळ **मृत समुद्रा**नजीक (Dead Sea) च्या वाळवंटी प्रदेशांत असताना साथीच्या तापानें **रिचर्ड** आजारी झाला. म्हणून उदार व सहिष्णु **महा सॅलॅडिननें रिचर्ड** बरा होईपर्यंत युद्ध तहकूब केलें.

या **मुदतीच्या तहाच्या** (truce) वेळीं **सर केनेथ** नावाचा व **स्लीपिंग लेपर्ड (निद्रिस्त वाघ)** निशाणीचा **रेडक्रॉस** (तांबडें चौकाटणें) धारण केलेला सरदार आपल्या स्कॉटलंड देशांतून एका खास हुजऱ्यासह धार्मिक युद्ध-सैन्यांत **स्वयंकृत शिपाई** (Volunteer) म्हणून आला होता.

एका मध्यान्हीच्या सुमारास तो **मृत समुद्रा** (Dead Sea) नजीकच्या वाळवंटांतून दौडत चालला होता. त्यानें पायापासून डोक्यापर्यंत बारीक

साखळ्यांचें लोखंडी चिलखत अंगांत घातलें होतें; त्याच्या हातांत लांब दुधारी तलवार होती व कमरपट्ट्यांतून लांब भाला लोंबत होता. स्वतःच्या-प्रमाणें त्याच्या घोड्याचाही सरंजाम लोखंडी चिलखताचा होता. स्वाराच्या व घोड्याच्या सरंजामानें त्या वालुकामय प्रदेशांत घोड्याचीं पावलें वाळूंत रुतत व म्हणून स्वाराला जलद जातां येईना. इतक्यांत त्याला दूर दोनतीन माडांखालीं झुळझुळ वाहणारा झरा दिसला. अर्थात् त्यानें आपला मोर्चा तिकडे फिरविला.

याच वेळीं **सर केनेथला** डोक्यावर पागोटें, हातांत लांब भाला व अंगांत हिरवा अंगरखा, अशा पोशाखांत **सॅरॅसन** घोडेस्वार दौडत येतांना दिसला. त्याचा स्वतःचा व घोडयाचा सरंजाम हलकाफूल असल्यानें त्या वाळवंटा-मध्यें त्याला भरधांव पळतां येत होतें. आपला शत्रु **क्रिश्चन सरदार** तसाच भरधांव येऊन आपल्यावर हल्ला करील अशी **सॅरॅसन** घोडेस्वाराची अपेक्षा होती. पण **सरदार** स्तब्धपणें हल्ल्याची वाट पाहत राहिला. तेव्हां **सॅरॅसननें सरदारा**भोंवतीं दोनतीन फेऱ्या घातल्या. पण तो जागच्या जागीं फिरत राहिल्यामुळें त्या **सॅरॅसनला** मागून हल्ला करतां येईना म्हणून तो शंभर पावलें मागें जाऊन भरधाव येऊन **सरदारावर** हल्ला करणार, तोंच **सरदारानें** आपला भलामोठा सोटा **सॅरॅसनवर** नेम धरून इतक्या जोरानें फेकला कीं त्याच्या धडकीनें तो घोडयावरून खालीं पडला, पण तो रिकिबीवर पाय न ठेवतां एकदम घोडयावर स्वार झाला. मग मात्र दोघांची खरी झटापट सुरू झाली. दोघेही घोडयावरून उतरून तरवारीनें लढूं लागले. **सरदाराचें** अतुल शौर्य व धिप्पाड शरीर पाहून **सॅरॅसननें** शांतपणें म्हटलें, " आपल्या राष्ट्रामध्यें **तहकुबीचा तह** ( truce ) आहे. तेव्हां आपणही समेट करूं या " **सर केनेथ** म्हणाला, " मला कबूल आहे. पण, तुम्हीं तह पाळाल याबद्दल हमी काय ? " तो उत्तरला, " **महमदाचे** अनुयायी आपलें वचन कधींही मोडीत नाहींत. पण, तुमच्याबद्दल मला खात्री करून घेतली पाहिजे." तेव्हां **सरदारानें** तलवारीवरील **क्रॉसवर** हात ठेवून मुसलमानाची खात्री केली.

मग ते दोघेही गर्दछाय झऱ्याकडे गेले. पहिल्यानें त्यांनीं आपआपल्या घोड्यांना पाणी पाजून हिरवळीवर चरण्यास सोडले. **सॅरॅसन सरदारास** म्हणाला, " तुमचा घोडा उमदा, भरदार छातीचा, पण इतक्या जाड व जड

पायाचा आहे कीं, त्याला या सुळसुळीत वाळूमधून चालण्यास जड जात असलें पाहिजे." **सरदार** म्हणाला, "ते खरें, पण त्यानें मला **स्फटिका-सारख्या भरीव** (as solid as crystal) पाण्याच्या तलावावरून मैलच्या मैल सुखरूप नेलें आहे." उष्ण प्रदेशांतील राहणीमुळें गोठून भरीव होणाऱ्या पाण्याची कल्पना नसणाऱ्या **सॅरॅसन**ला **सरदाराचें** म्हणणें खरें वाटलें नाहीं. पण त्याबद्दल अधिक वादविवाद न करता ते झऱ्याजवळच्या छायेच्या जागीं विश्रांतीकरितां बसले असतांना **सरदारानें सॅरॅसन**ला त्या झऱ्याचें नांव विचारलें. **सॅरॅसन** उत्तरला, "ओसाड अरण्याचा हिरा (diamond of the desert)." मग त्यांनीं आपआपलीं नावें विचारलीं. **सरदार** म्हणाला, "मला येथल्या सैन्यांत **निद्रित वाघाचे** निशाणाचा **सर केनेथ** म्हणतात; पण मला माझ्या देशांत दुसऱ्याच नांवानें ओळखतात." **सॅरॅसन** म्हणाला, "मलाही येथें **पर्वताचे सिंहाच्या** निशाणीचा **शिरकोप** म्हणतात."

नंतर त्या दोघांनीं आपआपल्या धर्माप्रमाणें प्रार्थना व नमाज केल्यावर बरोबर आणलेल्या फराळाचा समाचार घेतला; व मग त्यांनीं गर्दछायेंत दिवस खालीं होईपर्यंत विश्रांति घेतली. नतर ते आपआपल्या घोड्यावर स्वार होऊन वाळवंटाच्या क्षितिजावर दिसणाऱ्या पर्वतराजीकडे सावकाश व बोलत बोलत चालले. **शिरकोपनें** जिज्ञासेनें **सर केनेथ**ला विचारले, "तुमच्या देशांत सरदारकीची पदवी मिळविण्यास काय गुण लागतात?" **सर केनेथ** उत्तरला, "उच्च व शुद्ध कुळांत जन्म व निर्भय मन (free birth and fearless heart). या पदवीचा दर्जा इतका मोठा आहे कीं त्यायोगें राव व रंक हे **स्त्रीदाक्षिण्या**बाबत (chivalry) समान हक्कदार बनतात." आश्चर्यचकित चेहऱ्यानें **शिरकोपनें** विचारले, "स्त्रीदाक्षिण्य (chivalry) म्हणजे काय व स्त्रियामध्यें तुम्हीं मोकळेपणानें व अप्रतिबंध-पणें मिसळूं शकता काय?" **सर केनेथ** उत्तरला, "स्त्रियाशीं आदरानें बोलणें-चालणें, त्याना संकटसमयीं मदत करणें, आपल्या आवडत्या स्त्रीवर—मग ती कितीही उच्च दर्जाची असो—अतुल व अकृतिम प्रेम करणें, व तिच्या आज्ञा शिरसावंद्य मानून त्याप्रमाणें वागणे; इतक्या गोष्टी स्त्रीदाक्षि-ण्यांत येतात. तदनुरूप स्त्रियांशीं आमची वागणूक असते." **शिरकोपनें** पुनः विचारलें, "कोणत्या स्त्रीवर तुमचें प्रेम बसलें आहे?" **सर केनेथ**

उत्तरला, "असले नाजूक प्रश्न विचारूं नये. पण तुमची प्रामाणिक व निष्काम जिज्ञासा तृप्त करण्याकरितां मी सांगतों कीं तें उच्चतम कुळांतील स्त्रीवर बसलें आहे. पण आमच्या लोकांचें स्त्रीदाक्षिण्य व त्यानें होणारे पराक्रम पहावयाचे असल्यास तुम्हीं आमच्या सैन्याच्या मोकळया मैदानावर होणाऱ्या मर्दानी **खेळांच्या सामन्यास** ( tournament ) हजर रहा. म्हणजे माझ्यासारख्या गरीब व असहाय सरदारापासून तो सैन्याचा सेनापति पहिला **रिचर्ड** याच्यापर्यंत सर्वांचे पराक्रम व शक्तिमत्ता तुम्हांला दिसून येईल." **शिरकोप** म्हणाला, "त्या बेटाधिपतीची कीर्ति आम्हीं ऐकली आहे. तुम्हीं त्याच्या प्रजेपैकीं आहां ?" **सर केनेथ** उत्तरला, "या स्वारीमध्यें मी त्याचा अनुयायी आहे. जरी माझा जन्म ब्रिटिश बेटांत झाला आहे तरी मी **रिचर्डच्या** प्रजाजनांपैकीं नाहीं." **शिरकोप** आश्चर्यानें उद्गारला, "काय, एका गरीब बेटांत दोन राजे आहेत ?" **सर केनेथनें** उत्तर दिलें, "तसें आहे खरें."

ज्या ठिकाणीं **येशु क्रिस्तानें** चाळीस दिवस उपवास केला व जेथें **सैतानानें येशूला** आपल्या मोहजालांत पकडण्याचा प्रयत्न केला असें क्रिश्चन लोक मानतात त्या भयंकर वाळवंटी अरण्याला ते आतां येऊन पोंहोचले होते. म्हणून **सर केनेथ** आपोआप गंभीर व स्तब्ध झाला व **सॅरॅसनला** नाइलाजानें गप्प बसावें लागलें. अशा मूकवृत्तीनें ते मृत्यूच्या छायेच्या दरींत ( valley of the shadow of death ) शिरले नाहींत तोंच आपल्या उंच पण कृश शरीरावर बकऱ्याचें कातडें पांघरलेला एक इसम भुतासारखा एकाएकीं रस्त्यामध्यें उभा ठाकला. लगेंच त्यानें **सॅरॅसनच्या** घोडयाचा लगाम धरला, त्यामुळें घोडा बिचकून दोन पायांवर उभा राहिला. त्यामुळें घोडेस्वार मागें घसरला. तें पाहतांच त्या इसमानें स्वाराच्या मानगोटीस हात घातला. त्याबरोबर रागानें **शिरकोप** ओरडला, "**हमॅको,** मूर्खा, माझी मानगुटी सोड; नाहीं तर मी आपली तलवार बाहेर काढीन." बकऱ्याच्या कातडयांतील तो इसम उद्गारला, "पाखंडया कुत्र्या ! तुझी तलवार ! जर शक्ति असेल तर ती हातांत घट्ट धर पाहूं." असें म्हणून त्यानें ती तरवार **शिरकोपच्या** हातून हिसकावून घेतली व त्याचे डोक्यावर फिरविली. आतां मात्र **शिरकोपनें** खरोखरीच भिऊन **सर केनेथला** आपल्या मदतीस बोलाविलें. **शिरकोप** परधर्मीय असला तरी सध्यां आपला

सोबती असल्यामुळें त्याला मदत करणे रास्त असें वाटून, **सर केनेथ** त्या भुतासारख्या इसमास रागानें म्हणाला, "तूं कोणीही अस, पण माझ्या मित्राला सोड. नाही तर, मी तुझ्यावर हल्ला करीन." **हर्मेको** म्हणाला, "धर्मयुद्धाकरितां आलेल्या क्रिश्चन शिपायाने पाखंडी कुत्र्याच्या सरक्षणास धांवावें हें छान धर्मयुद्ध!" इतकें उपहासात्मक बोलून **हर्मेकोनें शिरकोपला** सोडलें व त्याची तलवार त्यास परत दिली.

**शिरकोप** उद्‌गारला, "तुम्हीं माझ्या मदतीला लवकर तयार झालांत. तुम्हांला या **हर्मेकोनें** कांहींही केलें नसतें. तुम्हीं ज्याला भेटण्याकरितां या स्थळीं येत होता तोच हा वानप्रस्थ बैरागी (anchorite or hermit). **सर केनेथ** आश्चर्यानें उद्‌गारला, "ही पैलवानी शरीराची पण आतां कृश झालेली व्यक्ति आदरणीय **थिओडोरिक** काय?" ती व्यक्ति आपण होऊन म्हणाली, "होय, मीच तो अरण्यात हिंडणारा प्राणी. मी धर्मवीरांचा मित्र (friend of the cross) व नास्तिक, पाखंडी व पिशाच्चपूजक यांचा दंडक (flail staff) आहे. महमदाच्या अनुयायांचा पराभव होवो." असें बोलून त्यानें आपला दंडुका (club) बाहेर काढून आपल्या डोक्याभोंवतीं गरगर फिरविला. **शिरकोप** म्हणाला, "तो वेडसर चाळे करो कीं आवेशानें बडबडो, पण त्याच्या गुहेखेरीज या निर्जन व भयंकर दरींत आपल्याला रात्रीचें राहण्यासारखें ठिकाण नाहीं, तरी त्याच्या मागोमाग जाऊं या."

त्याप्रमाणें ते दोघे झपाझप त्याचे पाठोपाठ गेले. आतां चांगलाच काळोख पडला होता. पण बैराग्यानें मशाल पेटविल्यामुळें त्यांना गुहेच्या पुढच्या दालनांत येतां आलें. त्या दालनांत त्या गोसाव्याचें प्रार्थना-स्थान (chapel) होतें. त्याच्या एका कोपऱ्याला दोघांनीं आपले घोडे बांधून त्याना रात्री-पुरती दाणावैरण घातली. इतक्यांत, बैराग्यानें आंतलें दालन साफसूफ केलें व तेथल्या भेजावर खाण्याचे पदार्थ आणून ठेवले. त्या दालनाच्या कोपऱ्यांत छोटासा झरा असून दालनाच्या सपाट केलेल्या खडकावर मऊ वाळू टाकून त्यावर पाणी शिंपडल्यामुळें तें दालन थंड व सुखस्पर्श झालें होतें. **शिरकोप** म्हणाला, "आपले खाणें झाल्याखेरीज **हर्मेको** बोलणार नाहीं." त्याप्रमाणें त्यांनीं मूकपणें फराळ केला. दरम्यान **हर्मेकोनें** प्रार्थना-देवालयांत प्रार्थना केली. दोघाचें जेवण आटोपतें तों त्यानें शरबताचें भांडें व पिण्याचे पेले

मेजावर आणून ठेविलें व मग म्हणाला, "देवाचें स्मरण केल्यावर त्यानें दिलेल्या देणग्या स्वीकारण्यास हरकत नाहीं. तरी खुशाल शरबत प्या."

नंतर तो आंतल्या दालनांत गेला. तेव्हां **सर केनेथनें** विचारल्यावरून **शिरकोप** म्हणाला, "हा बैरागी पूर्ववयांत शूरवीर शिपाई होता. तो यात्रेकरू म्हणून **जेरुसलेमला** आला नसून पवित्रभूमींत राहिलेलें आयुष्य कंठण्याच्या इराद्यानें आला. मग ह्लींच्या भयंकर दरींत त्यानें आपली राहण्याची गुहा तयार केली. **टर्क्स** लोक त्याला **हर्मॅको** म्हणूं लागले; तो पूर्वीं शहाणा असून बोलण्यांत बाका असे. आकाशांतील तारे पाहून मनुष्याच्या आयुष्यांतील भावी गोष्टी सांगतां याव्या म्हणून त्यानें खूप उंचावर वेधशाळा बांधली. भावी गोष्टी कळवून घेण्याकरितां मुसलमान सरदार त्याची भेट घेत. त्याची कीर्ति **सॅलॅडिन**च्या कानांवर गेली व त्याला कोणीही त्रास देऊं नये असा जाहीर हुकूम **सुलतानानें** काढला." इतकें **शिरकोप** बोलत आहे तों **हर्मॅकोनें** दोघांनाही वाळूवर चटया टाकून निद्रा घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें दोघेही लगेच झोपीं गेले.

पण, मध्यरात्रीच्या आंत-बाहेर **हर्मॅकोनें सर केनेथला** हळूच हलवून खुणेनें आपल्या मागोमाग येण्यास सांगितलें. तदनुरूप ते गुहेच्या बाहेरच्या दालनांत आले. तेथें आल्यावर दोघांनींहि (altar) स्थंडिलापुढें गुडघे टेकून प्रार्थना केली. नंतर **सर केनेथ**कडून बैराग्यानें काळ्या फडक्यानें आपले डोळे बांधविले व मग त्याला विचारलें, "इंग्लंडच्या **रिचर्ड** राजाकडून तुम्ही निरोप आणला आहे काय?" **केनेथ** उत्तरला, "मी क्रिश्चन राजांच्या वतीनें आलों आहे; पण इंग्लंडचा राजा आजारी असल्यामुळें त्याच्या आज्ञा मला मिळाल्या नाहींत." **बैराग्यानें केनेथला परवलीचा** शब्द (pass word) विचारला व त्यानें **राजांनीं भिकाऱ्यापासून भिक्षा मागितली** (Kings begged of a begger)— असा परवलीचा शब्द सांगितला.

नंतर त्यानें दिव्याच्या उजेडाच्या साहाय्यानें एका **दाबखिळीनें** (Spring) लोखंडी दार उघडलें. तेथें एका खडकांत खोदलेला जिना लागला. त्या जिन्यानें ते वर चढले. तेथें पोंहोचल्यावर पवित्र स्थळांत शिरण्यापूर्वीं जोडे काढून त्यानें सरदाराला दारावर तीन टिचक्या मारण्यास सांगितलें. तसें करतांच दार सताड उघडलें.

**केनेथचें** नाक उंची सुवासानें गुदमरलें व शुद्धतम प्रकाशानें त्याचे डोळे दिपले. पण क्षणभऱ्यानें आपण एका खोदलेल्या सहा खाबी कमानीदार प्रार्थना-देवालयांत असून तेथें रुपेरी दिव्याचा शुभ्र प्रकाश पडला आहे असें त्याला दिसलें. सहा कमानींमधील कोनाड्यात ( niches ) सहा प्रेषितांच्या ( apostle ) मूर्ति होत्या. त्या देवालयाच्या वरच्या पूर्वटोकाला स्थंडिल ( altar ) असून त्याचेमागें पर्शियन रेशमी पडद्यापलीकडे पवित्रतम स्मारक असावें असें समजून **केनेथनें** गुडघे टेकून प्रार्थना केली; तोंच तो पडदा आपोआप दूर झाला व त्याला मधून मधून रुप्यानें मढविलेली **एबनी** लाकडाची पेटी दिसली. तिच्यामागील उघडझापी दरवाजा ( folding door ) उघडला व त्याला बायकांच्या स्वरानीं गायिलेले **विजयगीत** ऐकूं आलें. ते संपते तोंच दरवाजा बंद झाला. पण काळ्या फडक्यानें डोळे बांधलेल्या वैराग्यानें "देखावा अजून संपला नाहीं" असें म्हणून दरवाजा बंद केला. **सर केनेथ** एकटाच देवालयात गुडघे टेकून इकडून तिकडे फेऱ्या घालूं लागला. कांहीं वेळाने त्याला रुपेरी घंटेचे आवाज व गाण्याचे स्वर ऐकूं आले; व पूर्वीचा पडदा कडेला सरकला जाऊन, चार काळ्या वर्णाचे व शुभ्र पोशाखाचे मुलगे जोडीने देवालयात शिरले. दोघाच्या हातांत धूपारतीच्या ताटल्या व दुसऱ्या दोघाच्या हातांत फुलांच्या परड्या होत्या. दोघे ताटल्या हालवून सुगंध सर्व देवालयभर पसरवीत होते; तर दुसरे दोघे फुलें विखुरवीत होते. त्यांचे मागून हातांत जपमाळा ( rosary ) घेतलेल्या काळ्या पोशाखाच्या सहा संन्यासिनी रांगेनें आल्या व त्यांच्येनंतर हातांत पुष्पमाला ( chaplet ) घेतलेल्या पांढऱ्याशुभ्र पोशाखाच्या **नैमित्तिक** व्रत घेतलेल्या सहा स्त्रिया तशाच आल्या. त्या सर्व स्थंडिलाभोंवतीं **केनेथ**कडे न पाहतां एकदां फिरल्या. दुसऱ्या खेपेस मात्र गुडघ्यावर उभा राहिलेल्या त्या पुरुषासमोर आल्याबरोबर एका शुभ्र पोशाखातल्या स्त्रीनें पुष्पमालेपैकीं एक गुलाबकळी त्याच्या पायावर टाकली. तिसऱ्या वेळीं त्या बाईकडे बारकाईनें व निरखून पाहता ती आपली **प्रेमप्रिया** आहे असें **केनेथ**ला दिसून आलें. इतक्यांत त्या स्त्रीनें आपला पांढरा हात वस्त्रांतून बाहेर काढून पुन्हा एक गुलाबकळी त्याच्या पायावर टाकली. तिच्या हातांतील माणिकाच्या अंगठीनें तर त्याची पूर्ण खात्री झाली व त्या सुंदर हाताचें चुंबन घेतल्याचें त्याला स्मरण झालें.

इतक्यांत संन्यासिनीसह त्या सहा स्त्रिया आल्या तशा परत गेल्या व दरवाजा बंद झाला; गाणें थांबलें; दिवे गेले व जिकडे तिकडे अंधःकार पसरला.

अशा अंधःकारांत **केनेथनें** गुलाबकळ्या हातीं घेऊन त्यांचे प्रेमानें व आदरानें चुंबन घेतलें. त्या सहा स्त्रियांत **रिचर्डची** राणी **बेरेंगॅरिया** व **केनेथची** प्रेमप्रिया **एडिथ** या होत्या.

थोड्या वेळानंतर एक कर्कश स्वर **केनेथला** ऐकूं आला व तो उठून उभा राहतो तोंच एक गुप्त दरवाजा उघडला जाऊन त्यांतून एक खुजा माणूस व एक खुजी स्त्री बाहेर आली; व त्यांनीं वेड्याविद्या उड्या मारून व **केनेथच्या** सभोंवार फेऱ्या घालून पलायन केलें.

आपल्या प्रियपात्रानें गुलाबकळ्यांच्या द्वारें काय आज्ञा केली याबद्दल तर्कवितर्क करीत **केनेथ** किती वेळ गुडघे टेकून अंधारांत पडून होता. पण बऱ्याच वेळानंतर समोरचें दार उघडलें गेलें व हातांत अंधुक दिवा घेतलेली **हमॅकोची** कृश मूर्ति त्याच्या जवळ येऊन म्हणाली, " हा दिवा घे; व मला जिन्याखालीं घेऊन चल." **स्कॉटिश सरदारानें** मुकाट्यानें त्याच्या म्हणण्याप्रमाणें केलें व शेवटीं ते वैराग्याच्या गुहेच्या बाहेरच्या दालनांत आले. मग त्यांनीं सकाळपर्यंत झोप घेतली. सकाळीं **सरदाराचें** व **हमॅकोचें** बराच वेळ बोलणें झाल्यावर **सरदारानें** आणखी दोन दिवस दरींत राहण्याचें कबूल केलें.

आतां आपल्याला **जॉर्डन** नदीचा खडकाळ किनारा सोडून **जीन एकर** व **अस्केलॉन** यांमध्यें पडलेल्या इंग्लंडच्या **रिचर्ड** राजाच्या तळाकडे काय चाललें होतें तिकडे लक्ष दिलें पाहिजे. सांथीच्या तापानें तो आजारी होऊन अंथरुणावर पडून होता. त्याचा उत्साही व आवेशी स्वभाव या आजारानें चिडखोर ( irritable ) बनला होता. त्या पलंगाशेजारीं ज्याला **सॅक्सन** लोक **कंबर्लंड** परगण्यातील **गिल्फर्ड** गांवचा **सरदार सर टॉमस** म्हणत व **नॉर्मन लोक लॉर्ड डी व्हॉक्स** म्हणत. तो शूर, विश्वासु व स्वामिभक्त सरदार राजाच्या शुश्रूषेस व संरक्षणास हजर होता. त्याच्या पलंगानजीकच्या मेजावर **रिचर्डनें** राजचिन्ह ठरविलेलीं तीन **सिंहाचीं चित्रें चिकटविलेली ढाल,** सोनेरी मुकुट व छोटी तलवार लष्करी तंबूची आठवण करून देत होती.

**रिचर्ड** म्हणाला, " **सर टॉमस,** बाहेरच्या कॅपांतून अधिक बरी बातमी तुम्हीं आणिली नाहीं ? " **डी व्हॉक्स** म्हणला, " **तहकुबीच्या तहामुळें** ( truce ) आपल्याला स्वस्थ बसणें भाग आहे. महाराणीसाहेबांबरोबर राजकुमारी **एडिथ** व इतर सरदारी स्त्रिया स्वारीला आराम पडावा म्हणून **एनगॅडीच्या** मठाच्या यात्रेला गेल्या आहेत." **रिचर्ड** म्हणाला, " पाखडी व बेइमानी शत्रूंनीं व्यापलेल्या त्या दरींत जाऊन आमच्या विवाहित स्त्रिया व कुमारिका यानीं आपला जीव धोक्यात घातला आहे." **डी व्हॉक्स** उत्तरला, " त्यांच्या सुरक्षितपणाबद्दल **सॅलॅडिननें** हमी दिली आहे." **रिचर्ड** म्हणाला, " मी तें विसरलों; पण माझ्या आजारांत **कौन्सिलने** दुसरा सेनापति का नेमूं नये ? तुझ्या मतें कोण या कामाला योग्य आहे ? " **डी व्हॉक्स** उत्तरला, " **दर्जा** ( rank ) व **उच्च पदवी** ( dignity ) या नात्यानें फ्रान्सचा राजा योग्य वाटतो." **रिचर्ड** म्हणाला, " फ्रान्स व **नॅव्हॅरीचा फिलिप** ! तो **जेरुसलेमकडे** चाल करून जाण्याऐवजीं आपणा सर्वांस पॅरिसला परत नेईल." **डी व्हॉक्स** म्हणाला, " **कौन्सिल** कदाचित् **ऑस्ट्रियाच्या आर्चड्यूकची** निवड करील." **रिचर्ड** उद्‌गारला, "तो लठ्ठ व मजबूत आहे म्हणून त्याला निवडणार ?" **सरदार** पुढें म्हणाला, " ते **टेम्लर्स** संन्याशाच्या **ग्रॅंड मास्तरला** नेमूं शकतील. पवित्रभूमि परत मिळविण्याखेरीज त्याला स्वार्थी हेतु असणे शक्य नाही." रिचर्ड म्हणाला, " **ब्रदर जाइल्स एमारीला** कोणींही आक्षेप घेणार नाहीं. तो लढाईची पूर्वतयारी व सेना-रचना जाणतो व लढाई सुरू झाल्यावर लढण्याचें जाणतो. परंतु क्रिश्चन राजांपेक्षा सद्‌गुणांत श्रेष्ठ अशा **सॅलॅडिनकडून** आपली पवित्रभूमि हिसकावून घेऊन गुप्तपणें वाटेल तीं पापकर्में व दुष्कृत्यें करणाऱ्या त्या पाखंडयाच्या हवालीं तीं करणे रास्त व योग्य होईल काय ?" शेवटी **डी व्हॉक्स** म्हणाला, " ऐटबाज, उमदा स्वार, शहाणा व शोभिवंत **मॉर्किस ऑफ मॉंटसिरॅट**-बद्दल राजाचें काय मत आहे ? " **रिचर्ड** उत्तरला, " शहाणा म्हणण्याऐवजीं तूं त्याला कावेबाज म्हण. तसेंच तो स्त्रियाच्या अतःपुरात ऐटबाज आहे असे म्हण; **कॉनरॅड ऑफ मॉंटसेरॅट** याचा गर्विष्ठ ( popinjay ) पणा महशूर आहे." **डी व्हॉक्स** उत्तरला, " म्हणून सर्व लोक **रिचर्ड राजा** लवकर बरा होवो अशी इच्छा करतात." या गंभीर बोलण्यानें **रिचर्ड** मनापासून हसला.

इतक्यांत त्याला तुतारीचा आवाज ऐकूं आला. म्हणून त्याच्या सांगण्यावरून **डी व्हॉक्स** तंबूबाहेर आला तोंच त्याला **सर केनेथ**नें हटकलें व म्हटलें, "मला **रिचर्ड**ला जरूरीच्या कामाकरितां–त्याच्या रोग परिहाराकरितां—भेटावयाचें आहे. मीं आपल्याबरोबर एक **मूरिश** वैद्य आणला आहे. तो राजांचा ताप खात्रीनें बरा करीन असें म्हणतो." शंकित मुद्रेनें **डी व्हॉक्स केनेथ**कडे पाहूं लागतांच तो म्हणाला, "शूर व उदार **सॅलॅडिन**नें योग्य सरंजाम बरोबर देऊन या हकीमाला पाठविलें आहे, व राजाकरितां फळफळावळ व उपाहारान्न धाडलें आहे; शेवटीं राजेसाहेबांनीं दुखण्यांतून लवकर बरें होऊन सुलतानांना भेट द्यावी असा निरोप दिला आहे. तरी उंटावरून सामानसुमान उतरून घ्यावें व हकीमास राजांची भेट करवावी अशी मी तुम्हांला विनंति करतों."

**डी व्हॉक्स** शंकित दिसतांच **सर केनेथ** म्हणाला, "मी आपला मान, जीव व वैभव (honour, life and fortune) हीं सर्व **सॅलॅडिन**च्या सचोटीबद्दल व सद्धेतूबद्दल गहाण टाकण्यास सज्ज आहे." **डी व्हॉक्स** उद्गारला, "ही विलक्षण गोष्ट आहे कीं, उत्तरेकडचा **स्कॉटिश सरदार** दक्षिणेकडच्या **टर्क्स**बद्दल खातरजमा देतो. **केनेथ**साहेब, मला आधीं सांगा कीं, तुम्हीं हें काम कां व कसें अंगावर घेतलें?" तो उत्तरला, "**कौन्सिल**नें मला **एनगॅडी** मठाच्या यात्रेस पाठविलें असल्यामुळें तिकडल्या कामाची हकीकत मला राजेसाहेबांस सांगतां येणार नाहीं. पण या हकीमाचें ज्ञान व सचोटी याबद्दल मला स्वतःला नुकताच अनुभव आला. माझा एकच एक हुजऱ्या येथल्या साथीच्या तापानें आजारी होता. त्याला या हकीमानें औषध दिलें. त्याला आतां गाढ झोप लागली असून त्याच्या चेहऱ्यावरून तो रोगमुक्त झाल्यासारखा दिसतो."

तेव्हां **डी व्हॉक्स**नें विचारलें, "मी तुमच्या हुजऱ्याची प्रकृति पाहण्यास येऊं काय?" **सर केनेथ** म्हणाला, "माझी मुळींच हरकत नाहीं; शिवाय, तेथें तुम्हांला तो हकीमही दिसेल." तदनुरूप ते **सर केनेथ**च्या झोपडीशीं गेले; तोंच एक मोठा शिकारी कुत्रा दूरच्या व अस्पष्ट मेघगर्जनेप्रमाणें गुरगुरूं लागला. पण आपल्या धन्याला पाहतांच त्यानें आपली शेपटी हालविली व आपलें डोकें खालीं केलें. आजारी माणसाच्या खोलींत गडबड होऊं नये म्हणून त्यानें मूकपणें आपल्या धन्याचें स्वागत केलें.

आजाऱ्याच्या पलंगाशेजारीं एका उशीवर **मूरिश** हकीम त्या देशाच्या चालीप्रमाणें आडवे पाय ( cross legged ) पसरून पडला होता. त्याचा सर्व पोशाख **टर्किश** पद्धतीचा व काळसर कापडी होता. खोलींत आजाऱ्याच्या जड व नियमित श्वासाखेरीज काहीं एक ऐकूं येत नव्हते. आंत शिरल्याबरोबर **सर केनेथनें** म्हटले, " माझ्या हुजऱ्याला सहा रात्रीं झोप आली नव्हती." मंडळींच्या बोलण्या-चालण्याने आजाऱ्याची किंचित् झोपमोड झाली. तेव्हां हकीमाने त्यांना स्तब्ध राहण्यास खुणावून, त्यांना घेऊन तो खोलीबाहेर आला व मग त्याना म्हणाला, " संध्याकाळच्या निमाज पढण्याच्या वेळेपर्यंत आजाऱ्याला उठविता कामा नये. त्यानंतर तो खडखडीत बरा झालेला तुम्ही पाहाल."

तदनुरूप ते दोघे सरदार झोपडीबाहेर वाट पाहत उभे राहिले. तेथें तो विश्वासू कुत्रा आला व धन्यानें आपणास गोंजारावें म्हणून जणूं काय त्यानें त्याच्या हातांत आपलें डोकें खुपसलें. **सर केनेथने** त्याला कुरवाळलें व शाबास म्हटलें. या योगें आनंदानें तो नाचूं-धावूं लागला. दोघाही सरदाराना त्या विश्वासू प्राण्याचें कौतुक वाटलें.

मग **डी व्हॉक्स रिचर्डच्या** तंबूत परत आला. **रिचर्डने** उत्सुकतेने विचारताच त्यानें पाहिलेली व ऐकलेली सर्व हकीकत राजास सांगितली. राजा आवेशानें म्हणाला, " जा, जा, सायंकाळची हुजऱ्याची प्रकृति पाहून ये." तदनुरूप **डी व्हॉक्स** बाहेर पडला. पण प्रथम, **आर्चबिशप ऑफ टायरकडे** जाऊन त्यानें परधर्मी हकीमाचें औषध राजास देण्याबद्दल त्यास विचारलें. त्याचा रुकार मिळतांच ते दोघेजण **सर केनेथच्या** झोपडीशीं आले. तेथे **सर केनेथ** नव्हता. मात्र **मूरिश** हकीम पूर्वीसारखाच आजाऱ्याशेजारीं बसून वेळोवेळ त्याची नाडी पाहत होता. **आर्चबिशपनें** त्याला नमस्कार केल्याबरोबर हकीमानें त्यांना झोपडींतच पण न बोलतां उभे राहण्यास फर्माविलें. सध्याकळच्या निजामाची वेळ होतांच हकीमानें मक्केकडे तोंड करून प्रार्थना केली. नंतर तो आजाऱ्याजवळ गेला. त्याने मंत्रित पाण्याने भरलेला स्पंज आजाऱ्याच्या नाकाशी नेला तोच तो शिंकला, जागा झाला व इकडे तिकडे पाहूं लागला. **डी व्हॉक्सनें** त्यास विचारलें, " तूं आम्हांला ओळखतोस काय ? " तो उत्तरला, " होय, तुम्ही मोठे इंग्लिश सरदार आहांत व दुसरे **आर्चबिशप** आहेत." हकीम म्हणाला, " हा बरा झाला,

त्याची नाडी पाहा पाहिजे तर." **डी व्हॉक्स**नें नाडी निरोगी माणसाच्या-प्रमाणें वाहत आहे असें पाहून म्हटलें, " ही विलक्षण गोष्ट आहे. हकीमाला राजाकडे घेऊन जाण्यास हरकत नाहीं." पण हकीम म्हणाला, " त्याला आणखी एकदां औषध दिलें पाहिजे." असें बोलून त्यानें एक रुप्याचा पेला बाहेर काढला व तो कमंडलूंतील पाण्यानें भरला. नंतर त्यानें रुप्याच्या तारांनीं गुंफलेली जाळीदार पिशवी काढली व ती पेल्यांत पांच मिनिटें ठेविली. त्यांतून फेस बाहेर येत असावा असें पाहाणारास वाटलें. हकीमानें आजाऱ्यास म्हटलें, " हें पाणी पी; मग पुन्हा झोप घे म्हणजे तूं पूर्णपणें रोगमुक्त होशील."

इकडे **रिचर्ड डी व्हॉक्स**ची वाट पाहून दमला. तेव्हां मध्यंतरीं **सर केनेथ**कडून त्याच्या कामाची व हकीमाच्या भेटीची माहिती मिळविण्या-करितां त्यानें त्याचेकडे तातडीनें आपला हुजऱ्या धाडला. **सर केनेथ रिचर्ड**ला मुजरा करून अदबीनें उभा राहिला. राजानें विचारलें, " तुला सरदारकी कोठून मिळाली ?" तो म्हणाला, " स्कॉटलंडचा राजा **विलियम दि लायन**च्या तलवारयुक्त हातून." राजा उद्गारला, " योग्य हातून योग्य माणसास पदवी मिळाली. तुझा पराक्रम आम्हीं पाहिला आहे. पण, त्याबद्दल भलतेंच बक्षिस मिळविण्याची महत्त्वाकांक्षा तूं धरली आहेस. शिवाय, शिक्षा करण्यासारखे दोन अपराध तुझ्याकडून घडले आहेत. शिकारी कुत्रा बाळगून हरणें मारण्याची परवानगी तुला **डी व्हॉक्स**नें दिली आहे. तें असो, पण कोणाच्या परवानगीनें तूं **एनगाडी** मठास गेलास ?" **सरदार** उत्तरला, " धर्मयुद्धास आलेल्या राजांच्या **कौन्सिल**च्या हुकुमानें." **रिचर्ड** म्हणाला, " मला न कळवितां हुकूम कसा देण्यांत आला ?" **स्कॉट** म्हणाला, " महाराज, त्याची वाटावाट करणें माझें काम नव्हतें. तुमच्या निशाणाखालीं लढणारा मी धर्मयोद्धा आहे. पण, आपल्या आजारीपणांत काम करणाऱ्या कौन्सिलच्या कायदेशीर आज्ञा मानणें माझें कर्तव्यकर्म आहे. नाहीं तर सैन्यांत अनवस्था होईल." **रिचर्ड** म्हणाला, " तुझें म्हणणें बरोबर आहे. पण तुझ्या निरोपाचा मतलब काय होता ?" तो उत्तरला, " ज्यांनीं मला पाठविलें व ज्यांना त्या निरोपाचीं कारणें ठाऊक आहेत त्यांनाच विचारणें चांगलें. बाकी, मला वरवर काय दिसलें व काय वाटलें येवढें सांगतां येईल." **रिचर्ड** चिडून म्हणाला, " मला तुझीं उडवाउडवीचीं उत्तरें नकोत. तसें करणें तुझ्या सुरक्षितेला बरें

नाहीं." सरदार निर्धारानें म्हणाला, "ज्या वेळीं माझ्या शारीरिक हितापेक्षां माझ्या आत्म्याच्या हिताकडे लक्ष देऊन मीं हे धाडसी काम हातीं घेण्याची शपथ घेतली, तेव्हांच स्वतःच्या सुरक्षिततेवर पाणी सोडलें." **रिचर्ड** राजा म्हणाला, "तूं खरा शूर शिपाई आहेस! **सर नाईट,** माझें ऐक. स्कॉटिश लोकांवर माझी प्रेमदृष्टि आहे. ते लोक काटक (hardy), निग्रही (dogged), दुराग्रही (stubborn), पण सचोटीचे आहेत. मात्र देशाच्या गरजेकरितां ते कपट करण्यास अनमान करणार नाहींत. तुमच्या देशाकरितां जी कामगिरी मीं केली आहे (for doing good offices to your land) तिच्याकरितां मी तुम्हां लोकांच्या प्रेमाला पात्र आहे. शिवाय, **क्रिश्चन** राजसंघाचा मी एक प्रमुख घटक असल्यानें माझ्या सहकाऱ्यांच्या तद्विषयक वाटाघाटी समजून घेण्याचा मला हक्क आहे हें तूं ध्यानांत आण. म्हणून हक्कानें जी माहिती मला मागतां येते ती दुसऱ्यापेक्षां तुझ्याकडून मला विश्वसनीयपणें कळेल. तेव्हा, ती तूं मला सांग." **सर केनेथ** म्हणाला, "ही कळकळीची विनंति ऐकून मी खरें सांगतों. कारण, या स्वारीच्या ध्येयाबद्दल तुमचे हेतू एकनिष्ठ (single hearted), व सात्त्विक (honest) आहेत; धर्मसंघाच्या इतर सभासदांचे तसे आहेत असें मला वाटत नाहीं. तेव्हां, तुम्हांला मी सांगतों कीं **सॅलडिन**च्या विश्वासांतल्या **एनगॅडी** मठाच्या मुख्यार्फत......" त्यानें वाक्य पुरे करण्यापूर्वींच **रिचर्ड** म्हणाला, "तहकुबीच्या तहाची मुदतवाढ..." स्कॉटिश सरदार म्हणाला, "नाहीं. कायमचा तह करण्याकरितां." **रिचर्ड** उद्गारला "जरी माझ्या सहकाऱ्यांबद्दल माझें मत चांगलें नव्हतें; तरी इतका अपमान करून घेण्यास ते कबूल होतील हें माझ्या स्वप्नींही नव्हतें. पण, तूं असा निरोप खुषीनें नेलास काय?" **केनेथ** उत्तरला, "होय, मोठ्या खुशीनें मी गेलों. कारण, ज्याच्या मार्गदर्शित्वाखालीं मी विजयाची आशा करीत होतों त्या आमच्या उदार नायकाला—तात्पुरतें का होईना—आम्ही मुकल्यामुळें दुसरा विजयदायी नेता नजरेसमोर नसल्यानें, आपणाला या स्वारींत जयाची आशा न राहिल्यामुळें, पराजय टाळणें बरें असें मला वाटलें." हृदयांत उचंबळणाऱ्या रागाला कसें तरी दाबून **रिचर्ड** म्हणाला, "हा कायमचा तह कोणत्या अटींवर करण्याचे ठरत होतें?" **नाईट** उद्गारला, "महाराज, त्या अटी मला कळणें शक्य नव्हतें; कारण, त्या मोहोरबंद पत्रांत असून मीं ते तसेंच

मठाधिपतीला दिलें." **रिचर्ड** म्हणाला, "आतांपर्यंत मिळालेल्या माहिती-पेक्षां तुझ्याकडून मला अधिक कळलें पाहिजे. **एनगॅडी**ला असतांना तूं राणी-साहेबांना पाहिलेंस काय ?" **सर केनेथ** उत्तरला "नाहीं, मला तरी कळलें नाहीं." राजानें कठोर आवाजानें विचारलें, "**एनगॅडी**च्या संन्यासिनीच्या देवालयांत यात्रानिमित्तानें तेथें गेलेली इंग्लंडची राणी **बेरिंगेरिया** व तिच्या दरबारी सख्या पाहिल्या नाहींस काय ?" **सर केनेथ** म्हणाला, "मला भुयारांतील देवालयांत नेण्यांत आलें. तेथें पवित्रतम साधूच्या स्मारक-मूर्तीपुढें उपासना करीत असलेला गायकसमूह (Choir) मीं पाहिला; परंतु त्यांचे चेहरे मला न दिसल्यानें व त्यांचे स्वर ऐकूं न आल्या-मुळें त्या समूहांत इंग्लंडची राणी होती किंवा नाहीं हें मला सांगतां येत नाहीं." राजानें विचारलें, "त्या स्त्रियांपैकीं कोणीही तुझ्या परिचयाची नव्हती ?" **सर केनेथ** स्तब्ध उभा राहिला. तेव्हां, राजा म्हणाला, "मी सरदार व सभ्य गृहस्थ या नात्यानें विचारतों व तूं त्या नात्यानें मला उत्तर दे. त्या संघापैकीं एखादी स्त्री तुझ्या परिचयाची होती किंवा नाहीं ?" **सर केनेथ** निःशंकपणें उत्तरला, "मला प्रत्यक्ष कळलें नाहीं; पण मीं तर्कानें जाणले." कपाळाला आठ्या घालीत राजा म्हणाला, "तर्क सुद्धां पुरे आहे. तूं सिंह-निशाणी सरदार आहेस खरा. पण सिंहाच्या पंजाला हात लावतांना संभाळ. चन्द्रानें मोहित होणें मूर्खपणाचें कृत्य होईल; परंतु त्याच्या प्राप्ती-करितां उंच बुरुजाच्या तटावर उडी मारणें हे आत्मघातकीपणाचें कृत्य होईल."

हें संभाषण संपलें नाहीं तोंच बाहेरच्या दालनांत गडबड ऐकूं आल्यामुळें रागाचा आविर्भाव टाकून नेहमींच्या रीतीनें राजा म्हणाला, "पुरे, तूं जलद जा व अरेबियन हकीमाला घेऊन येण्यास **डी व्हॉक्सला** सांग." तदनुरूप **सर केनेथ** बाहेर गेला. इतक्यांत कौन्सिलचें नियुक्त मंडळ (Deputation) **ग्रँड मास्टर ऑफ टेंप्लर्स** व **मार्किस ऑफ मॉंट सेरेट** राजेसाहेबांना भेटूं इच्छितात असें राजाच्या कंचुकीनें राजांना कळविलें. राजानें मानेनें होय म्हणतांच कंचुकीनें त्यांना राजासमोर आणलें. औपचारिक नमस्कार व विचारपूस झाल्यावर तें मंडळ म्हणालें, "राजेसाहेब पाखंडी हकीमाचें औषध घेण्याच्या तयारींत आहेत. पण, तो शत्रूकडून आलेला असल्यामुळें राजेसाहेबांनीं हकीमाच्या सचोटीची पूर्ण खात्री करून घेतल्या-

वांचून औषध घेण्याचें धाडस करूं नये." **रिचर्ड** म्हणाला " मी कौन्सिल-च्या आभारी आहे. पण तुम्ही क्षणभर बाहेर उभे राहा म्हणजे तुम्हाला सर्व कांहीं कळून येईल." ते दोघे बाहेर जात असतां हकीमासह **डी व्हॉक्स** व **सर केनेथ** तंबूंत शिरतांना त्यांना दिसले. **डी व्हॉक्स**च्या परवानगीनें ते त्यांच्याबरोबर तंबूत आले. **रिचर्ड**नें सर्वांचें स्वागत केले.

हकीमाला राजाच्या आजाराचीं सर्व लक्षणें व भावना कळविल्या असल्या-मुळें आल्याबरोबर त्यानें राजाची नाडी बऱ्याच वेळ व पूर्ण अवधानपूर्वक पाहिली. सभोंवार उभी असलेली मंडळी आपला श्वास कोंडून धरून स्तब्धपणें पाहत होती. नंतर, हकीमाने झऱ्याच्या पाण्यानें एक पेला भरला व आपल्या खिशातून काढलेली तांबडी छोटी पिशवी त्यांत बुडविली व त्यांतील औषध पेल्याच्या पाण्यात पूर्णपणें वितळले आहे अशी खात्री झाल्यावर हकीमानें पेला **राजा**पुढें केला. तो पिण्यापूर्वीं **रिचर्ड**नें हकीमाची नाडी पाहिली व तो उद्गारला, " अर्भकाच्या सारखी याची नाडी शातपणें उडत आहे. राजाना विषप्रयोग करणाऱ्यांची अशी वाहत नाहीं. **डी व्हॉक्स,** आम्ही जगलों किंवा मेलों, तरी या हकीमाला सन्मानपूर्वक व सुरक्षितपणें जाऊं द्या. मित्रा, उदार **सॅलॅडिन**ला माझा सलाम सांग. जरी मी मेलों तरी त्याच्या विश्वासूपणाबद्दल संशय न घेतां मरेन. जर जगलों तर मी, योद्ध्याने योद्ध्याचे आभार मानावे तसे तुमचे मानीन." असे बोलून व अंथरुणावर बसून व **मार्किस** व **ग्रँड मास्टर** यांचेकडे वळून तो म्हणाला, " माझ्या राजबंधूंनीं **सायप्रस** मद्यानें पेले भरावे; व **जेरुसलेम**च्या दरवाजावर जो कोणी आपली तलवार किंवा भाला मारील त्या पहिल्या धर्मयोद्धयाच्या अक्षयसन्मानार्थ ते पेले प्यावे." असे म्हणून **रिचर्ड**नें पेल्यांतलें सर्व औषध पिऊन पेला हकीमाच्या हातीं देऊन दमल्याप्रमाणें उशावर अंग टाकलें; नंतर, **हकीमा**ने न बोलतां **डी व्हॉक्स**खेरीज बाकीच्या सर्वांस दालनाबाहेर जाण्यास खुणावलें. तदनुरूप सर्व दालन रिकामें झालें.

त्याच वेळीं संध्याकाळची गार वाऱ्याची झुळूक सुरू झाली म्हणून **कॉनरॅड** व **ग्रँड मास्टर** पायींच **क्रिश्चन** सैन्याच्या तळामधून आपल्या मकाणाकडे जाऊं लागले. वाटेनें स्वारीच्या भवितव्याविषयीं बोलत असतां **कॉनरॅडनें** आपल्या सोबत्यास आपली खरी इच्छा व्यक्त करण्याची विनंति केली. **मास्टर** म्हणाला, " ही स्वारी अपेशी होऊन जर युरोपांतल्या

राजांना परत जावें लागलें तर **सुलतान सीरियांतील** तुमच्या आमच्या-सारख्या क्रिश्चन संस्थानांना राहूं देणार नाहीं. परंतु, जर युरोपांतील धाडसी धर्मयोद्धे विजयी झाले तर **मॉंट सेरेटचा कॉनरॅड जरुसलेमचा कॉनरॅड** होईल." **कॉनरॅड** म्हणाला, "माझ्या गरीब संस्थानाचा **अधिकारदंड** ( baton ) मी सुखानें धरीन; पण, **जरुसलेमच्या कायद्या-**प्रमाणें ( assize ) जमीन धारण करणाऱ्या गर्विष्ठ सरदारांच्या मर्जीनुरूप **राजदंड** ( Sceptre ) धरणें मला नको. पण **रिचर्ड** बरा होऊन त्याच्या मतानुरूप निवड झाली तर **गाय डी लुसिग्नान** निवडला जाईल." या भाषणावरून **मास्टरनें** तर्क केला, कीं **कॉनरॅडला** सध्यांची स्वारी विजयी होऊं नये असें वाटत आहे; तसें होण्यास **रिचर्ड** बरा तरी होतां कामा नये; किंवा त्याचें **फिलिपशीं** किंवा **आर्च ड्यूकशीं** वैमनस्य येऊन त्यांनीं आपलीं सैन्यें घेऊन परत देशीं जावें. ही कल्पना **मास्टरला** पसंत पडून तो आपल्या तंबूच्या वाटेला वळला; व **कॉनरॅड** पुढें चालला. इतक्यांत त्याला **पवित्र कबरस्थानचें स्मरण ठेवा** अशी आरोळी ऐकूं आली. धर्मयुद्धजागृति सर्वांच्या मनांत राहावी म्हणून अशी आरोळी तळांतील एका ठाण्यापासून दुसऱ्या ठाण्यापर्यंत रोज दिली जात असे. या क्षणीं **सेंट जॉर्जच्या** कृत्रिम टेकडीवर इंग्लंडचें निशाण फडकत असतांना **कॉनरॅडनें** पाहिलें. तेव्हां, त्याच्या डोक्यांत एक कल्पना आली. तिचा विचार करीत आपल्या तंबूंत येऊन त्यानें पलंगावर अंग टाकलें.

पहाटे उठल्याबरोबर तो रात्रीं मनांत ठरविलेल्या बेताप्रमाणें करण्यास सज्ज झाला. आपल्याला मिळालेलें उंची **सायप्रस** मद्य देऊन त्यानें नोकरास ऑस्ट्रियाच्या **आर्चड्यूककडे** पाठविलें. अर्थात् त्याचेकडून बारा वाजतां भोजनाचें आमंत्रण घेऊन नोकर तंबूंत आला. बाराच्या ठोक्याला **कॉनरॅड आर्चड्यूकच्या** मकाणास आला. लगेच मस्कऱ्यांसह मंडळी भोजनास बसली. धर्मयुद्धाकरितां आलेल्या राजेरजवाड्यांच्या कर्तबगारी-विषयीं मस्करे विनोदपर पण स्तुतिपर गीतांनीं व भाषणांनीं मंडळींचें मनो-रंजन करीत असतां, इंग्लंडच्या **रिचर्ड** राजाच्या शौर्याची प्रशंसा करण्यांत आली. तेव्हां **कॉनरॅड** म्हणाला, "योग्य माणसाला मान द्यावा हें ठीक आहे. परंतु मस्कऱ्यांनीं व भाटांनीं **रिचर्डचें** स्तोम माजवूं नये." मग तीन भाटांनीं ऑस्ट्रियाबद्दल स्तुतिपर गीतें म्हटलीं. अर्थ सांगणारा भाट म्हणाला,

गरुडपक्षी ही आमच्या उदार राजेसाहेबांची निशाणी आहे. सर्व पक्ष्यांमध्ये गरुड सूर्याच्या नजीक उंच उड्डाण करतो." **कॉनरॅड** म्हणाला, "पण, सिंहानें गरुडाच्यावर उडी मारली आहे. मी इंग्लंडच्या उजवा पाय व पंजा उभारलेल्या ( passant ) सिंहत्रयीच्या निशाणीबद्दल बोलत आहे. असें म्हणतात कीं ते पूर्वी **चित्ता** होते; पण, आतां ते सिंह झाले आहेत; व त्यांचा दर्जा पशू, पक्षी व मासे यांचे वरचढ झाला आहे. मद्यानें उत्तेजित झालेला **आर्चड्यूक** म्हणाला, "मेहेरबान, हें तुम्ही खरोखरीच (seriously) म्हणतां काय? या धर्मयुद्धांत जे स्वतंत्र राजे आपखुषीनें सहकारी होऊन आले आहेत त्यांचेपेक्षां आपण श्रेष्ठ आहों असें **रिचर्ड** म्हणतो काय?" **कॉनरॅड** उत्तरला, "मला सभोंवारच्या स्थितीवरून तसें वाटतें. आपल्या रणतळांत त्याचेंच निशाण सर्वांचेवर फडकत आहे, जणूं कांही तो सर्व क्रिश्चन सैन्याचा राजा व सेनापति आहे." **आर्चड्यूक** म्हणाला, "तुम्ही तें इतक्या शांतपणें सहन करतां काय?" **कॉनरॅड** म्हणाला, "महाराज, फ्रान्सचा **फिलिप** व ऑस्ट्रियाचा **लिओपोल्ड** यांसारखे बलाढ्य राजे जो अपमान शांतपणें सहन करतात त्याविरुद्ध जाण्याची माझ्यासारख्या गरीब **मार्किस**ला शक्ति आहे काय? जो अपमान तुम्हीं निमूटपणें साहतां त्यानें माझी मानहानि मुळींच होत नाहीं. इंग्लिश वर्चस्व मानण्यास तुम्हांला सबळ कारणें असलीं पाहिजेत." रागानें **लिओपोल्ड** उद्गारला, "**होली रोमन एंपायरचा एक महत्त्वाचा व मर्मस्थानभूत घटक** मी ऑस्ट्रियाचा **आर्चड्यूक** अर्ध्या बेटाच्या राजापुढे मान वाकवूं! माझ्या **ताबेदारांनो** (lieges), व **मस्कऱ्यांनो** (merry-men) माझ्या मागोमाग या; राजा किंवा कायझर याच्या निशाणाप्रमाणें ऑस्ट्रियाचें निशाण जेथून उच्च फडकत राहील तेथें तें नेऊं या." असें बोलून तो आपल्या बैठकीवरून उठला व पाहुण्यांच्या व अनुयायांच्या आनंदप्रदर्शक आरोळयाचे गडबडींत दालनाचे दाराबाहेर येऊन त्यानें आपलें निशाण हातीं घेतलें. **कॉनरॅड** म्हणाला, "महाराज, या वेळीं व रणतळांत शांतताभंग ( Offray ) करण्यानें तुमच्या शहाणपणाला कालिमा लागेल. इंग्लंडचा वरचढपणा थोडा वेळ सहन करणेंच बरें." **ड्यूक ओरडला**, "एक क्षणभरही सहन करणार नाही." असें म्हणून हातांत निशाण घेऊन व ओरडणाऱ्या पाहुण्यांच्या व हुजऱ्यांच्यासकट इंग्लंडचें निशाण फडकत असलेल्या कृत्रिम टेकडीकडे धांवत जाऊन

त्यानें त्या निशाणाला उपटण्याच्या इराद्यानें हात घातला. "इतक्यांत मस्कऱ्या ओरडला, महाराज, सिंहाला दात असतात हें ध्यानांत ठेवा. ज्याप्रमाणें पक्ष्यांमध्यें गरुड राजा आहे त्याप्रमाणें पशूंमध्यें सिंह राजा आहे. इंग्लंड व जर्मनी हे प्रांत जितके एकमेकांपासून वेगळे आहेत तसेच गरुड-सिंहाचे प्रांत वेगवेगळे आहेत. तेव्हां, आपण राजसिंहाचा अपमान करूं नका. परंतु गरुड व सिंह यांचीं निशाणें शांततेनें एकमेकांशेजारीं फडकत राहूं द्या." **लिओपोल्डनें** निशाणापासून आपला हात काढीत **कॉनरॅड** कोठें आहे तें पाहिलें. परंतु तो ड्यूकला दिसला नाहीं. कारण, ही अपायकारक दंगल सुरू होतांच तो निघून गेला. पण, ड्यूकनें असें वर्तन करावयास नको होतें असें तिऱ्हाईत लोकांजवळ उद्गार काढले.

इकडे **रिचर्डला** उठविण्याची वेळ झाली म्हणून त्याच्या डोळ्यांना व अंगाला स्पंजानें पाणी लावतांना **डी व्हॉक्सला** कळलें कीं ताप अजीबात निघाला आहे. **रिचर्डला** तसेंच वाटलें. कारण, त्यानें अंथरुणावरून उठत व डोळे चोळीत **डीव्हॉक्सला** खजिन्यांत किती पैका आहे असें विचारलें. त्याला नक्की सांगतां आलें नाहीं. राजा म्हणाला, "कांहीं हरकत नाहीं. पैसा कमी असो कीं जास्ती असो तो सर्व हकीमाला द्या. जर तिजोरींत हजार **बिझांट** (आठ आणे किंमतीचें सोन्याचें नाणें) नसतील तर त्या रकमेच्या भरतीस तितक्या किंमतीचीं रत्नें द्या." पण हकीम म्हणाला, "राजा, अल्लानें दिलेलें ज्ञान मी विकीत नाहीं. ज्या दैवी द्रव्यानें तुम्हांला आराम पडला तो दवा मी सोन्याहिऱ्यांच्या किंमतीनें विकूं लागलों तर मी अयोग्य हकीम होईन व औषधाचा गुण नाहींसा होईल. इतक्या मोठ्या म्लेंच्छ राजानें माझ्याबद्दल आदरानें बोलावें एवढें बक्षिस मला पुरें आहे. परंतु, आतां राजांनीं आपल्या अंथरुणावर स्वस्थ पडावें; दैवी द्रव्याची पुनरावृत्ति नको आहे असें मला वाटतें. तरी पण राजांनीं पूर्ण शक्ति येईपर्यंत फार श्रम करूं नयेत." इतक्यांत रणतळांत आरोळ्या व गाणें-बजावणें ऐकूं आलें. राजानें त्याची चौकशी करण्यास **डी व्हॉक्सला** बाहेर पाठविलें. थोड्या मिनिटांत परत येऊन तो म्हणाला, "आपल्या प्रिय सोबत्यासह **आर्चड्यूक** मिरवत व मौज करीत चालला आहे." "मूर्खानें आपला मद्यपीपणा (inebrity) तंबू बाहेर तरी दाखवावयाचा नव्हता." असें **रिचर्ड** बोलतो तोंच **कॉनरॅड** तंबूंत आला.

त्याला त्याबद्दल विचारतां तो उत्तरला, "**आर्चड्यूक** शुद्धीवर होता की नाहीं कोण जाणे, पण तो रणतळाच्या मध्यावरील **सेंट जॉर्ज मौंट**वर, इंग्लंडच्या निशाणाऐवजीं आपलें निशाण रोवीत आहे." हे ऐकतांच **रिचर्ड** घाईघाईनें कपडे करून **मौंट**पाशीं धावत आला. **डी व्हॉक्स,** निकटचे एक दोन हुजरे व **सर केनेथ रिचर्ड**च्या मागोमाग **मौंट**शीं येऊन पोहोचले. या धांवपळीने रणतळात गडबड उडाली व **रिचर्ड**चे सैनिक व इतर लोक तेथें आले. **लिओपोल्ड** आपल्या सोबत्यांसह आपल्या निशाणाशीं उभा होता.

**मौंट**वर गेल्यावर **रिचर्ड**नें ऑस्ट्रियाचें निशाण धरून रागानें विचारलें, "इंग्लंडच्या निशाणाशेजारी भिकार चिंधीचें हें निशाण कोणी रोविलें?" **आर्चड्यूक** धीटपणें उत्तरला, "तें मीं रोविलें." या उत्तराने **रिचर्ड** अधिकच चिडला; व त्याने निशाणाची काठी ताडकन मोडून तें पायाखालीं तुडविले. त्यामुळे **लिओपोल्ड**चा एक सरदार **वालेनरोड** ओरडला "बंधूनो, हा माणूस आपल्या देशाचा मान (निशाणरूप) पायाखालीं तुडवीत आहे. तरी या अपमानाबद्दल आपण त्याचें पारिपत्य करूं या." असें म्हणून **वॉलेनरोड रिचर्ड**वर तरवारीचा घाव घालणार तोंच **सर केनेथनें** तो घाव आपल्या ढालीवर घेतला. **रिचर्ड**च्या बाजूचे लोक **वॉलेनरोड**वर मारा करणार तोंच तो मोठ्यानें ओरडला, "ज्याच्या छातीवर **धर्मयुद्धाचा क्रॉस** आहे त्याचा जीव घ्यावयाचा नाहीं अशी मीं शपथ घेतली आहे. तेव्हा, **वॉलेनरोड,** तुला जीवदान देतों; पण माझी जन्मभर आठवण राहील अशी शिक्षा तुला करतों." असें म्हणून **रिचर्डनें** त्याला कमरेंत धरून इतक्या जोरानें फेकले, कीं तो चेंडूसारखा टेकडीच्या पायथ्याला जाऊन आदळला व अर्धमेला झाला. **रिचर्ड**च्या अलौकिक शक्तिप्रदर्शनानें **आर्चड्यूक** किंवा त्याचे अनुयायी यापैकीं कोणीही **रिचर्ड**शीं झगडण्यास पुढें आला नाहीं. इतक्यांत फ्रान्सचा **फिलिफ** तेथें आला. त्याला आलेला पाहून **रिचर्ड** किंचित् लाजला व **लिओपोल्ड**ला थोडासा धीर आला. **रिचर्डनें** सहज म्हणून ऑस्ट्रियाच्या निशाणावरील आपला पाय काढला. दोघांकडे पाहून **फिलिप** उद्गारला, "इंग्लंडचे महाराजे व ऑस्ट्रियाचे राजे धर्मयुद्धांतील वचनबद्ध सहकारी असतांना त्यांच्यामध्यें तंटा व्हावा काय?" **लिओपोल्ड** व आपण या तंट्यामुळे सारख्या पातळीवर आल्याबद्दल मनांत खेद करीत **रिचर्ड**

म्हणाला, "हा **आर्चडयूक** मगरूरीनें वागला व मीं त्याला शिक्षा केली." **आर्चडयूक** म्हणाला, "**रिचर्डनें** आमचें निशाण तुडवून आमचा अपमान केला." **रिचर्ड** म्हणाला, "यानें माझ्या निशाणानजीक आपलें निशाण रोविलें." **लिओपोल्ड** म्हणाला, "माझा दर्जा यांच्या बरोबरीचा असल्यामुळें यांच्या निशाणाशेजारीं माझें निशाण रोवण्याचा मला हक्क आहे." **रिचर्ड** म्हणाला, "तुम्ही बरोबरीचें नातें सांगूं लागाल तर तुमच्या निशाणाप्रमाणें तुमची गति होईल." **फिलिप** म्हणाला, "जरा दम धरा, मी **लिओपोल्ड**च्या चुकीच्या वर्तनाबद्दल त्याची खात्री करतों. **डयूकसाहेब,** आपल्या रणतळांत इंग्लंडचें निशाण टेकडीवर फडकूं दिल्यानें स्वतंत्र राजे **रिचर्ड**पेक्षां कमी दर्जाचे आहेत असें होत नाहीं. आपण धर्मयुद्धाचे वचनबद्ध यात्रेकरू, आपली प्रतिष्ठा तात्पुरती बाजूला ठेवून तलवारीनें पवित्र कबरस्थानाची वाट चोखाळीत आहोंत. मीं स्वतः व इतर राजे यांनीं **रिचर्ड**ची अतुल कीर्ति व अपूर्व **शक्तिमत्ता** ध्यानांत आणून त्याला श्रेष्ठ केलें आहे. पण इतर प्रसंगीं व इतर ठिकाणीं आपण तसें करणार नाहीं. या गोष्टीचा विचार करून तुम्हीं तुमचें निशाण त्याच्या निशाणाशेजारीं ठेवल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करावी व इंग्लंडच्या राजानें तुमच्या अपमानाबद्दल तुमचें समाधान करावें." **डयूक** म्हणाला, "हें भांडण आपण धर्मयुद्धाच्या सामान्य **कौन्सिल** पुढें ठेवूं." ही कल्पना **फिलिप**ला आवडली. पण **रिचर्ड** त्या गोष्टीला कबूल होईना. तेव्हां **फिलिप** म्हणाला, "झालेल्या गोष्टी विसरून सर्वांनीं धर्मयुद्धांत सहकार्य करावें." या म्हणण्याविरुद्ध कोणीही नाहीं असें पाहून **फिलिप** व **लिओपोल्ड** आपआपल्या मकाणाला गेले. आपल्या निशाणाचें रात्रीं संरक्षण करण्याची जरूरी आहे असें पाहून **रिचर्ड सर केनेथ**ला म्हणाला, "मला तुला देणगी द्यावयाची आहे ती मी तुला देतों. हें इंग्लंडचें निशाण येथें फडकत आहे. सरदारकी मिळविण्याच्या आदल्या रात्रीं उमेदवार ज्याप्रमाणें आपलें चिलखत संभाळतो त्याप्रमाणें हें निशाण संभाळ. त्यापासून तीन भाल्यांच्या लांबीपलीकडे जाऊं नको. त्याला इजा करणाराशीं निकरानें लढ. एकाच वेळीं तिघांपेक्षां जास्त इसमांनीं तुझ्यावर हल्ला केल्यास आपलें बिगूल फुंक. हें काम करावयास तूं तयार आहेस?" **सर केनेथ** उत्तरला, "मी मोठ्या खुषीनें हें काम पतकरतों. न केल्यास मी प्राण देण्यास तयार आहे. मी आपलीं शस्त्रास्त्रें घेऊन लगेच येथें येतों."

त्या मध्यरात्रीं **चन्द्र** आकाशात पुष्कळ वर आला असून त्यानें पांढरा शुभ्र प्रकाश सर्वत्र पाडिला होता. अशा वेळीं **सर केनेथ सेंट जॉर्ज मौंट**वरील इंग्लंडच्या निशाणापाशीं एकटा पहारा करीत होता. निशाणाच्या काठीशेजारीं त्याचा कुत्रा **रासवाल** शत्रूच्या पावलांची दुरून चाहूल ऐकतांच आपल्या धन्याला इशारा देण्याकरितां उभा होता. तो वेळोवेळीं निशाणाच्या उंची पदरांकडे पाही. तळाच्या दूरच्या **तटबंदी**कडून व शिपायांच्या **बराकीं**कडून पहाऱ्याच्या आरोळ्या ऐकूं येत; तेव्हां, तो एकदां खोल स्वरानें गुरगुरे; विशेष कांहीं एक न घडतां याप्रमाणें दोन तास झाले. इतक्यात **रासवाल** जोरानें भुंकला; व **मौंटच्या** दाट सावलीकडे धावूं लागला. सावलींतून येणाऱ्या अंधुक आकृतीस **सर केनेथनें** दरडावलें. घोगऱ्या व कर्कश आवाजानें एक खुजा माणूस ओरडला, "तुझ्या सैतानी कुत्र्याला आवर म्हणजे मी तुझ्या जवळ येऊन निकडीचा निरोप तुला कळवितों." **सर केनेथनें** कुत्र्याला आवरतांक्षणीं तो खुजा माणूस **मौंट** कष्टानें चढून धापा टाकीत त्याचेजवळ आला. तो राजस्त्रियांच्या तैनातींतील खुजा **नेक्टॅबॅनस** आहे असें **सर केनेथनें** तात्काळ ओळखलें. "माझ्या पहाऱ्याच्या मर्यादेबाहेर मला जाता येत नाहीं व तुम्हाला आंत घेतां येत नाही. तेव्हां तुमचे माझेजवळ काय काम आहे तें झटपट सांगा व येथून लवकर परत जा." लगेच **सर केनेथ** पहाऱ्याच्या फेऱ्या करूं लागला. त्याला अडवून खुजा म्हणाला, "**सर नाईट,** कर्तव्याला स्मरून तूं माझ्या बरोबर चल; नाही तर मला निर्वाणीचा उपाय योजावा लागेल." असें बोलून खुजानें माणकाची अंगठी **सर केनेथ**च्या हातांत दिली. ती आपल्या प्रिय पात्राची आहे असें त्यानें तत्काळ ओळखलें व तो किंकर्तव्यमूढ झाला. खुजा त्याला चलण्याची घाई करूं लागला. **सर केनेथनें** त्याच्यावर प्रश्नांचा भडिमार केला. "खरोखरी काम इतक्या निकडीचें आहे काय? मीं स्वतः तिला अशा रात्रीं भेटणें जरूर आहे काय? मला येथला पहारा सबंध रात्रभर करावयाचा आहे हें तिला कळलें आहे का? मी पहारा सोडून दूर गेलों तर माझ्या प्राणाशीं बेतेल, हें तिला माहीत आहे काय? शेवटीं तें ठिकाण येथून किती दूर आहे?" या काकुळतीनें विचारलेल्या प्रश्नास नकार देऊन खुजा अंगठी परत मागूं लागला. शेवटच्या प्रश्नास मात्र त्यानें राज-

स्त्रियांच्या तंबूकडे बोट दाखवून मूकपणें उत्तर दिलें. **सर केनेथ** पुढील परिणामाकडे दुर्लक्ष करून मनाशीं म्हणाला, " मी तेथून क्षणांत परत येईन. जर कोणी निशाणाजवळ येऊं लागला तर माझा कुत्रा भुंकेल व तें मला तत्काळ ऐकूं येईल. मी माझ्या प्रेमपात्राच्या पाया पडेन व पहारा पुरा करूं देण्याबद्दल तिची प्रार्थना करीन." **रासवाल**ला हाक मारून व निशाणाच्या काठीपुढें आपला झगा टाकून तो म्हणाला, " तूं येथें पहारा कर व कोणालाही जवळ येऊं देऊं नको." तदनुरूप **रासवाल** आपले कान उभारून व डोकें वर करून झग्याजवळ पहारेकऱ्याप्रमाणें उभा राहिला.

**नेक्टॅबॅनस**नें न बोलतां **सरदाराला** राणीच्या तंबूच्या समोर व अगदीं पडद्याशीं नेलें. त्यायोगें तो राणीच्या रखवालदारांना दिसला नाहीं. तेथें पोंहोचल्यावर खुजानें त्या पडद्याचा खालचा भाग उचलला; व **सर केनेथ**ला सरपटत तंबूत शिरण्यास खुणावलें. तदनुरूप तो ओणवून आंत शिरतांच खुजा बाहेरून कुजबुजला " मी बोलवीपर्यंत तेथें रहा."

इतक्यांत, पडद्याच्या आंत राजस्त्रियांचें कुजबुजणें, बोलणें व हसणें सरदाराला स्पष्टपणें ऐकूं आलें. त्यांत आपलें नांव निघाल्याचें ऐकून त्यानें निःशंकपणें सर्व संभाषण ऐकलें. त्यांच्या थट्टेच्या संभाषणावरून **सर केनेथ**ला कळलें कीं, **एडिथ**नें बोलावल्याबरोबर **सर केनेथ** आपल्याकडे येतो किंवा नाहीं याबद्दल राणीनें पैज मारली. **एडिथ** नको म्हणत असतां तिची माणकाची अंगठी खुजाबरोबर देऊन इकडे थोडा वेळ येण्याबद्दल **एडिथ**चा म्हणून निरोप धाडला; व आतां राणी **सर केनेथ** येण्याची वाट पाहत बसली आहे. हे कळून **सर केनेथ**ला वाईट वाटलें; पण या कटांत निदान **एडिथ**चें अंग नाहीं हें पाहून त्याला किंचित् समाधान वाटलें.

**सर केनेथ** आपल्या तंबूजवळ आला आहे हें कळल्यावर राणीनें **एडिथ**ला तातडीनें बोलावणें पाठविलें. तिनें इतक्या अवेळीं कां बोलाविलें म्हणून राणीला विचारलें. ती उत्तरली, " तूं पैज हरलीस व तुझी अंगठी मला मिळाली." **एडिथ** खेदानें म्हणाली, " जर माझ्या नांवानें त्या शूर शिपायाला येथपर्यंत आणविलें असलें तर तुमची थट्टा होईल पण त्याचा जीव जाईल. कारण, राजेसाहेब लष्करी गुन्ह्याला फाशीची शिक्षा दिल्या-

वांचून राहणार नाहीत. तरी त्याला ताबडतोब परत जाऊं द्या." असें बोलून **एडिथ** राणीच्या पाया पडली. ती म्हणाली, "**एडिथ,** तूं ऊठ; खात्री ठेव कीं तशी वेळ आली तर सर्व दोष मी आपल्यावर घेईन व राजेसाहेबां-कडून त्याला क्षमा करवीन. **नेक्टॅबॅनस**मार्फत त्याला पहाऱ्यास जाण्यास सांगूं." पण खुजा म्हणाला, "तो पडद्यापलीकडे असल्यानें त्याला तुम्हीच सांगा." राणी घाबरून म्हणाली, "आतां काय करणार?" **एडिथ** धीटपणें उत्तरली, "आपण त्याला भेटलें पाहिजे व त्याची क्षमा मागितली पाहिजे." इतक्यांत पडदा खालीं पडला. रात्रीच्या पोशाखांत **सर केनेथ**च्या दृष्टीस पडणें बरें नाही म्हणून राणी लाजून पळत दुसऱ्या दालनात गेली. **एडिथ सर केनेथ** उभा होता तेथें आली व म्हणाली, "तुम्ही आधीं पहाऱ्याकडे जा. मला कां तें विचारूं नका." तो उत्तरला, "त्याची जरूरी नाही. मी सर्व ऐकलें आहे." **एडिथ** म्हणाली, "अरेरे, मिनिटामिनिटाला तुमचा अपराध वाढत असून तुम्हीं येथें कां थांबतां?" तो उत्तरला, "माझ्या धाडसाबद्दल मला क्षमा करा म्हणजे मी चाललो." ती म्हणाली, "मी क्षमा करतें. पण तुम्ही आधीं परत जा." जाण्यापूर्वी तो **एडिथ**ची अंगठी परत देऊं लागला. तेव्हा ती म्हणाली, "तुमच्याबद्दलच्या माझ्या आदराची खूण म्हणून ती आपल्या-जवळ ठेवा, पण तुमच्या नसलें तरी माझ्याकरितां येथून ताबडतोब जा." इतक्यांत त्याला **सेंट जॉर्ज मौंट**कडून प्रथम आपल्या कुत्र्याचें भयकर, रागीट व बेफाम भुंकणे व लगेच तीव्र वेदनेचें ओरडणे ऐकूं आलें. तो हरिणासारखा उड्या मारीत निशाणापाशीं येतों तों निशाण चोरलें असून व त्याची काठी जमिनीवर मोडून पडली असून शेजारीं **रासवाल** मरणोन्मुख पडला आहे असें त्याला दिसलें.

इकडे **रिचर्ड** निजल्यापासून त्याच्या पलंगाशीं राहून हकीमानें राजाला रात्रीं दोनदां औषध पाजलें. रात्रीच्या तीन वाजतां तो आपल्या तंबूकडे जाण्यास निघाला. पण आपल्या पहिल्या रोग्याची प्रकृति पाहण्याकरिता तो **सर केनेथ**च्या तंबूंत डोकावला. तेथें **सर केनेथ** नसून तो **सेंट जॉर्ज मौंट**कडे इंग्लंडच्या निशाणाच्या संरक्षणार्थ सायंकाळपासून गेला आहे असें हकीमास कळलें. म्हणून तो **मौंट**कडे गेला. त्यानें तेथें घडलेला प्रकार पाहिला.

सूर्योदयाबरोबर **सर केनेथ** दुःखित मुद्रेनें **रिचर्ड**च्या तंबूंत आला.

त्यानें विचारलें, “ **सर स्कॉट** बोल, तुझा पहारा सावध, सुरक्षित व सन्मानाचा झाला ना ?” तो उत्तरला, “ नाहीं, इंग्लंडचें निशाण चोरलें गेलें.” **रिचर्ड** उद्गारला, “ आणि तूं जिवंतपणें तें सांगावयास आलास ? तुझ्या अंगावर ओरखडा दिसत नाहीं. खरें बोल. राजाशीं विनोद करणें बरें नाहीं.” **सरदार** उत्तरला, “ महाराज, नाहीं, मी खरें बोललों आहे.” राजानें **डी व्हॉक्स**ला पाहून येण्यास सांगितलें. पण तो निघण्यापूर्वींच **रिचर्ड**चा कंचुकी **सर हेन्री नेव्हिल** यानें तंबूंत येऊन निशाणाच्या चोरीची गोष्ट खरी आहे व तेथें रक्ताचा पूर सांचला आहे असें राजास सांगितलें. **रिचर्ड**चा संताप अनावर होऊन त्यानें पलंगाशेजारीं असलेली छोटी तलवार उचलली व **सर केनेथ**वर उगारली. पण, संगमरवरी मूर्तीप्रमाणें निश्चल शरीर, उघडें डोकें, जमिनीकडे लावलेले डोळे व प्रार्थना पुटपुटणारे ताठ ओंठ अशा स्थितींत **सर केनेथ** उभा होता. त्याच्या त्या धीरगंभीर मूर्तीकडे पाहून राजा तलवारीचें टोक जमिनीकडे करून उद्गारला, “ तूं एके वेळीं शूर होतास; तुझा पराक्रम मीं प्रत्यक्ष पाहिला आहे. निशाणाच्या रक्षणार्थ तूं तीन– एका– चोरांना ठार केलें, निदान, निशाण-रक्षणार्थ एक घाव तरी घातलास असें म्हण म्हणजे तुला जिवदान देतों. मग तूं येथून आपलें तोंड काळें कर !” **केनेथ** धीटपणें म्हणाला, “ महाराज, तुम्हीं मला लबाड म्हटल्यानें माझें तोंड काळें झालें आहे. मी माझा पहारा टाकून दूर गेलों. पण माझ्या कुत्र्यानें निशाण-रक्षणार्थ आपलें रक्त सांडलें.” हें ऐकून **रिचर्ड** पुनः संतापला व त्यानें **केनेथवर** तलवार उगारली. पण त्याची गंभीर, निर्भय व बेदरकार वृत्ति पाहून तो थांबला व म्हणाला, “ जेथें भीतीचें किंवा प्रतिकाराचें चिन्ह नाहीं तेथें माझ्यानें घाव घालवत नाहीं.” **केनेथ** अधिक बोलण्याचे आधींच **रिचर्ड** म्हणाला, “ इंग्लंडचा अपमान सहन करणारा माझा एकुलता एक भाऊ असतां तरी मी त्याच्या अपराधाची क्षमा केली नसती.” **केनेथ** म्हणाला, “ मला क्षमा मागायची नाहीं. पण मला कळलेली गुप्त गोष्ट सांगावयाची आहे. मग मी मरणास तयार आहे.” **रिचर्ड**नें खुणेनें **नेव्हिल**ला बाहेर जाण्यास सांगितलें. मग **केनेथ** म्हणाला, “ महाराज, **सॅरॅसन सुलताना**शीं राजकुमारी **एडिथ**चा विवाह घडवून आणण्याचें कबूल करून कायमचा तह करण्याचें **कौन्सिल**मध्यें घाटत आहे.” **रिचर्ड** रागानें उद्गारला, “ तिचें

नाव काढूं नको." **केनेथ** धीटपणे म्हणाला, "तिचें नांव माझ्या तोंडीं शेवटपर्यंत राहील व तिची मूर्ति माझ्या मनापुढे अखेरपर्यंत राहील. तुम्ही आपलें सामर्थ्य माझ्या शरीरावर दाखवाल; पण तें माझ्या मनावर चालणार नाहीं." **केनेथ**च्या निर्भीड निश्चयानें **रिचर्ड** चकित झाला व उद्गारला,

"हा मला वेड लावील." इतक्यांत, राणी आल्याची वर्दी आल्यामुळे **केनेथ**ला दुसऱ्या तंबूंत पण प्रतिबंधांत ठेवण्यास सांगून **रिचर्ड** आपल्या राणीचें स्वागत करण्यास हात पुढे करणार तोंच तिनें राजाचे पाया पडून त्याचें कणखर मनगट आपल्या दोन्ही नाजूक हातात धरून तें आपल्या ओठांशीं नेऊन म्हटलें, "स्वारींना न कळविता येथें येण्याच्या धिटाई-बद्दल क्षमा मागून त्या दुर्दैवी स्कॉटिश सरदाराला..." **रिचर्ड** कठोरपणे म्हणाला, "त्याचें नाव काढू नको. त्याचे मरण टळत नाहीं." राणी म्हणाली, "महाराज, एक रेशमी निशाण चोरीस गेलें. पण स्वतः विणलेले व माझ्याजवळच्या सर्व मोत्यांनीं शृंगारलेलें निशाण मी देईन." रागानें **रिचर्ड** म्हणाला, "तुम्ही काय म्हणतां तें तुम्हांला कळत नाहीं. पूर्व खंडांतील सर्व मोत्यांनींसुद्धां इंग्लंडच्या निशाणावरील काळा डाग धुऊन निघणार नाही. तुमचें योग्य स्थान, योग्य वेळ व योग्य मर्यादा या सोडूं नका. सध्या मी ज्या कामात गुंतलों आहे त्यांत तुमचें **सहकार्य** शक्य नाहीं." राणीच्या मागें उभी असलेली **एडिथ** पुढे होऊन म्हणाली, "महाराज, दयेच्यापेक्षा तुमच्या न्यायबुद्धीची मी याचना करतें. राजाचें कान न्यायबुद्धीच्या हाकेला सर्व स्थानीं, सर्व वेळीं व सर्व स्थितींत उघडे असावेत." आपल्या पलंगावरून किंचित् उठून पण सरळ बसून **रिचर्ड** म्हणाला, "आमची भगिनी जर तिच्या व आमच्या योग्यतेला साजेसें बोलत असेल तर आम्ही आनंदानें उत्तर देऊं." **एडिथ** म्हणाली, "ज्या सरदाराचा प्राण आपण आता घेणार आहां त्यानें पूर्वीं क्रिश्चन धर्माची सेवा केली आहे. केवळ मूर्खपणानें व रिकामपणानें पसरलेल्या जाळ्यांत सांपडून तो कर्तव्यच्युत झाला आहे. माझ्या नांवानें त्याला निरोप धाडण्यांत आला. दुसऱ्या गुणांत कितीही कमीपणा असला तरी ज्या कुमारिकेच्या शरिरांत व शिरात **प्लँटेजिनेट** राजवंशाचें रक्त खेळत आहे तिची आज्ञा पाळण्याकरितां कोणता क्रिश्चन सरदार हातचें काम टाकून तिच्याकडे धांव घेणार नाहीं ?" आपला राग दाबून राजानें विचारलें, "तूं त्याला भेटलीस ?" **एडिथ** म्हणाली, "होय,

कां हें सांगण्याची ही वेळ नव्हे. पण मी आपला निर्दोषीपणा किंवा दुसऱ्याचा दोषीपणा दाखविण्याकरितां आलें नाहीं." राजा म्हणाला, "तूं त्याला कोठे भेटलीस?" ती उत्तरली, "राणीच्या तंबूत." **रिचर्ड** म्हणाला, "आपल्या दर्जाच्या पुष्कळ वरच्या दर्जाच्या कुमारिकेकडे सकाम दृष्टीनें पाहण्याच्या त्या योद्धयाच्या उर्मटपणाकडे मीं कानाडोळा केला; परंतु, रात्रीचे प्रहरीं व राणीचे तंबूंत तूं त्याची भेट घेतलीस याबद्दल, तुला मठांत पश्चात्ताप करीत आयुष्य कंठावें लागेल." **एडिथ** म्हणाली, "तुम्हीं म्हणतां तशा वेळीं व स्थळीं आमची भेट व बोलणीं झालीं असलीं तरी सभ्यपणाचें अतिक्रमण झालें नाहीं; याबद्दल तुमच्या राणीसाहेब तुमची खात्री करूं शकतील. मोहजालांत सांपडल्यामुळें ज्याचे हातून अपराध घडला त्यावर दया करा अशी माझी याचना. देवाच्या न्यायासनासमोर अशी दया मागण्याची वेळ तुम्हांला कधीं तरी येईल." राजा, कटु शब्दानें म्हणाला, "शहाणी व उदार गणलेली **एडिथच** का हें बोलत आहे? वधस्तंभाहून तुझ्या **प्रियकराचें** मुंडकें आणवून तें तुझ्या मठांतील खोलींतल्या क्रिस्ताच्या मूर्तीशेजारीं चिरस्थायी स्मारक म्हणून मला ठेवतां येईल." **एडिथ** म्हणाली, "तें एका थोर सरदाराला क्रूरपणें व अयोग्यपणें ठार मारल्याचें स्मारक आहे असें मी समजेन."

"तुम्ही त्याला माझा **प्रियकर** म्हणतां ना? होय, तो माझा **प्रियकर** होता इतकेंच नाहीं तर **खरा** व **सत्त्वशील** प्रियकर होता. परंतु त्यानें शब्दानें किंवा दृष्टीनें माझ्याजवळ प्रेमयाचना केली नाहीं; माणसें आपल्या आवडत्या साधूची जशी सेवा करतात तशी तो माझी सेवा करीत होता. अशा सेवेखातर त्या शूर, थोर व विश्वासू सरदाराला मृत्यु यावा ना?" राणी हळूच म्हणाली, "गप्प, गप्प; अशा बोलण्यानें तूं त्यांना अधिक संतापवीत आहेस." **एडिथ** म्हणाली, "मी त्याची फिकीर करीत नाहीं. त्या योग्य सरदाराला शिक्षा होऊं दे म्हणजे माझ्याकरितां प्राणार्पण करणाऱ्याचें स्मारक मी कसें करतें तें पाहशील. आमचा परस्परांचा दर्जा भिन्नभिन्न असल्यामुळें माझी इच्छा असतांना सुद्धां मला त्याची पत्नी होतां आलें नसतें. पण, मृत्यु रावरंकांना एकत्र आणतो. मी यापुढें त्याची विधवा पत्नी होईन."

राजा उत्तर देण्यापूर्वींच एक संन्यासी घाईघाईनें तंबूंत आला. **रिचर्ड** म्हणाला, "सरदार अजून जिवंत कसा राहिला?" संन्यासी म्हणाला,

"**डी व्हॉकस**ला फाशी तहकूब ठेवण्यास सांगून मी आपल्यापुढे आलों आहे. ज्यानें **एनगाडीस** वीस वर्षे तपश्चर्या करून शरीर झिजविलें तो मी **सर केनेथ**ला क्षमा करा म्हणून तुमची विनवणी करीत आहे. तसें न केल्यास देव तुम्हांला दड करील." **रिचर्ड** म्हणाला, "संन्याशाच्या शिव्याशापाला मी भीक घालतों!" असें बोलून **रिचर्ड** उद्‌गारला, "**सेंट जॉर्ज**चे नांवानें मी शपथ घेतों कीं..." त्या क्षणीं आलेला हकीम, "शपथ घेऊं नका. फार महत्त्वाच्या कामाकरिता मी आलों आहे" असें म्हणाला. दुपारपर्यंत अपराध्याला शिक्षा होणार नाहीं असे आश्वासन राजाकडून मिळाल्याने राजस्त्रिया बाहेर गेल्या.

हकीम आल्याबरोबर त्याच्या मनातील हेतु रिचर्डने ताडला व तो मनाशीं म्हणाला, "न्यायाने शिक्षा झालेल्या अपराध्याला माझ्यासारख्या राजाला शिक्षा करतां येऊं नये? पत्नी, बहीण, संन्यासी व हकीम एकामागून त्या अपराध्याच्या वतीनें रदबदली करीत आहेत!" नंतर तो उघडपणे म्हणाला "तुम्ही हजार कैद्यांची माफी मागा मी देतों. पण या माणसाचा जीव मागूं नका." हकीम म्हणाला, "ज्या द्रव्याने तुम्ही व इतर पुष्कळ रोगी बरे झाले तो एक **मंत्रित ताईत** ( Talisman ) आहे. मी तो पाण्यांत बुडवितों व त्यांतलें औषध पाण्यात उतरलेंसें दिसले कीं मी ते रोग्यास एकदां किंवा अनेकदां देतों व रोगी बरे होतात. माझ्या द्रव्याचा गुण नाहीसा होऊ नये म्हणून मी ज्याप्रमाणें तो विकीत नाहीं; त्याप्रमाणें दुसरी एक अट मला पाळावी लागते. प्रत्येक चान्द्रमासांत बारा रोगी मीं बरे केले पाहिजेत; तसें झालें नाहीं तर **मंत्रित ताइता**चा गुण जातो इतकेंच नव्हे, तर शेवटचा रोगी व हकीम हे वर्षाच्या आंत मरतात. ही ठरलेली बारा संख्या भरण्यास मला एक रोगी हवा आहे." राजा थोडा वेळ विचार करून म्हणाला, "हकीम, तुम्हीं माझ्या व तुमच्या जीवाबद्दल तुमच्या भोळसर समजुतीप्रमाणें जी भीति व्यक्त केली ती जरी मला खरी वाटत नाहीं, तरी तुमच्या समजुतीखातर आणि तुम्हीं मला दिलेल्या प्राणदानाखातर माझा अपराधी मी तुमचा गुलाम म्हणून तुमच्या स्वाधीन करतों. पण त्याला बजावा कीं, त्यानें माझ्यापुढें येतां कामा नये."

हा विलक्षण प्रसंग घडल्यावर थोड्याच वेळांत **टायर**चा **आर्चबिशप** **रिचर्ड**ला भेटण्यास आला व म्हणाला, "**सॅलॅडिन** आपल्या शंभर

जमातींचीं सर्व सैन्यें एकत्र आणीत आहे; आपल्या मांडलिकांसह फ्रान्सचा राजा **फिलिप,** आपण केलेल्या अपमानानें संतापलेला ऑस्ट्रियाचा **आर्चड्यूक लिओपोल्ड** आणि आपल्या उद्दाम व उपमर्दकारक बोलण्या चालण्यानें असंतुष्ट झालेले राजेरजवाडे धर्मयुद्धास कंटाळून युरोपला परत जाण्याच्या विचारांत आहेत. तेव्हां **सॅलॅडिनच्या** वाढत्या सामर्थ्याला तुम्हांला एकट्याला तोंड द्यावें लागेल. फार तर **कॉनरॅड** व **टेंपल** व **सेंट जॉन** मठाचे मुख्य तुम्हांला थोडें फार व नाखुषीनें साहाय्य देतील. अशा स्थितींत पराभूत होऊन परत जाण्या-ऐवजीं **सॅलॅडिनशीं सन्मान्य** तह करण्याची संधि दवडूं नये असें **कौन्सिलचें** मत आहे." **रिचर्डनें** विचारलें, "कोणत्या अटीवर **सॅलॅडिन** तह करण्यास तयार आहे?" **आर्चबिशप** उत्तरला, "**रिचर्ड** व **सॅलॅडिन** या दोघांना **जेरुसलेमचे** जोड संरक्षक व जोड **सार्वभौम** नेमावें. पवित्र **कबरस्थान** व **पवित्रभूमि** सर्व यात्रेकरूंना खुली ठेवून त्यांच्या जीविताची व मालमत्तेची हमी दोन्ही राजांनीं घ्यावी. आणि **सॅलॅडिननें** क्रिस्ती धर्म स्वीकारल्यावर **पोपच्या** व आपल्या परवानगीनें व तिच्या पसंतीनें **एडिथ प्लँटॅजेनेटचा सॅलॅडिनशीं** विवाह करून द्यावा." हें ऐकून **रिचर्ड** म्हणाला, "मी घाईखोर व गर्विष्ठ आहे असें तुम्ही म्हणतां; पण, **प्लँटॅजेनेट** (हलकें केरसुणीचें झाड) नांवाच्या मूळ अर्थाप्रमाणें मी नम्र होतों किंवा नाहीं तें तुम्हीं पहाल." असें बोलून अगदीं साधा पोशाख करून **रिचर्ड आर्च-बिशपसह कौन्सिलच्या** सभेंत हजर झाला.

त्याच्या धीरोदात्त आकृतीनें चकित होऊन त्याला सर्व राजांनीं उत्थापन देऊन त्याच्याकरितां राखून ठेवलेल्या उच्चासनावर बसविलें. **रिचर्डनें** खुल्या दिलानें व आनंदित मुद्रेनें सर्वांचे आभार मानले. मग त्यानें आपल्या स्वभावांतील व भाषणपद्धतींतील दोष कबूल करून सर्वांची मोकळ्या मनानें क्षमा मागितली व शेवटीं ज्या पवित्र कार्याकरितां सर्व राजेरजवाड्यांनीं आपलें वैभव, आपला दर्जा व सुखाची राहणी टाकून इतक्या दूरच्या प्रांतांत येऊन कष्ट केले व त्रास सोसला तें कार्य तडीस नेण्याकरितां शेवटचा एक प्रयत्न करावा अशी कळकळीची विनंति करून **रिचर्डनें** आपलें भाषण संपविलें. त्या लष्करी राजाच्या ओबडधोबड वक्तृत्वानें व दृढनिश्चयी वृत्तीनें जमलेल्या सर्व धर्मयोद्धयांना स्फुरण चढलें व ते एकदम ओरडत उठले,

"**राजसिंह,** आम्हांला **जेरुसलेम**ला घेऊन चला. परमेश्वराची हीच इच्छा आहे."

कौन्सिलांतील विजयानें आनंदित झालेला **रिचर्ड राणीच्या** व **एडिथच्या** महालांत जाऊन त्यानें त्यांचीही क्षमा मागितली व त्याच्या समाधानाकरितां राणीच्या तैनातींतील खुजा दांपत्याला **सॅलॅडिन**कडे पाठवून दिलें. **सर केनेथ**ला घालवून दिल्याच्या चवथ्या दिवशी सायंकाळीं **रिचर्ड** हवा खात बसला असतां, **सॅलॅडिन**कडून एक माणूस निरोप घेऊन आला आहे अशी वर्दी आल्यावर त्याला आंत बोलावण्यात आले. तो काळा होता; पण त्याची आकृति आकर्षक होती. तो राजाच्या पाया पडला व त्यानें नम्रतेनें एक पत्र राजास सादर केलें. तें वाचून राजाला कळलें की, **झोहाक** नामधारी हा गुलाम न्युबियन क्रिश्चन ॲबिसीनियन असून जन्मतः मुका आहे. पण तो शूर विश्वासू, शहाणा व कर्तव्यदक्ष आहे. आपण पाठविलेल्या दोन खुजाच्या नजराण्याचा मोबदला म्हणून मी त्याला आपलेकडे पाठवीत आहे. थोड्याच वेळांत आपली सेवा करून तो आपल्या गुणाविषयीं खात्री पटवील."

या **सॅलॅडिन**च्या सही-शिक्क्याच्या पत्रातील मजकुरावर विश्वासून **रिचर्डनें** त्याला आपला खासगी हुजऱ्या म्हणून आपल्या तंबूत राहण्यास खुणावून त्यास आपली ढाल पॉलिश करण्यास बसविलें. थोड्याच वेळात त्यानें ती आरशासारखी स्वच्छ केल्यामुळें त्यांत तबूसमोर येणाऱ्या माणसाची आकृति व हालचाल स्पष्ट दिसूं लागली.

इतक्यांत रणतळांत एक टेंगणा माणूस—काजी, फकीर, वेडा, विदूषक किंवा धर्मवेडा मुसलमान यांपैकीं कोण होता कोण जाणे—तंबूबाहेर असलेल्या रखवालदाराजवळ आला. त्यांनी त्याला नाचण्यास सांगितलें. तो नाचत नाचत तंबूच्यासमोर आला व दमल्याप्रमाणें पडला म्हणून **सायप्रस** दारू त्याला देण्यात आली. दारू पिऊन हुशार झाल्याचें दाखवून त्यानें कपड्याआड लपविलेली छोटी तलवार बाहेर काढून, वाचीत बसलेल्या **रिचर्ड**कडे, सर्पासारखा सरपटत जाऊन ती तलवार **रिचर्ड**च्या डोक्यावर धरली. ढालीच्या आरशातून पाहताच गुलामानें राजाच्यापुढे धांवत येऊन त्या माणसाचा उगारलेला हात धरला. इतक्यांत त्यानें त्या काळ्या गुलामावर वार करून त्याला जमिनीवर पाडलें. आपल्या जिवावरील संकट

पाहून **रिचर्डनें** तिपाई ( stool ) वरून उठून ती त्या **धर्मवेड्यावर** जोरानें फेकून त्याच्या डोक्याची करवंची फोडली. त्यामुळें तो तत्काळ मेला. इतक्यांत राजाचें लक्ष गुलामाकडे जाऊन त्याला जखम झाली आहे असें राजाच्या लक्षांत आलें. धर्मवेड्याची तलवार विषांत बुडविलेली असली पाहिजे असें वाटून **रिचर्डनें** आपल्या रखवालदारांस त्याची जखम तोंडानें चोखून रक्त थुंकून टाकण्यास फर्माविलें. ते कांकू करीत आहेत असें दिसतांच राजानें त्याची जखम चोखली; पण तोंडांत रक्त क्वचित् आलेलें कळून राजा थांबला व गुलाम दूर गेला. इतक्यांत **नेव्हिल** कंचुकी आंत आला. **रिचर्ड** म्हणाला, " भिण्याचें कारण नाहीं. पण, या गुलामाला तुझ्या मकाणास ने व त्याची काळजी घे. मात्र त्याला तुझ्या नजरेआड करूं नको. तो दिसतो त्यापेक्षां निराळा आहे. नंतर, **न्युबियन**कडे वळून तो म्हणाला, तूं गुप्त गोष्टी उकलणारा आहेस म्हणून **सॅलॅडिन**नें कळविलें आहे. माझ्या निशाणाचा अपमान करणारा जर तूं सांपडून दिलास तर तुझ्या भारंभार सोनें मी तुला बक्षीस देईन. त्या मुक्यानें रुकारादाखल मुक्याचा **अर्धवट आ** केला. या इतक्या हुशार मुक्याला लिहितां येत असलें पाहिजे असा तर्क करून **रिचर्डनें** लिहिण्याचें सामान आणवून त्याचें पुढें ठेवविलें. लगेच मुक्यानें खालील अर्थाचा मजकूर लिहिला.

जर क्रिश्चन राजेरजवाडे माझ्या समोरून जाण्याची तजवीज केली गेली; तर मी अपराध्याला शोधून काढीन. या शोधाबद्दल मला बक्षीस नको. पण **सॅलॅडिनचें** पत्र राजकुमारी **एडिथला** समक्ष देण्याची परवानगी मला द्यावी. राजानें म्हटलें तूं जर अपराध्याला धरून दिलास तर तुझी विनंति मान्य करूं. असें बोलून राजानें गुलामाला धाडून दिलें.

पूर्वी ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं वादीनें बांधलेल्या कुत्र्यासह मुक्या गुलामाला **सेंट जॉर्ज** मौंटवरील नव्या निशाणानजीक बसविण्यांत आलें. त्याचे जरा खालीं **रिचर्ड** घोड्यावर बसून उभा राहिला. राजस्त्रिया चिकाच्या पडद्याच्या तंबूंत बसल्या.

सर्व तयारी झाल्यावर आपआपल्या पथकासकट सर्व राजेरजवाडे **मौंट**च्या पायथ्याशीं जमले, मग, **मौंट**च्या थोड्याशा पायऱ्या चढून प्रत्येक राजा प्रथम **रिचर्डला** व मग त्याच्या निशाणाला मुजरा करून परत आपल्या जागेवर जाई. **रिचर्ड** मधून मधून गुलाम व त्याचा कुत्रा याकडे पाही.

वहिमी **लिओपोल्ड** येता क्षणीं **रिचर्डनें** गुलामाकडे व कुत्र्याकडे बारकाईनें पाहिलें. पण त्यांची कांहीं एक हालचाल दिसली नाही.

नंतर **मॉंट सेरॅटचा मार्किस** उंची पोशाखांत व उमद्या घोड्यावर बसून **मौंटच्या** पायऱ्या चढूं लागतांच **रिचर्ड** एक-दोन पायऱ्या खालीं उतरला. पण, क्षणार्धात **रासवाल** भयंकरपणें भुकत पुढें जाऊं लागतांच मुक्याने त्याची वादी सोडली; तोंच त्या कुत्र्यानें **कॉनरॅडच्या** घोड्यावर उडी टाकून **मार्किसची** मानगुटी धरून त्याला खालीं ओढलें. घाबरलेला घोडा सैरावैरा पळत गेला व घोडेस्वारानें वाळूवर लोटांगण घातलें. **रिचर्ड** मुक्याला म्हणाला, "कुत्र्याने बरोबर ओळखले; पण त्याला आवर, नाहीं तर तो **कॉनरॅडची** नरडी आवळून त्याचा प्राण घेईल." तदनुरूप मुक्यानें कुत्र्याला मागें ओढून वादीनें बाधलें. इतक्यात **कॉनरॅडचे** सैनिक त्याचे-जवळ येऊन ओरडले, "त्या गुलामाचे व त्याच्या कुत्र्याचे तुकडे करा." **रिचर्ड** सर्वांना ऐकूं जाईल अशा पहाडी आवाजानें ओरडला, "जो कुत्र्याला इजा करील तो जिवंत राहणार नाही. परमेश्वरानें दिलेल्या उपजत बुद्धीनुरूप त्यानें आपलें काम केलें. **कॉनरॅड**, तू राजद्रोही आहेस. तसा मी तुझ्यावर आरोप करतों." गोंधळलेला **कॉनरॅड** उद्गारला, "मीं निशाणाला हात लावला नाहीं." **रिचर्ड** म्हणाला, "या शब्दावरून तुझ्यावरील आरोप शाबीत होतो. गुन्ह्याच्या जाणीवेशिवाय निशाणाबद्दल प्रश्न आहे हें तुला कसें कळलें." **कॉनरॅड** म्हणाला, "पण याच कारणाकरितां तुम्हीं हा गोंधळ माजविला नाहीं काय? कुत्र्याच्या साक्षीवरून तुम्हीं माझ्यावर आरोप करतां काय?" हें बोलणे ऐकून **फिलिप** म्हणाला, "राजेरजवाडे हो, आपआपली पथकें घेऊन आपण सर्व आपआपल्या मकाणास जाऊं या. एका तासानंतर आपण मात्र कौन्सिलगृहात जमून या नव्या गोंधळामधून कांहीं सीधा मार्ग काढू या." **रिचर्ड** उत्तरला, "मला ही सूचना मान्य आहे."

कौन्सिलहून परत आल्याबरोबर **रिचर्डनें न्युबियन** गुलामाला बोलावून घेतलें व म्हटले, "तुला एका कामांत यश आलें तसें दुसऱ्यांतही येवो. तुझ्या विनंतीप्रमाणें आम्हीं तुला आमच्या पुतणीची खासगी भेट घेऊं देतों. पण तिच्या दिव्य दर्शनानें तुला वाचा आली तरी तूं पत्र देण्यापलीकडे कांहीं एक करूं नको; **नेव्हिल** तुला राजस्त्रियांच्या तंबूकडे नेईल."

राजानें आपलें वेषांतर ओळखलें कीं काय— वाचकांना मागील हकीकती-वरून **मुका** गुलाम **सर केनेथ** होय हें समजून आलेंच असेल— अशा शंकित मनःस्थितींत मुका **एडिथ**च्या तंबूंत एकदां शिरला. एक गुडघा टेकून डोळे जमिनीकडे लावून व दोन्ही दंड छातीवर ठेवून, शिक्षा भोगावयास आलेल्या अपराध्याप्रमाणें तो **एडिथपुढें** उभा राहिला. तिनें काळा जाळी-दार बुरखा अंगावर घेतला होता व सुवासिक तेलानें जळणारा रुप्याचा दिवा तिच्या हातांत होता. त्याच्याजवळ जाऊन तिनें दिव्याचा झगझगीत प्रकाश त्याच्या चेहऱ्यावर पाडून तो बारकाईनें पाहिला व मग तो दिवा बाजूला ठेवून ती दुःखित मनानें पण शांतपणें उद्गारली, "तुम्ही स्कॉटलंडचे शूर **सर केनेथ** नव्हे का?" अचानकपणें ओळखला गेल्यामुळें तो उत्तर देण्याच्या बेतांत होता. पण, त्याला आपल्या वेषाची आठवण होऊन व **रिचर्ड** राजाला दिलेलें वचन स्मरून त्यानें दीर्घ श्वासानें तिला मूक उत्तर दिलें. **एडिथ** म्हणाली, **सेंट जॉर्ज मौंट**वर तूं व तुझा कुत्रा आल्याबरोबर मीं तुला ओळखलें. पोशाख व रंग पालटण्यानें आपली सेवा करणाऱ्या सरदाराला न ओळखणारी स्त्री खरी कुलस्त्री नव्हे. तेव्हां न भितां व न लाजतां माझ्याशीं खुशाल बोला." आपली भूमिका बरोबर वठविण्याकरितां त्यानें आपल्या ओठांवर आपलें बोट ठेवलें; **सॅलॅडिन**चें पत्र तिच्यापुढें टाकलें व उत्तराबद्दल खुणेनें मागणी केली. **एडिथनें** पत्र वाचून तें पाया-खालीं तुडवून म्हटलें, "**सॅलॅडिनला** माझा निरोप कळवा कीं **एडिथ प्लँटॅजेनेट सॅलॅडिन**ची मागणी तिरस्कारते." असें बोलून ती जाण्यास निघाली तोंच **नेव्हिल** त्याला घेऊन जाण्यास आला व त्यानें गुलामास **रिचर्डपुढें** उभें केलें.

दुसरे दिवशीं **रिचर्ड**च्या पूर्ण परिचयाचा व विश्वासाचा **अबदल्ला एल् हड्जी** वकील **सॅलॅडिन**कडून आल्याची वर्दी आली. तो आल्यावर म्हणाला, "कौन्सिलनें **कॉनरॅड**च्या अपराधाची शाबिती द्वंद्वयुद्धानें करण्याचें ठरविलें; व **सॅलॅडिननें** न्यायाधीश व द्वंद्वाचा व्यवस्थापक व्हावें अशी त्याला विनंति केली. तदनुरूप **सॅलॅडिन** तयार असून त्यानें खालील व्यवस्था सुचविली आहे. **वाळवंटांतला हिरा** हें स्थळ द्वंद्वाला ठरविलें आहे. तेथें ठरलेल्या दिवशीं ऑस्ट्रियाचा **आर्चड्यूक** व **टेंप्लर्स** मठाचा मुख्य या सोबत्यां-सह व शंभर सशस्त्र अनुयायांसह **मॉंट सेरॅट**च्या **कॉनरॅडनें** प्रतिवादी म्हणून

हजर राहावें; इंग्लंडचा राजा **रिचर्ड** व त्याचा भाऊ **सॅल्सबरी** यांनीं शभर अनुयायांसह वादी म्हणून हजर राहावें; आणि **सॅलॅडिननें** आपल्या पाचशें निवडक अनुयायासह न्यायाधीशाचें काम करावें. ज्या सद्गृस्थाना हें द्वंद्वयुद्ध पाहण्याची इच्छा असेल त्यांनीं फक्त आपली तलवार घेऊन व चिलखतावाचून हजर राहावे. **सॅलॅडिननें** जमलेल्या सर्व मंडळींची खाण्याची व्यवस्था करण्याचें अंगावर घ्यावें. द्वंद्वाचें काम संपल्यावर कायमच्या तहाबद्दल कौन्सिलनें सुचविलेल्या अटींवर **सुलतान** तह करण्यास तयार आहे." त्याप्रमाणें वागण्याचें कबूल करून **रिचर्डनें** त्या वकिलास निरोप दिला.

ठरलेल्या दिवसाच्या आदल्या दिवसाच्या पहाटेस **कॉनरॅड** व **रिचर्ड** आपल्या लवाजम्यासकट निरनिराळया मार्गांनीं **डायमंड ऑफ डेझर्ट**कडे जाण्यास निघाले. **रिचर्ड** आपल्या राणीच्या डोलीबरोबर चालत होता.

सायंकाळीं ती मंडळी एका टेकडीजवळ आली. त्यांना पाहून एक मुसलमान घोडेस्वार मंडळी येत असल्याची वर्दी **सॅलॅडिन**ला देण्यास गेला. जें स्थान निर्जन व बहुतेक निर्वन होतें तें हजारों तंबूंनीं व निशाणानीं व घोडेस्वारांनीं फुलून गेलें. **रिचर्ड** येतांक्षणींं घोडेस्वारांनी लष्करी वाद्यें वाजविण्यास सुरुवात केली व ते भाले आकाशात फेकू लागले. मंडळी किंचित् घाबरली. पण एक भाला हातीं घेऊन **एडिथ** राजाला म्हणाली, "घाबरण्याचे कारण नाहीं. या भाल्याला लोखंडी पातें नाहीं. अर्थात् ही भालाफेक आपल्या स्वागतार्थ आहे." तिच्या सूक्ष्म अवलोकनाबद्दल तिला शाबासकी देऊन **रिचर्डनें** सर्वांस ती गोष्ट सांगितली. नतर त्याना **सुलतानाच्या** तैनातीतील घोडेस्वारी गुलामांची टोळी भेटली. त्यानी रस्त्याचे बाजूला रागेनें उभें राहून **रिचर्डच्या** परिवारास मधून जाऊं दिलें. इतक्यांत पांढरा शुभ्र व साधा पोशाख केलेला, पांढऱ्या घोड्यावर स्वार झालेला, पागोट्यांत '**प्रकाशाचा समुद्र**' नांवाच्या हिऱ्याचा तुरा खोविलेला, बोटांत रत्नाची अंगठी घातलेला व अंगावर जाळीदार शेला घेतलेला पुरुष **रिचर्डला** दिसला. तो **सुलतान** आहे असें **रिचर्डनें** ओळखले. **सुलतानानें** **रिचर्डचें** स्वागत करून परिवारासह त्यांना त्यांच्या तंबूंत नेलें.

तेथे गेल्यावर व बसल्यावर **सॅलॅडिन** म्हणाला, "या तुमच्या जड तलवारीनें तुम्ही घाव कसा घालतां हे मला दाखवा." **रिचर्डने** हुजऱ्याच्या हातांतील दीड इंच व्यासाचा पोलादी दंड ( steel mace ) घेऊन तो

एका लाकडाच्या ओंड्यावर ठेवला. आपली चकाकणारी तलवार दोन्ही हातांनीं घट्ट धरून व आपल्या डोक्याभोंवतीं फिरवून जोरानें पोलादी दंडावर मारून त्यानें त्याचे दोन तुकडे केले; तेव्हां **सॅलॅडिन** आश्चर्यचकित झाला. मग, आपलें हस्तकौशल्य दाखविण्याकरितां त्यानें आपला बुरखा दूर करून बैठकीवरील रेशमी लोकरी उशी उभी ठेवून तलवार म्यानांतून बाहेर काढली व अगदीं हलक्या हातानें उशीच्या मध्यावर वार करून तिचे दोन तुकडे केले. **रिचर्डनें** त्याच्या हस्तकौल्याबद्दल त्याची वाखाणणी केली व तो म्हणाला, "तुम्ही जखमा करण्यांत जितके कुशल आहांत तितकाच तुमचा हकीम त्या बऱ्या करण्यांत कुशल आहे. तो हकीम येथें आला नाहीं काय?" **सॅलॅडिननें** आपलें पागोटें काढून **टार्टार** टोपी डोक्यावर ठेविली; त्याबरोबर **सॅलॅडिन** हकीम होऊन आला होता हें **रिचर्डला** कळलें. **सॅलॅडिन** म्हणाला, "वेषांतरांत तुम्हीं मला ओळखलें नाहीं. मग, **सर केनेथला** बदललेल्या वेषांत तुम्हीं कसें ओळखलें?" **रिचर्ड** म्हणाला, "त्याची जखम ओळखतांना कातडी पांढरी आहे हें मला कळलें. मग त्याच्या आकृतिविशेषावरून मी त्याला सहज ओळखूं शकलों. तो उद्यां निःशंकपणें लढेल अशी मी आशा करतों." **सॅलॅडिन** म्हणाला, "उमदा घोडा व उत्तम तलवार मीं त्याला दिली आहे. त्याला यशाची फार उमेद आहे."

दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर एका तासानें द्वंद्वयुद्ध व्हावयाचें होतें. त्याचे आधींच सर्व मंडळी द्वंद्वाच्या आवारासभोंवार ठोकलेल्या तंबूंत येऊन बसली. वेळ होतांच **कॉनरॅड** व **सर केनेथ** आपापल्या घोड्यावर स्वार होऊन द्वंद्वभूमीभोंवतीं त्यांनीं तीन फेऱ्या केल्या व प्रेक्षकांचें लक्ष आपल्याकडे वेधलें. **सर केनेथचा** चेहरा मर्दानी आत्मविश्वासानें फुलला होता; तर **कॉनरॅडच्या** चेहऱ्यावर अनिष्टसूचक खिन्नता दिसत होती.

तात्पुरत्या केलेल्या स्थंडिलापुढें घोड्यावरून उतरून त्या दोघांनीं आपापल्या बाजूच्या सत्यतेबद्दल शपथ घेतली. मग ते दोघे समोरासमोर उभे राहिले. **सॅलॅडिननें** सुरवातीची इशारत देतांच दोघे सरदार एकमेकांवर तुटून पडले. एका क्षणांत द्वंद्वाचा निकाल लागला. कारण, **सर केनेथनें** भाला इतक्या वेगानें व इतक्या जोरानें **कॉनरॅडवर** फेकला कीं, त्या धक्क्यानें तो घोड्याखालीं येऊन भाला जखमेंत खोल रुतून राहिला. त्या जखमी **कॉनरॅडकडे** **सॅलॅडिन** व योद्ध्याचे हमीदार (spensers) धावले. **सर**

**केनेथनें कॉनरॅडला** आपला अपराध कबूल करण्यास सांगितलें. तो म्हणाला, " परमेश्वराने निकाल दिला आहे. मी अपराधी आहे."

**लिओपोल्ड**च्या इच्छेनुरूप **कॉनरॅडला** त्याच्या तंबूंत नेलें व **सॅलॅडिन** त्याला औषध देण्याकरितां निघून गेला.

**रिचर्डने सर केनेथला** राजस्त्रियाच्या तबूकडे नेलें व आपल्या राणीनें व कु. **एडिथनें** विजयी वीराचें अभिनंदन करून राणीस त्याच्या बुटाचे लोखंडी आवरण (spurs) काढण्यास व **एडिथला** त्याचें शिरस्त्राण काढण्यास सांगितलें. तदनुरूप दोघींनी त्याला मोकळा केला. नंतर राजानें त्यास विचारलें, " तो **इथिओपियन गुलाम** किंवा **अज्ञात धाडसी** दिसतो का? नाही; आतां त्याचे विविध वेष संपले. त्यानें तुमच्यापुढे आपल्या योग्यतेनें गुडघे टेकले; पण तो **डेव्हिड अर्ल ऑफ हंटिंग्डन**–स्कॉटलंडचा युवराज– म्हणून उठत आहे." सर्वांनीं आश्चर्याचे उद्गार काढले. **रिचर्ड** पुढे म्हणाला, " होय, स्कॉटलंडच्या राजानें आपल्या युवराजास धर्मयुद्धास पाठविण्याचे नाकारले. पण या शूर युवराजाला ते बरें न वाटून तो वेष पालटून **सर केनेथ** नांव घेऊन स्वयसेवक म्हणून आमच्या सैन्यात आला. त्याच्या हुजऱ्यानें देशी परत जाताना **डी व्हॉक्स**जवळ **सर केनेथ**चें खरें नांव सांगितलें. शिवाय, स्कॉटलंडच्या राजाकडूनही त्याबद्दल आम्हांला पत्र आले. द्वंद्वापूर्वी **एनगाडी**च्या संन्याशाजवळ त्यालाही खरें सांगावे लागलें."

इतक्यात तो संन्यासी तेथे आला व त्यानें आपली चूक कशी व का झाली तें सागितलें. तो म्हणाला, " **सॅलॅडिन** व **सर केनेथ** माझ्या गुहेत निजले त्या वेळीं **सॅलॅडिन** राजा आहे हे मला ठाऊक होते; पण **सर केनेथ**चे नातें व खरा दर्जा ठाऊक नव्हता. त्या रात्रीं ग्रहावरून मला कळलें कीं, **रिचर्ड**च्या शत्रूशीं **एडिथचा** विवाह होण्याचा योग आहे व तिचा पति ख्रिश्चन धर्माचा असणार. या ग्रहगणितावरून मी तसें **सॅलॅडिनला** सांगितलें व म्हणून त्यानें **एडिथला** मागणी घातली. **सर केनेथ**चें खरें नाव कळल्यावर माझी चूक माझ्या ध्यानात आली." असें म्हणून तो तात्काळ तेथून निघून गेला.

इकडे **सॅलॅडिन** मेजवानीची तयारी करून राजाची वाट पाहत बसला. सर्व मंडळी जमली असतांना खुजानें **सॅलॅडिन**च्या कानांत कांहीं तरी भयंकर गोष्ट सांगितली असावी. खुजाला शेजारच्या तंबूंत बसवून खूण करीन

तेव्हां येण्यास सांगून तो मंडळीकडे वळला. त्यानें **अर्ल ऑफ हंटिंग्डनचें** अभिनंदन करून बर्फयुक्त सरबत त्याला प्यायला दिलें. त्यानें तें घेऊन **सॅलॅडिनचे** आभार मानले. पानप्रिय **लिओपोल्डनें बर्फयुक्त सरबत** हे शब्द ऐकतांच ग्लास तोंडाला लावला व मग त्यानें दुसरा ग्लास **टेंप्लर्सच्या** मुख्यापुढें केला; तोंच **सॅलॅडिननें** खुजास पुढें येण्यास खूण केली. त्याला पाहतांच **टेंप्लर** गोंधळला. लगेच **सॅलॅडिननें** त्याचें डोकें आपल्या तलवारीनें कापलें; तें तंबूच्या टोकाशीं जाऊन पडलें. सर्वजण आश्चर्यचकित झाले व **राजद्रोह** असें ओरडले. **सॅलॅडिन** शांतपणें म्हणाला, " भिऊं नका. या टेंप्लरनें **रिचर्डचा** जीव घेण्याचा प्रयत्न केला; त्यानें आपल्या लोकांसह माझा व स्कॉटलंडच्या युवराजाचा पाठलाग केला व आम्हांला पळून आपला जीव बचावण्यास भाग पडलें. त्यानें धर्मवेड्या नांवाच्या **मॅरोनाईट क्रिश्चन** लोकांना माझ्यावर हल्ला करण्यास चिथावलें म्हणून मी माझे **अॅरब** येथें घेऊन आलों. हे जुने अपराध बाजूला सारले तरी त्यानें अर्ध्या तासापूर्वी केलेला खून मला सहन झाला नाहीं. म्हणून मीं त्याचा तात्काळ शिरच्छेद केला. मीं तो स्वतः कां केला व मेजवानीपूर्वी कां केला हें सांगतों. आमच्या **अॅरब** लोकांत पाहुणचार धर्माज्ञेप्रमाणें पाळतात. जर टेम्प्लर माझ्या पाहुणचारांतलें सरबत प्यायला असता तर मला त्याला जीवदान द्यावें लागलें असतें. त्यानें **कॉनरॅडला** ठार मारलें याची साक्ष हा खुजा देईल." तदनुरूप खुजानें सांगितलें. नंतर **टेम्प्लरचें** धड तंबूतून बाहेर नेण्यांत आलें.

मग सर्व मंडळी **सॅलॅडिनच्या** आग्रहाच्या विनंतीवरून मेजवानीस बसली. पण त्याचें मन त्या समारंभांतून पार उडालें. आपल्या मकाणावर गेल्यानंतर राजेरजवाडे युरोपला जाण्यास निघाले. **सॅलॅडिननें अबदुल्लाजवळ** कबूल केलेल्या तहाच्या अटी मान्य केल्या.

रिचर्ड आपल्या तळास आला. नंतर **अर्ल ऑफ हंटिंग्डनचा** व **एडिथचा** विवाह झाला. **सॅलॅडिननें** तो **मंत्रित ताईत** ( Talisman) विवाहदेणगी म्हणून त्या दांपत्याला दिला. त्या ताइतानें युरोपांत पुष्कळदां रोगनिवारण केलें; पण त्याचा गुण कमी कमी होत गेला.

---

# लघुकथा ४ थी

## इव्हॅनो

[ रिचर्डच्या कारकीर्दीच्या अखेरच्या प्रसंगावर ]

**मंत्रित ताईत** कथेच्या शेवटीं सांगितलें होतें कीं **सॅलॅडिन**शीं कायमचा तह करून **रिचर्ड** आपला परिवार व सैन्य यासह इंग्लंडला येण्यास निघाला. ऑस्ट्रिया देशांतून प्रवास करीत असताना त्या देशाच्या **आर्चड्यूक**नें **रिचर्ड**च्या हस्तें झालेल्या आपल्या अपमानाचा सूड घेण्याचा गुप्त बेत करून **रिचर्ड**ला बंदिवान् केलें. पण, **रिचर्ड** प्रतिबंधनातून आपली सुटका करून घेऊन वेषांतर व नामांतर करून इंग्लडला गुप्तपणें आला.

**रिचर्ड पॅलेस्टाईन**ला धर्मयुद्धार्थ गेल्यापासून त्याचा भाऊ **जॉन** अभिषिक्त राजा झाला नव्हता खरा; पण तो व्यवहारात वस्तुतः राजा ( de facto King ) बनला. त्यानें प्रथम प्रथम अरेरावी राज्यकारभार करून लोकांना नाखूष केलें. पण पुढें पुढे व विशेषतः **रिचर्ड** परत येत असल्याच्या बातम्या त्याच्या कानावर येऊं लागल्यापासून, **जॉननें** संपत्ति, पदवी, शेतवाडी व अधिकाराची जागा या रूपानी लाच देऊन पुष्कळ सरदारांना आपल्या पक्षात आणले. बाकी लोकांमध्यें लोकप्रियता मिळविण्याकरितां त्या काळीं सर्वतोमुखीं झालेले **मर्दानी खेळ** (Tournaments) व त्यानंतरच्या मेजवान्या वारंवार व पुष्कळ खर्च करून तो करीत असे.

त्याप्रमाणें जॉननें **लीस्टर** ' परगण्यातील **ॲशबी** गांवीं एक मर्दानी खेळ करण्याचा बेत केला. त्याला **जॉन** स्वतः हजर राहून यशस्वी उमेदवारांना बक्षिसें देणार होता व मर्दानी खेळाच्या राज्ञीला ( Queen of the Tournament ) स्वतः मुकुट अर्पण करणार होता. यामुळें हजारों गरीब श्रीमंत लोक तेथें जमूं लागले होते.

खेळाच्या ठरलेल्या दिवसापूर्वीच्या दोन दिवसाच्या सायंकाळीं इंग्लंडांतील **शेफील्ड** व **डॉकॅस्टर** या दोन शहरांमधील अरण्यमय भागातील **सेड्रिक दि सॅक्सन**च्या **रॉदरवूड** या विस्तीर्ण शेतवाडीच्या एका खुल्या व

गवताळ माळावर **सेड्रिक**चे दोन नोकर बोलत बसले होते. यांपैकीं वयानें मोठा माणूस रानटी व काटक होता. त्यानें कातड्याचें जाकीट अंगांत घातलें होतें. त्याच्या गळ्याभोंवतीं पितळेचा पट्टा कायमचा अडकविलेला होता व त्यावर खालील मजकुराचा लेख खोदला होता. "**बोवूल्फ**चा मुलगा **गर्थ रॉदरवूड**च्या **सेड्रिक**चा **आजन्म गुलाम**." हा मेंढपाळ असून मालकाच्या मेंढ्यांचा मोठा कळप चरतांना राखण करीत होता.

त्याचे शेजारीं त्याचेपेक्षां सुमारें दहा वर्षांनीं लहान असा दुसरा माणूस बसला होता. त्याचा पोशाख **गर्थच्या** सारखाच पण जरा व्यवस्थित व चित्रविचित्र तऱ्हेचा होता. त्याच्या गळ्याभोंवतीं पितळेचा पट्टा असून त्याच्यावर खालील लेख खोदलेला होता; "**वुइटलेस**चा मुलगा **वांबा सेड्रिक**चा गुलाम." त्याच्या डोक्यावर घुंगुरांची टोपी होती. तो **सेड्रिक**चा **मस्कऱ्या** होता.

ते आपआपसांत नार्मन सरदार **सॅक्सन** प्रजेला कसे पिळून काढतात यांबद्दल बोलत होते. **गर्थ** म्हणाला, "तूं म्हणतोस तें अगदीं खरें आहे. नार्मन लोकांनीं हवेखेरीज आम्हांला कांहीं एक ठेविलें नाहीं. आमच्या मेंढ्या नार्मनांच्या भोजनास जातात; आमच्या तरुणांना शिपाई बनवून त्यांना दूरदूरच्या देशीं पाठविण्यांत येतें व तेथेंच ते मरून त्यांच्या हाडांनीं ते देश पांढुरके होतात. यांमुळें दुर्दैवी सॅक्सनांचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य किंवा इच्छा असलेलें कोणीहि स्वदेशीं उरत नाहीं. देवदयेनें आपले मालक **सेड्रिक** यांनीं ही उणीव आजपर्यंत भरून काढली. परंतु, **रेजिनॉल्ड फ्रॉंट डी बुफ** स्वतः लवकरच येथें येत आहेत. मग त्यांचेविरुद्ध आपले यजमान कितपत टिकाव धरतात हें कळून येईल."

इतक्यांत त्यांना घोड्यांच्या टापा ऐकूं आल्या. **गर्थ** म्हणाला, "वादळ होऊन पाऊस पडण्याचा रंग दिसत आहे. तरी आपला कळप घेऊन लवकर जाऊं या." **वांबा** म्हणाला, "हे घोडेस्वार कोण आहेत तें तर आधीं पाहूं या."

ती दहा घोडेस्वारांची टोळी होती. त्यांपैकीं पुढें दौडणारे तिचे मुख्य असून त्यांच्या पौर्वात्य पोशाखाच्या पद्धतीवरून व त्यांच्या काळवंडलेल्या चेहऱ्यांवरून ते नुकतेच **सीरिया**च्या वाळवंटी उष्ण प्रदेशाहून आलेले असावे

असें दिसत होतें. त्यांपैकीं एक वरच्या दर्जाचा धर्मोपदेशक होता. त्याचा पोशाख संन्याशासारखा होता. तो एका खेचरावर स्वार झाला होता. त्याच्या जिनाला रुपेरी घंटा लोंबत होत्या. त्याच्या चालीवरून त्याला घोडेस्वारीची कला चांगली अवगत असावी असें दिसत होतें.

त्याचा साथीदार सुमारें चाळीस वर्षांचा असून सडपातळ, बलवान, उंच व पीळदार अंगाचा होता. त्यानें निळया रंगाची टोपी डोकींत घातली होती. त्याच्या चेहऱ्यावरून तो पाहणाराच्या मनांत दरारा बसविणारा दिसला. यानेंही लांब संन्याशी झगा अंगांत घातला होता. **पॅलेस्टाइन**मध्यें बऱ्याच काळ वास केल्यामुळें त्याचा चेहरा काळसर झाला होता. त्याच्या कमरपट्ट्यात लांब दुधारी तरवार होती. तो सामानाच्या घोड्यावर (Hackney Horse) बसला होता. त्याचा लढाऊ घोडा (War Horse) हुजऱ्या घेऊन चालला होता.

या दोघांपैकीं एक **जोरव्हॉ ॲबेचा प्रायर आमेर** ( **जोरव्हॉ** मठाचा **आमेर** नांवाचा मठाधिपति ) आहे हें **वांबानें** तत्काळ ओळखलें. दुसरा घोडेस्वार **टेंप्लर** धर्मसंघाचा मुख्य **सर ब्रायन डी बॉइस गिल्बर्ट** नावाचा सरदार होता. **वांबा** त्याच्याजवळ आल्यावर **प्रायर आमेरने वांबास** विचारलें, " आसपास कोणी सद्गृहस्थ आहे काय, कीं जो परमेश्वर व क्रिस्तीधर्म यांना स्मरून आमच्या हुजऱ्यासह आम्हां यात्रेकरूंना रात्रभर राहण्या-जेवण्यास घालील ? " **वांबा** उत्तरला, " जर तुम्हांला सुग्रास भोजन व मऊ बिछाने पाहिजे असले तर तुम्ही **ब्रिंग्सवर्थ** मठाला जा. तो येथून थोड्या मैलावर आहे." **प्रायर आमेर** म्हणाला, " आम्ही धर्मोपाध्याय आमच्या मठांवर आमचा भार घालूं इच्छीत नाहीं. तेव्हां, तूं आम्हाला **सेड्रिक सॅक्सन** सरदाराच्या घराची वाट कोणती तें सांग." **वांबा** आपल्याशीं पुटपुटला, " हक्कानें आदरातिथ्य लुबाडणाऱ्या या नार्मनांना मी माझ्या मालकाच्या घराचा मार्ग चांगलाच दाखवितो ! " व मग उघडपणे म्हणाला, " या वाटेनें गेल्यावर तुम्हांला जमिनींत पुरलेला, पण दीडफूट वर असलेला **क्रॉस** लागेल. तेथून चार दिशेला चार रस्ते जातात; त्यापैकीं डाव्या हातच्या रस्त्यानें जा म्हणजे इष्टस्थळीं पोंहोचाल."

त्या क्रॉसपाशीं ते पोंहोचले; पण पुढें डाव्या का उजव्या रस्त्यानें जावयाचें याबद्दल दोघांमध्यें वाद उपस्थित झाला. हुजरे जवळ नसल्यामुळें त्यांनाही कांहीं एक सांगतां येईना. पण इतक्यांत **क्रॉस**जवळ पडलेला एक माणूस

**सर ब्रायन**ला दिसला. त्याला विचारतां तो म्हणाला, " मलाहि तेथेंच जावयाचें आहे. तेव्हां तुम्ही मला एक घोडा द्याल तर मी तुमचा वाटाड्या होऊन तुम्हांला इष्टस्थळीं नेईन."

तेव्हां, त्यानें आपल्या लढाऊ घोड्यावर बसण्यास एका हुजऱ्यास सांगून त्याचा घोडा या प्रवाशास देवविला. मग ती सर्व टोळी दाट रानांतून व दऱ्याखोऱ्यांतून चालल्यावर एका वृक्षराजीनें शोभायमान झालेल्या खुल्या व सपाट रस्त्यावर आली. वाटाड्या म्हणाला, " दूरवर दिसत आहे तो **सेड्रिक सॅक्सन सरदाराचा रॉद्‌रवूड** नांवाचा वाडा." **प्रायर आमेरनें** धीर येऊन वाटाड्यास त्याचें नांवगाव विचारलें. तो उत्तरला, " पवित्र भूमीहून आतांच आलेला मी एक यात्रेकरू आहे." **प्रायरनें** पुन्हा विचारलें, " बराच काळ परदेशीं काढला असतांना या ठिकाणचे रस्ते तुला इतके चांगले कसे ठाऊक आहेत ! "

यात्रेकरू उत्तरला, " माझा जन्म या भागांत झाला होता."

इतक्यांत ते **सेड्रिक**च्या वाड्याशीं आले. त्याला सभोंवार खंदक असून त्यांत नजीकच्या नाल्यांतून पाणी आणून तो पाण्यानें भरला होता; खंदकाच्या दोन्ही बाजूंस मोठमोठ्या वृक्षांचे ओंडे रांगेनें व एकाला एक लागून पुरले होते; पश्चिम दिशेला द्वार असून तेथें खंदकावर अरुंद पूल ( Draw Bridge ) होता. येथें येण्याबरोबर **सर ब्रायन**नें आपलें शिंग जोरानें फुंकलें. कारण, आतां पाऊस जोरानें पडूं लागला होता.

वाड्याच्या फार उंच व बेताच्या लांबरुंद दिवाणखान्यांत **सेड्रिक** सायंकाळच्या भोजनास बसण्याच्या तयारींत होता. शिंगाचा कर्कश आवाज ऐकून त्यानें हुजऱ्यास चौकशी करण्यास पुलाशीं धाडलें. तो परत येऊन म्हणाला. **जरव्हॉक्स** मठाचा **प्रायर आमेर** आणि **टेंप्लर्स**च्या संन्यासीसंघाचा सेनापति **सर ब्रायन डी बॉइस गिलबर्ट** आपल्या परिवारासकट **अॅशबीच्या मर्दानी** खेळांच्या सामन्याकरितां जात असून, आजच्या रात्रीं राहण्याजेवणाची सर्वांची व्यवस्था करण्याची विनंति करीत आहेत." **सेड्रिकनें** त्यांना घेऊन येण्यास सांगितल्याप्रमाणें नोकरानें त्यांना दिवाणखान्यांत आणिलें. **सेड्रिकनें** त्यांचें स्वागत करून त्यांना आपल्याजवळच्या बैठकीवर बसण्यास सांगितलें. इतक्यांत **लेडी रोवेना**—**सेड्रिक**च्या दूरच्या नातेवाईक सरदाराची पोरकी कुमारिका—**भोजनास** येत असल्याची वर्दी

आली. लगेच उंच अगयष्टीची, गौरवर्ण रंगकांतीची, निळसर डोळ्याची, सोनेरी कुरळया केसांची, दृष्टीस पडताच पाहणाऱ्याच्या मनावर छाप पाडणारी सुंदर कुमारिका दिवाणखान्यांत आली. तिच्या आकर्षक आकृतिविशेषांकडे पाहून ते दोघे पाहुणे आश्चर्यचकित झाले. ती आपल्यासाठीं राखून ठेवलेल्या उच्चासनाशीं आल्याबरोबर सर्व मंडळी उभी राहिली. सर्वांना मूकपणें पण हंसतमुखाने प्रणाम करून ती त्या उच्चासनावर बसली. लगेच भोजनास सुरुवात झाली. **रोवेना**नें पाहुण्यांस **पॅलेस्टाइन**बद्दल बातमी विचारली.

**सर ब्रायन** उत्तरला, " **सॅलॅडिन**शीं कायमचा तह होऊं घातला होता, आतांपर्यंत बहुधा तह झालाच असेल."

इतक्यांत एक परका माणूस आत येऊं इच्छितो अशी वर्दी आली. **सेड्रिक** उद्गारला, " अशा वाऱ्यापावसाच्या हवेंत माझा वाडा सर्वांना खुला असला पाहिजे. त्याची जेवणाराहण्याची सोय करा." आलेला माणूस ज्यू जातीचा आहे असें पाहून त्याला कोणीही आपल्याजवळ घेईना. तो मेजाच्या शेवटपर्यंत गेला. चुलाण्याच्या शेजारीं शेकत व खात बसलेल्या यात्रेकरूला त्या ज्यूची दया आली. तो म्हणाला, " वृद्ध माणसा, माझे कपडे वाळले आहेत; माझी भूक भागली आहे. पण, तूं ओला व भुकेलेला आहेस " असें बोलून त्यानें आपल्या जागेवरून उठून खाण्याचे पदार्थ आणून छोटया मेजावर ठेवले व त्या वृद्धास शेकत खाण्यास सांगून तो बाजूस उभा राहिला.

इकडे जेवण संपल्यावर **सेड्रिक**ने दारूचा पेला हातीं धरून **अभीष्ट-प्राशन** ( Toast ) करण्यास सर्वांस विनंति करतांना म्हटलें, " **क्रॉस**च्या संरक्षकांत ज्यानीं तलवार गाजविली त्यांच्या नांवानें दारू पिऊं या." **सर गिलबर्ट** उत्तरला, " **टेंप्लर्स**सारख्या **क्रॉस**च्या वचनबद्ध योद्धयांचा दुसरा कोण हात धरणार ? लेडी **रोवेना** म्हणाली, " **टेंपल** व **सेंट जॉन** या मठाच्या सरदारांखेरीज इंग्रज सैन्यांतील सरदारांची सांगण्यासारखी कामगिरी नाहीं काय ? " **सर गिलबर्ट** उत्तरला, " **रिचर्ड**ने इंग्रज सरदार बरोबर आणले होते; पण त्यांचा पराक्रम दुय्यम दर्जाचा होता." बाजूला असलेला यात्रेकरू आवेशानें पुढें येऊन उत्तरला, " मला पक्के ठाऊक आहे कीं, **रिचर्ड** व त्याच्याबरोबरीचे पांच सरदार यांनी मैदानी खेळांत एकेकानें

तीन तीन विरोधी योद्धयांस चीत केलें; त्यामध्यें सात सरदार **टेंपुर** मठाचे होते. ही गोष्ट खुद्द **सर गिलबर्टला** माहीत आहे." **सेड्रिकनें** उत्सुकतेनें यात्रेकरूंस त्यांचीं नांवें विचारलीं. यात्रेकरूंनीं **रिचर्ड, अर्ल ऑफ लीस्टर,** गिल्सलॅंडचा **सर टॉमस मुल्टन, सर फाऊल डॉली** आणि **सर एड्विन टर्नहॅम** अशीं पांच नांवें सांगितलीं. "सहावा कोण?" असें **सेड्रिकनें** विचारलें. यात्रेकरू तें नांव सांगण्यास कांकूं करूं लागला. तेव्हां **सर गिलबर्ट** म्हणाला, "तो सांगत नाहीं तर मी सांगतों. त्याचें नांव **इव्हॅनो** आहे. पण, पांची सरदारांपेक्षां तो जास्त पटाईत आहे. त्यानें मलासुद्धां एकदां पराभूत केलें. म्हणून तो जर **ॲशबीच्या** खेळांस आला तर मी त्याला युद्धाचें आव्हान देईन; मी जर पुन्हा हरलों तर माझी (गळयांतून काढून) ही सोन्याची साखळी मी हरवीन." यात्रेकरूनें आपल्या हृदयाशीं बांधलेली हस्तीदंती छोटी पेटी बाहेर काढून म्हटलें "ही **मौंट कार्मेल** मठांत मिळविलेली व खऱ्या **क्रॉसचा** तुकडा आंत असलेली दुर्मिळ पेटी मी हरवीन."

**प्रायर आमेरनें** दोन्ही वस्तू घेऊन म्हटलें, "या भावी खेळांतील युद्धांचा निकाल होईतोंपर्यंत मी या वस्तू माझ्यापाशीं ठेवतों. "**सर गिल्बर्ट** म्हणाला, "मला कबूल आहे. पण **नाइट ऑफ इव्हॅनोनें** जर माझें युद्ध-निमंत्रण नाकारलें तर मी तो भित्रा आहे म्हणून सर्वांना सांगेन." **लेडी रोवेना** मध्येंच म्हणाली, "येथें नसलेल्या **इव्हॅनोतर्फे** मी सांगतें कीं, तो जर हजर राहूं शकला तर तो युद्धनिमंत्रण स्वीकारील याबद्दल शंका नको."

**इव्हॅनो** हा **सेड्रिकचा** एकुलता एक मुलगा असून तो बापाच्या इच्छे-विरुद्ध धर्मयुद्धांत सामील झाला असल्यामुळें बापानें मुलाचें नांव टाकलें होतें. अर्थात् या संभाषणानें त्याच्या मनांत मिश्र मनोभावना उद्‌भूत होऊन तो म्हणाला, "**लेडी रोवेना,** जरी मला राग आलेला आहे, तरी **इव्हॅनोचे** यशाबद्दल मीहि जामीन राहिलों असतों." मंडळींचे मनोविकार जागृत करणारें संभाषण संपविण्याकरितां **प्रायर आमेर** म्हणाला "आम्ही दमलेले आहों. तरी आम्हांला आमच्या निवासखोल्यांत जाऊं द्या." सर्वांना ही सूचना पसंत पडून सर्व पाहुणेमंडळींना निरनिराळया खोल्यांत धाडण्यांत आलें. मग **सेड्रिक** व **लेडी रोवेना** आपआपल्या निद्रास्थानीं गेलीं.

**गर्थ वांबा** व इतर हुजरे मंडळी यांच्या खोल्यानजीकच्या खोल्या, ज्यू (त्याचें नांव **ऐझॅक** होतें) व यात्रेकरू यांना देण्यात आल्या. यात्रेकरू आपला लष्करी पोशाख अंगावर ठेवून कसाबसा सकाळपर्यंत झोपला. मग, तो हळूच **ऐझॅक** ज्यूच्या खोलींत आला व त्याला उठवून म्हणाला, "तुम्ही जर तात्काळ येथून निघून जलदीनें हे स्थळ सोडणार नाही, तर वाड्याबाहेर पडून अरण्यात शिरल्याबरोबर तुम्हाला धरून **सर गिलबर्ट** किंवा **फिलिप डी मॅलव्होसिन** यांच्या किल्लयात बंदीत टाकून तुमच्याकडून पैसा उकळला जाईल. मलाही येथून लवकर जावयाचें आहे, तरी मी तुम्हांला सुरक्षितपणें घेऊन जातों. तुम्ही तुमच्या खेचरावर बसा, मीही येथलें एक खेचर घेतो. तरी त्वरा करा." हें ऐकून **ऐझॅक** त्याचेबरोबर जाण्यास तयार झाला. यात्रेकरूनें **गर्थ**ला हलविलें व त्याच्या कानात कांहीं तरी सांगितलें. तसा तो तत्काळ उठला व त्यानें पुलाच्या बाहेर खेचरें आणून उभीं केली. लगेच त्यावर बसून ते फार जलदीनें दौडत अरण्याबाहेर आले. तेव्हा यात्रेकरू म्हणाला, "आता आपण दोन्ही सरदारांच्या आटोक्याबाहेर आलों आहों. तरी आता तुम्ही आपल्या वाटेनें जा. मी खेचर **सेड्रिक**च्या भेटणाऱ्या नोकराचे स्वाधीन करून पुढे पायी जाईन." **ऐझॅक**नें मोठ्या काकुळतीनें यात्रेकरूला म्हटलें, "तुम्हीं मला येथपर्यंत सुखरूप आणलें याबद्दल मी तुमचा अत्यंत आभारी आहे. पण मला **शेफील्ड**पर्यंत पोंहोचवा; म्हणजे मी तुम्ही मागाल ते बक्षीस देईन. मी तुमच्या वर्तनावरून ताडलें आहे कीं, तुम्हांला मैदानी खेळांत भाग घेता येण्याकरिता उत्तम घोडा, त्याचा सरंजाम व शस्त्रास्त्रें याची फार जरूरी आहे. मी गरीब आहे, तरी तुमची गरज भागवून तुमच्या उपकाराची अंशतः फेड करीन." हे ऐकून यात्रेकरूला समाधान वाटलें. मग, ते न बोलतां **शेफील्ड** शहराच्या नजीक आले. तेव्हा **ऐझॅक**नें खेचरावरून न उतरतां एक मळकट कागद काढून त्यावर हिब्रू भाषेत आपल्या **लीस्टर**च्या ज्यू मित्रास पत्र लिहून त्यावर त्याचा तेथला पत्ता लिहून ते पत्र यात्रेकरूच्या हातांत देऊन तो कृतज्ञतापूर्वक म्हणाला, "**लीस्टर** शहरात **किरजत जयराम** नांवाच्या श्रीमंत ज्यू सावकारास हें पत्र द्या म्हणजे तो तुम्हांला उत्तम सरंजामी घोडा, व मैदानी खेळाला लागणाऱ्या सर्व वस्तू देईल. खेळ संपल्यावर त्या किंवा त्यांची किमत तुम्ही सावकारास द्या. जा, तुमचा विजयें

होवो. पण तुम्ही आपला जीव धोक्यांत घालूं नका,” मग ते निरनिराळया रस्त्यांनीं आपआपल्या संकेतस्थळाकडे गेले.

**ॲशबी** गांवापासून एका मैलावर, मैलभर लांबरुंद हिरव्यागार गवतानें शोभायमान झालेलें खुलें मैदान होतें. त्याच्या एका बाजूस दाट अरण्य व दुसऱ्या बाजूस **ओक** झाडांची रांग होती. या मधल्या सपाट मैदानापैकीं दोन फर्लांग अथवा पाव मैल लांब व एक फर्लांग किंवा एकअष्टमांश मैल रुंद जागा मर्दानी खेळांकरितां पसंत करण्यांत आली होती. त्याचेसभोंवतीं लांकडी ओंड्यांचें कुंपण घातलें -होतें. त्याचे उत्तर व दक्षिण बाजूस एक एक दार असून त्यांतून विरोधी सरदार व त्यांचे साहाय्यकारी येण्याची व्यवस्था केलेली होती. बाकीच्या सर्व कुंपणाभोंवतीं प्रेक्षकांकरितां नाटकगृहासारखीं बसण्याचीं बाकें ठेविलीं होतीं. या कृत्रिम खेळाच्या रंगणाचे एका बाजूस उंच गॅलरी केली असून तेथें खेळाची राणी ( Queen of the Tournament ) व राजा व त्यांचे खास दासदासी उभे राहण्याची व्यवस्था केली होती. त्याच्याखालीं पायऱ्यांच्या रांगा असून त्यांवर सरदार मंडळी व त्यांच्या बायकामुलें बसण्याची व्यवस्था केली होती.

या खेळाला दूरदूरचीं लहानथोर, स्त्रीपुरुष, खेडवळ व नगरवासी आणि नामांकित लोक आदल्या दिवसापासून येऊन बसले होते व कांहीं येत होते. **सेड्रिक** व त्याचा नातेवाईक **ॲथेलस्टेन** आपल्या मंडळीसह गॅलरीच्या बऱ्याच वरच्या पायरीवर बसले होते.

**ऐझॅक ज्यू ॲशबी**ला आल्यावर आपल्या मित्राकडे राहत असलेल्या आपल्या **रेबेका** मुलीला भेटला. खेळाला जाण्याकरितां दोघांनीं उंची पोशाख केले. **रेबेकानें** रत्नांचे दागदागिने घालून पौर्वात्य तऱ्हेचा सुंदर पोशाख करून आपल्या बापाबरोबर ती आली. ऐझॅकच्या जातीची श्रीमंत मंडळी— ज्यांच्याकडून **जॉन** राजा बरेंच कर्ज घेऊं पाहत होता—**सेड्रिक**च्या रांगेला बसली होती. तिकडे **ऐझॅक रेबेका**चा हात धरून चालला होता. सर्व प्रेक्षकांचें लक्ष **रेबेकानें** आपल्याकडे ओढून घेतलें.

**रेबेकाचें** स्वरूप इंग्लंडांतील सुंदरतम स्त्रियांच्या स्वरूपाशीं स्पर्धा करील असें होतें. तिची शारीरिक अंगलट अत्यंत प्रमाणबद्ध होती व तिच्या पौर्वात्य पोशाखानें तर ती जास्त खुलून दिसत होती. तिच्या काळसर

रंगाला तिची पिवळी टोपी अनुरूप होती. तिचे पाणीदार डोळे, तिच्या कमानदार भुवया, तिचें बाकदार नाक, मोत्यांसारखे पाढरे शुभ्र दात आणि काळसर रंगाचे केस यामुळें तिचें स्वरूप तेथें जमलेल्या कुमारिकाच्यापेक्षां रतिभरही कमी नव्हतें, उलट केसभर जास्तच असेल.

इतक्यांत **जॉन** राजा तेथें येऊन त्याचें लक्ष **रेबेका**कडे गेलें. समोर बसलेल्या **सेड्रिक** व इतर सॅक्सन सरदाराना त्या ज्यू बापलेकींना जागा देण्यास त्यानें फर्मोविलें. पण ते ऐकेनातसे दिसले. त्यामुळे राजा जास्तच संतापला व त्यानें आपल्या शरीररक्षकास त्या माणसाना ढकलून जागा करण्यास हुकूम केला. या कृत्याने आपल्या धन्याचा अपमान होईल हें पाहून आपली लाकडी तरवार एका हातात व ढालीसारखा धरलेला मासाचा तुकडा दुसऱ्या हातांत घेऊन **वांबा सेड्रिक**ची मंडळी व राजाचा रक्षक यांचेमध्यें येऊन युद्धाच्या आवेशानें उभा राहिला. त्याच्या विचित्र पोशाखानें व विचित्रतर युद्धशस्त्रास्त्रांनीं राजास व इतर मडळींस एकच हसूं आलें. त्यानें राजाच्या राग कोठच्या कोठे गेला. इतक्यात सेड्रिकच्या पायरीच्या खालच्या पायरीत थोडीशी रिकामी जागा दिसतांच **ऐझॅक** व **रेबेका** त्या ठिकाणीं बसलीं. राजानें **ऐझॅक**ची पैशाची पिशवी हिसकावून घेतली व त्यांतील दोनचार सोन्याचीं नाणीं **वांबा**कडे फेकलीं.

आता खेळाच्या सुरवातीची वेळ झाली असें पाहून खेळाचे व्यवस्थापकांस शिंग फुंकण्यास सागून राजा आपल्या गॅलरींतील सिंहासनावर जाऊन बसला.

शिंग वाजल्याबरोबर रंगणाचे दरवाजे खाडकन उघडले गेले व चिठ्या टाकून निवडलेले पांच सरदार—एक सर्वांच्यापुढें व बाकीचे चार मागें. दोन रांगेंत—सावकाश रंगणामधून विरुद्ध बाजूने आलेल्या विरोधकांशीं भिडले; व प्रत्येक सरदारानें आपल्याशीं लढण्याकरितां भाल्याच्या उलट्या टोकानें विरुद्ध सरदाराच्या ढालीस स्पर्श केला. नंतर ते विरोधी सरदार आपआपल्या घोड्यांवर स्वार झाले.

रणशिंगें व तुताऱ्या यांच्या कानठळ्या बसविणाऱ्या आवाजानतर घोडेस्वार आपआपल्या विरोधक घोडेस्वारावर तुटून पडले. पहिल्याच हल्ल्यांत **बॉइस गिलबर्ट, मॅलव्होसिन** व **फ्रॉंट डी बुफ** या तीन वीरांनी आपल्या प्रतिस्पर्ध्यांस घोड्यांवरून खालीं पाडलें. चौथ्या जोडींतील एका स्वारानें तर रंगणांतून यःपलाय केलें. पांचव्या घोडेस्वारानें मात्र

आपल्या पक्षाचा मान राखला व **फ्रॉंट डी बुफ**शीं बरोबरीचें युद्ध केलें. मग दुसरी व तिसरी पंचकडी युद्धास आली व त्यांचाही पराभव झाला.

तेव्हां **सर ब्रायनच्या** पक्षाचा विजय झाला असें दिसलें. कारण, नंतर कोणी पुढें येण्यास धजला नाहीं. इतक्यांत तुतारीचा कर्कश आवाज ऐकूं आला, तोंच एक मध्यम उंचीचा व सडपातळ अंगलटीचा, काळ्या उमद्या घोड्यावर स्वार झालेला सरदार रंगणांत आला. त्यानें आकर्षक तऱ्हेनें आपला भाला खालीं करून राजाला व स्त्रियांना सलाम केला. त्याच्या घोडे-स्वारीच्या कौशल्यानें व एकंदर ऐटदारपणानें सर्वांचें लक्ष त्याच्याकडे वेधलें. त्यानें सर्व स्वारांना सोडून **सर ब्रायन**च्या ढालीस आपल्या भाल्याचें टोक लावलें. खेळांतल्या सर्वांत विजयी वीराला युद्धनिमंत्रण दिल्याचें पाहून सर्व सभागृह आश्चर्यचकित झालें; इतकेंच नाहीं तर **सर ब्रायनही** चकित झाला. त्यानें त्या अपरिचितास त्याचें नांव विचारलें. त्यानें उत्तर दिलें, " **डिसइनहेरिटेड नाईट ( बेवारशी सरदार ).**"

जॉन राजानें तुतारीची इशारत देववितांच रंगणाच्या टोकाला जाऊन भरधाव घोडे फेकीत वज्राघाताप्रमाणें दोघांही घोडेस्वारांनीं एकमेकांवर चाल केली. त्या धडाक्यानें दोघांचे घोडे दोन पायांवर उभे राहिले व दोघांच्या हातांतील भाले मोडले. म्हणून क्षणभर विसांव्यानंतर त्यांना नवे भाले देण्यांत आले. या वेळीं **सर ब्रायन**नें आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या ढालीच्या मधोमध नेम धरून त्याच्या भाल्याचे दोन तुकडे केले. पण, त्याच क्षणीं **बेवारशी सरदारानें** आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या शिरस्त्राणावर असा जोरानें व वेगानें भाला मारला, कीं भाल्याच्या धक्क्यानें शिरस्त्राण डोक्यांत अडकल्यामुळें घोडा व घोडेस्वार यांनीं एकदमच जमिनीवर लोटांगण घातलें व धुळीचा लोट आकाशांत उसळला व सर्व सभागृहानें **बेवारशी सरदाराच्या** विजयाबद्दल व **सर ब्रायनच्या** पराभवाबद्दल आनंदानें टाळ्या पिटल्या. पण, **सर ब्रायन** ताबडतोब उठून तलवार उपसून प्रतिस्पर्ध्याकडे धावला; त्यानेंही घोड्यावरून उतरून आपली तरवार उपसली. पण, खेळाचे व्यवस्थापक मध्यें पडून **सर ब्रायन**ला खेळाच्या नियमांप्रमाणें अशा तऱ्हेचें हातयुद्ध करतां येत नाहीं असें सांगितलें. तेव्हां ते आपआपल्या जागीं गेले.

घोड्यावरून न उतरतां **बेवारशी** सरदारानें दारूचा पेला मागितला व आपल्या शिरस्त्राणाचा खालचा भाग वर सारून व खऱ्या इंग्रजांचा विजय

होवो व परकीय छलकांचा पराभव होवो" असें ओरडून त्यानें पेला झोकला.

नंतर त्यानें आपल्या तुताऱ्यामार्फत पुढे येईल त्याशीं लढण्याची घोषणा केली. प्रथम **फ्रॉंट डी बुफ** पुढें आला. दोघांनींही परस्परांचे भाले तोडले; पण **फ्रॉंट डी बुफ**ची रिकीबही गमावली. म्हणून त्याचा पराजय झाला असें गृहीत धरण्यात आलें. बाकीच्या सरदारांना **बेवारशी** सरदारानें लीलेनें पराभूत केलें. **सभागृहां**तील मंडळींनीं विजयी वीराची टाळ्याच्या गजरानें वाहवा केली.

खेळांच्या व्यवस्थापकांनीं विजयी वीराचें अभिनंदन करून त्याला आपलें शिरस्त्राण काढून राजाच्या हस्ते बक्षिस घेण्यास चलण्याविषयीं विनंति केली. त्यानें सध्यां आपल्याला आपला चेहरा दाखविता येत नाहीं असें म्हटलें. व्यवस्थापकांनीं त्याला **जॉन** राजाकडे नेऊन तूर्त त्याची अज्ञात राहण्याची इच्छा आहे असें राजास कळविलें. हा अज्ञात राहूं इच्छिणारा सरदार कोण असावा याबद्दल **राजा** तर्कवितर्क करीत असतांनाच तो **राजा**च्या सिंहासनाच्या पायऱ्यांशीं न बोलतां उभा राहिला. बक्षिसाच्या घोड्याला दोन मोतद्दारांनीं धरला होता. राजानें त्यांना वीराला घोडा देण्यास सांगितल्याबरोबर त्यांनीं घोड्याचा लगाम त्याला दिला. रिकिबीवर पाय न ठेवता उडी मारून तो त्या घोड्यावर स्वार झाला. मग त्यानें रंगणात दोन फेऱ्या घातल्या व आपलें स्वारगिरीचें अलौकिक कसब सर्वांस दाखविलें. मध्यंतरीं **जॉरव्हाच्या प्रायर**नें **मर्दानी खेळा**च्या दुसऱ्या दिवशीच्या समारंभाकरिता व मेजवानीकरितां **सौंदर्याची व प्रेमाची राणी** निवडण्यास विजयी वीरास सांगावें अशी **जॉन राजाला** विनंति केली. तेव्हां, दुसऱ्या फेरीच्या वेळीं वीर राजासमोर येताच तो त्याला म्हणाला, "**बेवारशी सरदारा,** आता उद्याच्या समारंभाकरिता **मानाची** व **प्रेमाची** राणी निवडण्याचा तुमचा हक्क व कर्तव्यकर्म आहे. तरी आपला भाला वर करा." वीरानें तसें करतांच राजानें हिरव्या सॅटिननें व सोन्याच्या कड्यानें शृंगारलेला मुगुट भाल्याच्या टोकावर ठेवला. नंतर तो वीर सावकाशपणें व बारकाईनें स्त्रियाच्या समुदायाकडे पाहत पाहत पुष्कळ नार्मन स्त्रियांच्या समोरून जाऊन जेथें **लेडी रोवेना** बसली होती तेथें आला व लगेच त्यानें भाल्याच्या टोकावरील मुगुट तिच्या पायांशी ठेवला. त्याबरो-

वर **वार्ताहरांनीं लेडी रोवेना** दुसऱ्या दिवसाकरितां **प्रेमाची** व **सौंदर्याची राणी** निवडली आहे अशी घोषणा केली. त्याबरोबर "**लेडी रोवेनाला दीर्घायुष्य लाभो**" अशी आरोळी झाली. तिला सॅक्सन लोकांनीं "**आल्फ्रेड** राजाच्या वंशांतल्या **सॅक्सन राजकुमारी**ला दीर्घायुष्य लाभो" अशी पुस्ती जोडली. या आरोळ्या **जॉन** राजाला मनांतून आवडल्या नाहींत; तरी त्याला वीराच्या निवडीला संमति द्यावी लागली. घोड्यावर बसून **लेडी रोवेना**समोर येऊन त्यानें तिला प्रणाम केला व आपल्या वडिलासह व परिवारासह **ॲशबी** किल्ल्यांतील मेजवानीस येण्याची विनंति केली. **लेडी रोवेना**ऐवजीं **सेड्रिक**नें आभारपूर्वक नकार दिला. तेव्हां, विजयी वीराकडे वळून राजानें त्यालाही तसेंच निमंत्रण दिलें. तो म्हणाला, "मी आज फार दमलों आहे; शिवाय, उद्यांच्या युद्धाकरितां मला तयार राहिलें पाहिजे. तरी, निमंत्रण नाकारल्याबद्दल साहेबांनीं रागावूं नये."

नंतर, तो अज्ञात वीर आपल्या मकाणाला जाऊन, आपल्या हुजऱ्याला म्हणाला, "गर्थ, येथपर्यंत तर आपण इंग्रज सरदारांचें नांव राखलें." नंतर त्यानें **गर्थ**ला दहा सोन्याचीं नाणीं बक्षीस देऊन सोन्याची पिशवी घोड्याच्या व सरंजामाच्या मोबदल्यांत **ऐझॅक**ला देण्यास सांगितलें. **गर्थ** मनांत म्हणाला, "यांतल्या अर्ध्या नाण्यांवर मी त्या कंजूष ज्यूची समजूत घालीन." मग **बेवारशी सरदार** विसांवा घेत अंथरुणावर पडला.

दुसरे दिवशीं सूर्योदयापासून खेळ पाहण्याकरितां मंडळी जमूं लागली व दहा वाजतां तर सर्व पटांगण घोड्यांवर बसलेले स्त्री-पुरुष व पादचारी लोक यांनीं चिकार भरलें. मोठ्या तुताऱ्यांच्या आवाजांत **जॉन** राजा परिवारासह आला. त्याच वेळीं **सेड्रिक** व **लेडी रोवेना** हींहि आलीं. मात्र **ॲथलस्टेन** लष्करी पोशाखांत **सर ब्रायन**च्या बाजूनें लढण्यास आला. त्याबद्दल सर्वांना आश्चर्य वाटलें.

**जॉन** राजानें **लेडी रोवेना**ला पाहतांच तिला घोड्यावरून उतरण्यास मदत केली व तिला तिच्या सिंहासनावर नेऊन बसविलें. नंतर इतर स्त्रिया आपआपल्या जागीं बसल्या. **लेडी रोवेना** बसतांक्षणीं सर्व मंडळींनी आरोळ्यांनीं व टाळ्यांनीं तिचें अभिनंदन केलें.

इतक्यांत वेळ झाली म्हणून तुताऱ्या फुंकण्यांत आल्या व सर्व घोडेस्वार एकमेकांविरुद्ध लढूं लागले. त्या दंगलींत कोणत्या पक्षाची सरशी होत आहे

हे मुळींच कळले नाहीं. पण सर्वांचे डोळे **बेवारशी सरदार** व **बॉइस गिलबर्ट** या विरुद्ध पक्षांच्या योद्धयांकडे लागले. सरदाराच्या दगलींत त्या दोघांना एकमेकांशीं भिडतां आलें नाहीं. पण बरेच लढाऊ सरदार पराभूत होऊन रंगण खुलें होतांक्षणीं ते समोरासमोर उभे राहिले व ईर्षेनें लढूं लागले. दोघेही समसमान लढवय्ये असल्यामुळें दोघांनाही टाळया मिळत होत्या. पण, इतक्यांत **बेवारशी सरदारावर फ्रॉंट डी बुफ** व **ॲथेलस्टेन** यांनीं दोन्ही बाजूंनीं हल्ला केला. त्याला आतां त्रिवर्गांशीं एकट्यानें लढावें लागलें. पण आपल्या चपल हालचालीनें त्यानें तिघांपासून कांहीं वेळ स्वतःचें संरक्षण केलें. एकाविरुद्ध तिघे लढताना पाहून व्यवस्थापकानी द्वंद्व थाबल्याची निशाणी देण्याविषयीं राजास सुचविलें. पण **बिनवारशी सरदारास** दुसरा विजय मिळूं नये असें **जॉन**ला वाटत असल्यामुळे तो गप्प राहिला.

इतक्यांत **बिनवारशी** सरदाराच्या बाजूचा **आळशी काळा सरदार** या टोपणनांवाचा, काळया चिलखताच्या काळया घोड्यावर बसलेला, उंच चणीचा व पिळदार शरीराचा सरदार तीरासारखा **बेवारशी** सरदाराच्या मदतीस आला. त्याच्यावर वार करणाऱ्या **फ्रॉंट डी बुफ**च्या डोक्यावर **काळ्या सरदारानें** वज्राघाताप्रमाणें घाव घातला. त्यामुळें घोडा व घोडेस्वार यांनीं जमिनीवर सपशेल लोटांगण घातलें. लगेच **काळ्या सरदारानें ॲथेल-स्टेन**लाही चीत केलें. या दुहेरी यशाबद्दल मंडळींनी **काळ्या सरदारा**ची वाहवा केली. एकास एक योद्धे राहिले असें पाहतांच **काळा सरदार** रंगणाच्या बाहेर गेला. मग **बेवारशी सरदारानें सर ब्रायन**ला घोड्या-वरून खालीं पाडून त्याला शरण येण्यास सांगितलें. पण तसें होण्याचे आधींच **जॉन**ने युद्ध सपल्याची निशाणी दिली.

आतां **जॉन**वर विजयी वीराचें नांव जाहीर करण्याचें काम आलें. त्याने **काळ्या सरदाराचें** नांव पुकारलें. पण **बेवारशी सरदाराने** त्या दिवशीं सहा सरदारांना चीत करून विरुद्ध पक्षाच्या मुख्याला घोड्यावरून खालीं पाडलें असल्यानें तोच खरा विजयी वीर होता. पण **जॉन** आपला निर्णय बदलीना. अर्थात् **काळ्या सरदारा**ला बक्षिस घेण्यास बोलावण्यांत आलें. पण, तो केव्हांच अदृश्य झाला होता. म्हणून तें बक्षिस **बेवारशी सरदारानें** मिळविलें आहे असा निर्णय **जॉन**ला द्यावा लागला. तदनुरूप त्या विजयी वीराला राजापुढें आणण्यांत आलें. राजा म्हणाला, “ **बेवारशी**

**सरदारा,** आज दुसरें बक्षिस तूं मिळविलें आहेस; तरी आजच्या राणीच्या हस्तें बक्षिसाची पुष्पमाला घे." तदनुरूप त्याला **राणीच्या** समोर नेण्यांत आलें. **रोवेना** एक पाऊल पुढें येऊन त्याच्या डोक्यावर पुष्पमाला टाकण्यापूर्वी व्यवस्थापकांनीं त्याचें शिरस्त्राण काढून त्याचें डोकें उघडें केलें तोंच पंचवीस वर्षांचा, काळवंडलेला, भरदार शरीराचा, आखुड, पण विपुल केसांचा आणि तोंडावर,रक्ताचा शिडकाव झालेला पुरुष सर्वांच्या दृष्टीस पडला. **रोवेनानें** पुष्पमाला त्याच्या डोक्यावर ठेविली. त्यानें आपलें डोकें खालीं करून **राणीच्या** हाताचें चुंबन घेतलें व लगेच तो तिच्या पायांशीं सपशेल पडला. तो तरुण आपला परांगदा मुलगा **इव्हॅनो** आहे असें **सेड्रिकनें** ओळखलें. इतक्यांत **इव्हॅनोची** जखम व्यवस्थापकांच्या नजरेस पडली; म्हणून त्याला बाजूला नेण्यांत आलें.

विजयी वीर **इव्हॅनो** आहे असें कळतांच **जॉनला** व त्याच्या पक्षांतील सरदारांना अचंबा व भयही वाटलें. इतक्यांत **जॉनच्या** हातांत एक चिठ्ठी देण्यांत आली. ती त्यानें घाबरत वाचली. त्यांत सांकेतिक भाषेंत खालील वाक्य होतें, "आपल्या जिवाची काळजी घ्या, कारण, सैतान बंधमुक्त झाला आहे." हें वाक्य वाचतां क्षणीं **जॉन** प्रेतवत् पांढरा पडला. परंतु धीर धरून त्यानें **वाल्डिमार फिट्झर्स** व **डी ब्रासे** या आपल्या खास मंत्र्यांस बाजूला नेऊन ती चिठ्ठी त्यांना दाखविली व म्हटलें, "याचा उघड अर्थ हा कीं माझा भाऊ बंदिवासांतून सुटला." **डी ब्रासेनें** शंका प्रदर्शित केली, "ही बातमी खोटी असेल किंवा हें पत्र बनावट असेल." **जॉन** म्हणाला, "पण तें **फिलिपच्या** सहीशिक्क्याचें पत्र आहे." **फिट्झर्स** म्हणाला, "हा समारंभ ताबडतोब संपवून आपल्या पक्षाचे लोक **यॉर्क** शहरीं जमविले पाहिजेत." **डी ब्रासे** म्हणाला, "पण शेतकऱ्यांना व सामान्य लोकांना नाखूष व निराश करणें बरें नाहीं. अजून दिवस पुष्कळ आहे; तरी उद्यांचे खेळ आतां उरकून विजयी इसमांना बक्षिसें द्यावीं म्हणजे सर्वांचें समाधान होईल." तदनुरूप तिरंदाजीची चढाओढ आतां सुरू होऊन विजयी तिरंदाजास रुप्यानें मढविलेलें शिंग व **सेंट ह्युबर्टच्या** नांवाच्या सोन्याच्या पदकानें मंडित रेशमी कमरपट्टा बक्षीस दिला जाईल असें जाहीर करण्यांत आलें. तदनुरूप आठ तिरंदाज पुढें आले. प्रत्येकानें निशाणावर तीन बाण मारावयाचे व त्यांत जो अधिक यशस्वी होईल तो विजयी

ठरावयाचा होता. त्याप्रमाणें चोवीस बाण निशाणावर मारण्यांत आले. त्यामध्यें **ह्युबर्टनें** दोन बाण निशाणाच्या वर्तुळाच्या आत मारले. **रिचर्ड**च्या पक्षाच्या **लॉक्सले** नांवाच्या तिरंदाजानें आतांपर्यंत चढाओढींत भाग घेतला नव्हता. पण, **मॅलव्होसिन** या नार्मन सरदाराचा अरण्यरक्षक **ह्युबर्ट** हा विजयपताका मिळविणार असें पाहताच तो पुढें झाला. तेव्हां, पूर्वीचें निशाण काढून नवे निशाण रोवण्यात आले. ह्युबर्टनें फार काळजीपूर्वक व बारीक नजरेने प्रथम बाण मारला, तो वर्तुळाच्या आत लागला खरा; पण वर्तुळाच्या पांढऱ्या ठिपक्याला तो लागला नाहीं. नतर **लॉक्सलेनें** लीलेनें बाण मारला; तो पांढऱ्या ठिपक्याला लागला. नंतर ह्युबर्टनें पुन्हा प्रयत्न केला; तेव्हा **लॉक्सले**च्या बाणाच्या ठिकाणी त्याचा बाण लागला. यामुळें दोघांची बरोबरी झाल्यासारखी झाली. म्हणून **लॉक्सले** म्हणाला, " मीं माझ्या बाणानें त्याच्या बाणाचे दोन तुकडे करतो व मग ह्युबर्टनें तसें करावें." त्याप्रमाणें **ह्युबर्ट**चा बाण रोवण्यात आला. **लॉक्सलेनें** बरोबर नेम धरून बाण उभा चिरला. या विलक्षण कौशल्याबद्दल त्याची सर्वत्र वाहवा झाली. नंतर **लॉक्सलेनें** बाणापेक्षाही बारिक व लवचिक **विलो** झाडाची शिरपुटी बाणाचे ऐवजी जमिनींत रोवली व **ह्युबर्ट**ला म्हटलें, " तुम्ही त्या शिरपुटीचे तुकडे करूं शकता काय? आमच्या खेडवळ प्रांतांत असें करणाऱ्यास पहिल्या प्रतीचा तिरंदाज समजतात." **ह्युबर्टनें** हें आपल्याला साधणार नाहीं असें कबूल केलें. मग **लॉक्सलेनें** जास्त काळजीपूर्वक व त्या शिरपुटीकडे टक लावून बाण मारला व त्या बारीक शिरपुटीचे दोन तुकडे केले; तोंच सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली. **जॉनने लॉक्सले**च्या कौशल्याबद्दल त्याची तारीफ केली; व ठरलेलें बक्षीस व वीस नोबल्स त्याला दिले. पण त्यानें ती रक्कम स्वतः न घेता **ह्युबर्ट**ला दिली.

नंतर रात्रीची मेजवानी झाली. **लेडी रोवेना** आजाराच्या सबबीवर आली नाहीं. **सेड्रिक** व **अॅथेलस्टेन** हजर होते. भोजन झाल्यावर **अभीष्टपानास** ( Toast ) सुरुवात झाली. **जॉननें विजयी वीर इव्हॅनो** याचें नाव उच्चारलें. त्याबरोबर **सेड्रिकनें** पेला खालीं ठेवून म्हटलें, " जरी माझा मुलगा विजयी झाला आहे; तरी माझी आज्ञा मोडून तो धर्मयुद्धांत सामील झाला, म्हणून मी त्याच्या नांवानें मद्यपान करणार नाहीं." राजा म्हणाला,

" तर मग सर्वांना प्रिय असेल व तुम्हांलाही अप्रिय नसेल अशा नार्मन पुरुषाच्या नांवानें मद्यपान करूं या." **सेड्रिक जॉन**चें नांव घेऊन **सॅक्सन** व **नार्मन** लोकांमध्यें समेट घडवून आणील अशी अपेक्षा होती. पण तो उठला व त्यानें **राजसिंह रिचर्ड**च्या नांवानें मद्य पिण्याची सर्वांना विनंति केली. सर्व मंडळी आश्चर्यमूढ झाली. **जॉननें** आपला पेला ओठांशीं नेऊन तसाच खालीं ठेवला. कांहींनीं राजाचें अनुकरण केलें. कांहींनीं धीटपणें " **रिचर्ड** दीर्घायुषी होवो व तो सुखरूप परत येवो " असें म्हणून मद्यपान केलें; **सर ब्रायन** व **फ्रॉंट डी बुफ** यांनीं मद्याचा पेला उचलला नाहीं. लगेच **सेड्रिक** व **अॅथेलस्टन** मेजवानींतून निघून गेले. आपल्या मकाणावर आल्यावर ते आपल्या परिवारासह **रादरवूड**कडे जाण्यास निघाले. कांहीं काळ चालल्यावर त्यांना **गर्थ** व **वांबा** येऊन मिळाले. मेजवानी संपल्यावर जॉन आपल्या निवासस्थानास गेला. **डी ब्रासे, सर ब्रायन** व **फ्रॉंट डी बुफ** हे तीन चैनी व सैतानी पुरुष एकांतांत जमले. **डी ब्रासेला रोवेना** व तिची संपत्ति पाहिजे होती. **सर ब्रायनला रेबेका**नें माहित केल्यामुळें त्याला ती पाहिजे होती. **फ्रॉंट डी बुफ**ला पैसा पाहिजे होता. हे तिन्ही हेतू पुढें जाणाऱ्या मंडळीवर **न्यायरक्षणबाह्य** ( outlaws ) लोकांच्या वेषानें हल्ला करून साधतील असें तिघांच्या मतें ठरून त्याप्रमाणें त्यांच्यावर हल्ला करून त्यांना **टॉरफिस्टोन** किल्लयांत बंदिवान करण्याचा बेत मुक्रर झाला.

इकडे मैदानी खेळ चालू असतांना जो **काळा सरदार** बाहेर झटकला तो त्या रात्रीं एका खाणावळींत राहिला. तेथें त्याला खेळाची सर्व हकीकत कळली. सकाळीं पहाटेस तो तेथून निघाला; पण आतां वाट वाईट व बिकट लागल्यामुळें सायंकाळपर्यंत तो **यॉर्क** परगण्याच्या **पश्चिम रायडिंग**-नजीक पोंहोचला. घोडा व घोडेस्वार दोघेही सबंध दिवसाच्या दौडीनें फार दमले; काळोख तर पडत चालला व जवळपास आश्रयाचें स्थळ दिसेना. तेव्हां **काळ्या सरदारानें** आपल्या घोड्याच्या उपजतबुद्धीवर हवाला टाकून त्याची लगाम सैल सोडली. त्याबरोबर तो इमानी घोडा जलद चालून एका मठाशीं येऊन उभा राहिला. तो मठवासी प्रथम त्या प्रवाशाला दाद देईना. पण त्याचा आपल्या येथें रात्र काढण्याचा निश्चय पाहून मठवाश्यानें त्याला आंत घेतलें व मग त्यानें त्या **सरदाराची जेवणा-राहण्याची** व्यवस्था केली व आपणही त्याच्या जेवणांत सामील

झाला. नंतर ते एकत्र दारू प्यायले व गाणी गात निद्रावश झाले. पण थोडयाच वेळांत बाहेरच्या गलबल्यानें त्यांचा निद्राभग झाला. तो कां हें कळण्याकरितां मध्यंतरीची हकीकत सांगणें जरूर आहे.

**सेड्रिक, ॲथेलस्टेन,** बारा अनुयायांसह प्रवास करीत असतांना त्यांना रडण्याचा आवाज ऐकूं आला. तेव्हां **सेड्रिक** चौकशीकरतां पुढें गेला, तो त्याला **ऐझॅक रेबेका** व आजारी असलेला त्यांचा सोबती यांची डोली दिसली. **ऐझॅक** म्हणाला, "आम्ही **ॲशबी**हून सहा घोडेस्वार संरक्षणास घेऊन निघालों. पण पुढें न्यायरक्षणबाह्य (out-laws) लोकांची टोळी येत आहे असें कळतांच ते घोडेस्वार पळून गेले; तरी कृपा करून आम्हांला तुमच्याबरोबर व तुमच्या संरक्षणाखालीं प्रवास करूं द्या. मी जरी श्रीमंत नाहीं तरी माझ्या सामर्थ्यानुरूप मी उपकाराची फेड करीन." **सेड्रिक**ला त्या वृद्धाची, मुलीची व विशेषतः आजाऱ्याची दया येऊन त्यानें या मंडळींना आपल्याबरोबर घेतलें व ते पुढें चालूं लागले.

आतां रस्ता इतका अरुंद होता कीं दोघांच्या रांगा करून त्याना चालावें लागलें. इतक्यांत त्याच्यावर चोहोंकडून हल्ला झाला व चोरट्यांनीं मुख्य मंडळीस बंदिवान करून त्यांना **टॉरकिस्टोन** किल्ल्यांत नेलें. तेथें **सेड्रिक, ॲथेलस्टेन, रोवेना** व **ऐझॅक** याना निरनिराळ्या कोठड्यांत कोंडण्यात आलें. मात्र आजाऱ्याला किल्ल्याच्या एकीकडच्या बुरुजाच्या खालच्या खोलींत ठेवण्यात आलें व त्याच्या शुश्रूषेकरितां एक म्हातारी बाई देण्यांत आली; व आजाऱ्याच्या शेजारच्या खोलींत **रेबेकाला** ठेवण्यांत आले. पण म्हातारी किल्ल्यांतील गडबड पाहण्यास गेल्यामुळें **रेबेकाच** आजाऱ्याची सेवाशुश्रूषा करीत होती. पळून गेलेले **गर्थ व वांबा** एकमेकांना भेटले व आपला मालक, मालकीण व इतर मंडळी याची सुटका कशी करावयाची याचा विचार करूं लागले, तोंच **ॲशबी**हून आलेला **लॉक्सले** त्यांना भेटला. त्यानीं आपल्या धन्याला कैद करून नेल्याचें त्यास सांगितलें. तो म्हणाला, "कोणी त्यांना पकडलें याची मी क्षणात चौकशी करून येतों; तेथपर्यंत येथून हलूं नका." थोड्याच वेळांत तो परत आला व मग आपले साथीदार जमविण्याकरितां **गर्थ व वांबा** याच्यासह आपल्या ठिकाणाला गेला. आपल्या लोकांना बोलावून आणून किल्ल्यावर हल्ला करण्याची त्यानें तयारी केली. या मंडळींना मठाधिपतीसह **काळा सरदार** येऊन मिळाला.

सैतानी त्रिकूटानें ज्या उद्देशांनीं **ऐझॅक, रोवेना** व **रेबेका** यांना प्रतिबंधांत ठेविलें होतें त्यांच्या सिद्ध्यर्थ त्या सैतानांनीं दुसरे दिवशींच प्रारंभ केला. किल्ल्याचा मालक **फ्रॉंट डी बुफ** हा पैशाचा लोभी असल्यामुळें तो **ऐझॅक**कडे जाऊन त्यांच्या सुटकेबाबत त्याच्याजवळ पैशाकरितां हुजत घालीत होता. जों जों **ऐझॅक** गरीबीचें सोंग आणी तों तों **फ्रॉंट डी बुफ** त्याला कायमच्या कैदेचा धाक घाली. अशी त्यांची बोलाचाली चालू होती. दुसरा सैतान **डी ब्रासे** याला सौंदर्य व संपत्ति हवी असल्यानें तो **लेडी रोवेना**च्या खोलींत आला. त्यानें आपली मखमाली टोपी काढून तिला प्रणाम केला व तिला बसण्यास खुणावलें; पण ती म्हणाली, " तुरुंगाधिकाऱ्यासमोर त्याच्या कैद्यानें उभें राहून आपल्याला होणारी शिक्षा ऐकली पाहिजे." **डी ब्रासे** म्हणाला, " सुंदर रोवेना, मी तुझा तुरुंगाधिकारी नसून तुझा बंदिवान आहे. तुझ्या नेत्रकटाक्षानें माझा मोक्षमोक्ष होणार आहे." ती रागानें उद्गारली, " मी तुम्हांला ओळखत नाहीं; पण तुमच्या आतांच्या हलकट भाषणावरून व तुमच्या आम्हांला बंदिवान करण्याच्या कृतीवरून तुमची किंमत व तुमचें नांव मला कळलें." तो गर्वानें म्हणाला, " **डी ब्रासे**ची बायको झाल्यावांचून तुझी येथून सुटका होणार नाहीं; इतकेंच नव्हे तर आजारी **इव्हॅनो** व **सेड्रिक** यांची सुटका होणार नाहीं; **इव्हॅनो**चा जीव तर धोक्यांत आहे. तरी तूं माझ्या म्हणण्याला होकार दे."

पिता व प्रियकर यांच्यावर येऊन ठेपलेल्या संकटानें **रोवेना** इतकी घाबरली कीं, तिच्या डोळ्यांतून गालांवर टिपें पडूं लागलीं. **डी ब्रासे** पाषाणहृदयी नसल्यामुळें तो पुढें काय बोलावें व काय करावें या विचारांत आहे तोंच जोरानें वाजणाऱ्या शिंगाचा आवाज त्याच्या कानीं पडला. म्हणून **रोवेना**ला शांतपणें आपल्या कर्तव्याबद्दल विचार करण्यास सांगून तो आवाजाच्या ठिकाणाकडे गेला.

आतां तिसरा सैतान **सर ब्रायन** याच्याकडे वळूं या. तो मठवासी असल्यामुळें त्याला चैनीकरितां किंवा विवाहाकरितां स्त्री नको होती. पण समागमसुखाकरितां सुंदर स्त्री हवी होती. मग ती कोणत्याहि धर्माची अगर दर्जाची असेना. तो **रेबेका**च्या खोलींत चोराच्या वेषांत आला, व प्रथम त्यानें खोलीचें दार लावून घेतलें. त्याला पाहतांच **रेबेका**नें मौल्य-

वान् बांगड्या व गळपट्टा अंगावरून काढून त्याचेपुढें करून ती म्हणाली, "हे दागिने घे; व माझ्या वडिलांवर व माझ्यावर दया कर. आम्हांला सोडल्यावर ते आणखीहि पैसे देतील." तो म्हणाला, "**पॅलेस्टाइन**च्या सुंदर फुला, हीं मोतीं पूर्वेकडील आहेत; पण तुझ्या दांतांच्या शुभ्रतेची सर त्याना नाहीं; हे हिरे चमकदार आहेत; पण तुझ्या डोळयांची चमक त्याच्यांत नाहीं. मीं हा धाडसी धंदा पैशाकरितां न करतां सौंदर्याकरितां पतकरला आहे. दागिने किंवा तुझ्या बापाचे पैसे मला नकोत. मला तुझें प्रेम व सौंदर्य पाहिजे आहे." **रेबेका** म्हणाली "तर मग, तूं चोर नसून उच्च कुलीन घराण्यांतला सरदार आहेस; तरी तदनुरूप तुझें वर्तन होऊ दे." आपला काळा झगा व मुखवटा काढीत **सर ब्रायन** म्हणाला, "तुझ्या अंगावरचे दागिने हिरावून घेण्याऐवजीं तुझा गळा व हात हिऱ्यामोत्यांच्या दागिन्यानीं अलंकृत करून तुझे वैभव व दर्जा नार्मन सुदरीपेक्षा वरचढ करण्याचें सामर्थ्य व दर्जा असणारा मी मठाचा विजयी सरदार आहे."

हें भाषण तो करीपर्यंत **रेबेकानें** खंदकाच्या तटाकडील बाजूची खिडकी सताड उघडून एक हात खिडकीच्या गजावर ठेवून ती रागानें व आवेशानें म्हणाली, "बढाईखोर **टेंप्लर सरदारा,** तूं एक पाऊल पुढें टाक, कीं मी या तटावरून उडी टाकून आपला प्राण देईन." तिच्या अलौकिक धैर्यानें तो चकित होऊन म्हणाला, "अविचारी मुली, पृथ्वी, आप व आकाश या तत्त्वांची शपथ घेऊन मी सांगतों कीं, मी तुझ्याशीं असभ्य वर्तन करणार नाहीं." इतक्यात शिंगाचा कर्कश आवाज जोरानें व सारखा होऊं लागला, तो ऐकून **सर ब्रायन** धांवतच तिकडे गेला.

याप्रमाणें भक्ष्यांच्या सुदैवानें तें सैतानी त्रिकूट आपल्यावरील संकटनिवारणार्थ मुख्य दिवाणखान्यात जमलें. तेथें बाहेरच्या शत्रूकडून खलिता घेऊन एक शांतिदूत आला होता. त्या पत्रांत सर्व कैद्याना सोडा; नाहीं तर किल्ल्यावर तात्काळ हल्ला चढविला जाईल असा मजकूर असून, त्या खालीं **वांबाचें** नाव होतें; **लॉक्सलेची** निशाणी होती; शेवटीं **काळ्या सरदारा**ची सही होती. त्या तिघांनीं विचारविनिमय करून खालील उत्तर धाडले, "कैद्याना सोडण्याऐवजी उद्यां दिवसा बाराच्या आंत त्यांना ठार मारण्यांत येईल; तरी एक धर्मोपाध्याय ताबडतोब पाठवावा."

हें उत्तर घेऊन शांतिदूत **काळ्या सरदारा**च्या तळाला आला. धर्मो-

पाध्याय म्हणून कोणाला पाठवावें याची पंचाईत पडली असतां **वांबा** म्हणाला, " मला तरुणपणीं धर्मोपाध्यायाचें शिक्षण देण्यांत आलें होतें; नंतर मेंदूच्या तापानें माझा मेंदू अर्धवट बिघडल्यामुळें मला तो पेशा न घेतां मस्कऱ्याचा पेशा पतकरावा लागला." तेव्हां, **फादर प्रायर** (**काळ्या सरदाराला** रात्रीचा आश्रय देणारा व आतां त्याचा मदतगार बनलेला) यांचा पोशाख व **क्रॉस** अंगावर घालून **वांबा** किल्ल्यांत गेला. इकडे किल्ला लढविण्याची तयारी जारीनें चालू होती. म्हणून **वांबाला** तेथल्या तयारीचें निरीक्षण करतां आलें व कैद्यांना भेटतां आलें. **सेड्रिककडे** येऊन **वांबा** त्याची विचारपूस करतो तोंच त्याच्या आवाजावरून तो **वांबा** आहे असें **सेड्रिकनें** ओळखलें. **वांबानें** आपण कां व कसें आलों हें त्यास सांगितलें व आपला पोशाख चढवून धर्मोपाध्याय बनून **काळ्या सरदाराच्या** मदतीस जाऊन येथली सविस्तर हकीकत त्यास सांगण्यास विनंति केली.

आपल्या मस्कऱ्याची स्वामिभक्ति पाहून **सेड्रिक** गहिंवरला; पण धर्मोपाध्यायाचा पोशाख करून तो किल्ल्यांतून बाहेर पडला व आपल्या मदतगारांच्या तळाला आला. तो आल्यानें **लॉक्सले व काळा सरदार** यांचा उत्साह वाढला व तत्काळ किल्ल्यावर दोन-तीन बाजूंनीं एकदम हल्ला करण्याचा बेत करून, शिंगें फुंकलीं गेलीं. मुख्य दरवाजाकडलें काम **काळ्या सरदारानें** आपल्याकडे घेतलें. त्या असामान्य शक्तीच्या योद्ध्यानें त्या बाजूच्या किल्ल्यांतील संरक्षकांना मेंढरांसारखें कापून काढून खंदकावरील पूल काबीज करून **ॲथेलस्टेनसह** किल्ल्यांत प्रवेश केला. त्यावर **फ्रॉंट डी बुफ** यानें हल्ला केला. पण **काळ्या सरदाराच्या** तलवारीनें त्याला जबर जखम झाली व तो मरणोन्मुख होऊन पडला. **डी ब्रासे** व **सर ब्रायन** शरण जावें कीं काय या विचारांत होते.

मागें सांगितल्याप्रमाणें **इव्हॅनोची** शुश्रूषा **रेबेका** करीत असतांना किल्ल्यावर हल्ला होत आहे असें ऐकून तो उठूं लागला. पण त्याला उठूं न देतां ती म्हणाली, " मी तुम्हांला खिडकींतून मला दिसेल तें सांगतें." त्याप्रमाणें तिनें किल्ला आपल्या मित्रांनीं सर केला म्हणून त्यास सांगितलें. **इव्हॅनोला** आनंद झाला. इतक्यांत किल्ल्याच्या बुरुजाच्या बाजूला आग लागून त्याचा धूर त्या खोलींत घुसला. पण त्याच्या सुदैवानें याच वेळीं **सेड्रिक** त्या खोलीशीं येऊन त्यानें **इव्हॅनोला** अल्लद उचलून सुरक्षित जागेवर आणून

दोघांच्या स्वाधीन करून तो **रोवेनाच्या** खोलीकडे गेला. ती हातांत **क्रॉस** घेऊन मरणास तयार झाली होती, तोंच **सेड्रिकनें** तेथें जाऊन तिला मोकळ्यावर आणून **गर्थच्या** स्वाधीन केले. इकडे **काळ्या** सरदाराची **डी ब्रासे**शीं गाठ पडली. पण त्याला तर्कानें ओळखून **डी ब्रासे** त्याला शरण गेला.

इकडे **सर ब्रायनने** आपले राहिलेले अनुयायी जमवून व **रेबेकाला** घोड्यावर बसवून भरधांव दौडत तो किल्ल्याबाहेर पडला; व आपल्या भावाच्या **टेंपलस्टोन** मठाला सुखरूप पोंचला.

याप्रमाणें किल्ला सर झाला हे पाहतांच **लॉक्सलेनें** आपल्या सर्व अनुयायांस जमविलें व मिळालेली लूट संकेतस्थळीं आणण्यास फर्मावून दुसरें दिवशीं त्याची विभागणी होईल म्हणून सांगितलें. तदनुरूप ते निघून गेले.

दुसरे दिवशीं पहाटेस सर्व लुटारू जमले. **लॉक्सलेनें** उच्चासनावर बसून आपल्या उजव्या हातास **काळ्या सरदारास** व डाव्या हातास **सेड्रिकला** बसविलें. इतक्यांत **रोवेना** बंदीवासांतून सुटून आपल्या परिवारासह **लॉक्सले**कडे आली. तिला पाहतांच त्यानें आपल्या अनुयायांसह उभे राहून तिचें स्वागत केलें. तिनें त्याचा स्वीकार करून म्हटलें, " शूर शिपायानो, छळणूक सोसणाऱ्याची सुटका करण्याकरितां तुम्ही आपला जीव धोक्यांत घालून त्यांत यश मिळविलेत. देव तुमचें भले करो. जर तुम्हीं तहानभुकेनें व्याकुळ झालांत तर दोन्ही भागविण्याचें सामर्थ्य व संपन्नता मजमध्यें आहे. तसेंच, ज्या तुम्हांला नार्मन छळक तुमच्या जागेंतून हुसकावून लावतील त्याना माझ्या विस्तीर्ण अरण्यांत राहण्याची व हरणें मारून खाण्याची पूर्ण मुभा आहे." **लॉक्सलेनें** आपल्या व आपल्या मंडळीच्या वतीनें तिचे आभार मानले.

अर्थात् **सेड्रिक** तिच्याबरोबर निघाला. त्यानें **काळ्या सरदाराचे** आभार मानले व **रॉदरवुडला** येण्याबद्दल त्याला निमंत्रण दिलें. **काळा सरदार** म्हणाला, " लवकरच मी येईन व तुम्हांला द्यावयास जड जाईल असा वर मागेन." **सेड्रिक** म्हणाला, " तुम्हीं मागण्याआधींच तो दिला आहे." असें बोलून तो **रोवेनासह रॉदरवुडच्या** मार्गानें गेला.

मग **लॉक्सले** आपल्या लूटविभागणीला लागला. त्यानें **काळ्या सरदारास** म्हटलें, " तुमच्या मदतीखेरीज आम्हाला यश आले नसतें;

तरी, या लुटीपैकीं पाहिजे तें तुम्ही घ्या." तो म्हणाला, "आपल्या सर्वांचा बंदिवान **सर डी ब्रासे** याला माझ्या स्वाधीन करा." **लॉक्सले** म्हणाला, "त्याला तुमच्या स्वाधीन करतों." त्याबरोबर **सरदार डी ब्रासे**ला म्हणाला, "तूं आतां मोकळा झालास; तेव्हां येथून जा." तदनुरूप **डी ब्रासे** घोड्यावर बसून दौडत गेला.

आतां **लॉक्सले** लूटविभागणीस लागला. सर्व लुटीचा दहावा भाग धर्मादायाला, कांहीं भाग टोळीच्या खजिन्याला व कांहीं भाग हल्ल्यांत मेलेल्यांच्या बायकामुलांना देण्यांत आला. बाकीची राहिलेली लूट अनुयायांचा दर्जा व कर्तबगारी या कसोटीनुरूप वाटण्यांत आली. तक्रारीचा निकाल **लॉक्सले** शहाणपणानें व निःपक्षपातानें करी व सर्व अनुयायी त्याचा निकाल मुकाट्यानें ऐकत. या **न्यायरक्षणबाह्य** (out-law) लोकांमध्यें इतकी शिस्तीची वागणूक पाहून **सरदारास** नवल वाटलें.

इतकें झाल्यावर **काळ्या सरदारानें लॉक्सले**चा निरोप घेतांना म्हटलें, "यापुढें आपण लपवाछपवी खेरीज भेटूं अशी मी आशा करतों. पण आपण सध्यां मित्र म्हणून एकमेकांचा निरोप घेऊं या." दोघांनीं एकमेकांचे हात घट्ट धरून निरोप घेतला व **सरदार** आपल्या लढाऊ घोडयावर बसून अरण्यांत शिरला.

आतां आपण **सर ब्रायन**च्या हालचालीकडे लक्ष देऊं या. तो निर्विघ्नपणें **टेंपलस्टोन** मठाला आला. या मठाचा **प्रिसेप्टर** ( अध्यक्ष ) **आलबर्ट, सर ब्रायन**चा स्नेही **फिलिप मॅलव्होसिन** याचा भाऊ होता. हें त्रिकूट अनीतीच्या कामांत तरबेज असल्यामुळें **सर ब्रायन**च्या आग्रहावरून **आलबर्टनें रेबेका**ला मठाच्या अगदीं कोनाकोपऱ्यांत जागा दिली. पण, इतक्यांत **टेंप्लर** मठाचा **ग्रॅंड मास्तर** अकस्मात् तेथें आल्यामुळें **सर ब्रायन**नें एक ज्यू बाई पळवून आणली आहे ही गोष्ट त्याच्या कानांवर गेल्याखेरीज राहिली नाहीं व तो दोघांवरही रागावला.

यावेळीं एक ज्यू पत्र घेऊन **सर ब्रायन**ला भेटण्यास आला. त्याला **ग्रॅंड मास्तर**पुढें उभें करण्यांत आलें. त्यानें **सर ब्रायन**ला द्यावयाचें पत्र वाचलें व रागानें ज्यूला विचारलें, "तुला **रेबेका** नांवाची मुलगी असून ती **सर ब्रायन**ची कैदी आहे ना ! ती रोगनिवारणाची कला जाणत असून ती कला ती **मिरियम** चेटकीपासून शिकली ना !" या प्रश्नांना **ऐझॅक**नें

होकारार्थी उत्तर देतांच ग्रॅंड मास्तरनें **ऐड्मंक**ला मठांतून हाकून दिलें व **रेबेका**ची चेटकी म्हणून चौकशी करून तिला क्रिश्चन कायद्याप्रमाणें जाळण्याची शिक्षा देण्याचा मनात निश्चय केला.

त्याप्रमाणें दुसरे दिवशीं दिवाणखान्यांत मठांतील सर्व मठवाश्यांसह **ग्रॅंड मास्तर** उपस्थित झाला व तो उच्चासनावर न्यायाधीश म्हणून बसला. नतर तो गंभीरपणें म्हणाला, " **रेबेका** नांवाची ज्यू बाई **सर ब्रायन**नें येथें आणली असून तो तिच्या प्रेमपाशात सापडला आहे असे दिसते. त्याच्यासारख्या वचनबद्ध मठाच्या सरदाराच्या हातून असें कृत्य घडावें ही गर्हणीय गोष्ट आहे. त्याबद्दल त्याला मठांतून घालवून लावण्याची शिक्षा करणे योग्य आहे. पण **रेबेका** ही प्रख्यात **मिरियम** चेटकीची शिष्या आहे; तेव्हां तिनें चेटुक करून आमच्या मठाच्या शूर सरदारास आपल्या प्रेमपाशात गुंतविलें असल्यास ती चेटकिणी म्हणून शिक्षेस पात्र आहे. तिच्या बापाच्या कबूलीवरून व इतर लोकांच्या साक्षीवरून तिच्यावर आरोप सिद्ध होतो असे आम्हांस वाटतें. तरी पण **सर ब्रायन** व **रेबेका** यांचे जबाब तुमच्यासमोर घेऊं या. असें म्हणून त्यानें दोघांना घेऊन येण्यास नोकरास हुकूम केला. तदनुरूप तीं दोघें सभागृहांत येऊन उभीं राहिलीं.

**रेबेका**ला आपला बुरखा काढण्यास **ग्रॅंड मास्तर**नें सांगितलें. तिनें तसें करतांच तिची आकर्षक आकृति व असामान्य सौंदर्य पाहून सर्व सभागृह आश्चर्यचकित झालें; तरुण सरदार तर पुटपुटले, " हिला चेटकाची काय जरूरी आहे. तिचे खरें सौंदर्य कोणाला मोह पाडणार नाहीं ? "

**ग्रॅंड मास्तर**नें तिच्यावरील आरोप व त्याबद्दलचा पुरावा तिला सांगून त्याबद्दल तिला काय म्हणावयाचें आहे तें सागण्यास तिला आज्ञा केली. ती गंभीरपणें व सद्गदितपणें म्हणाली, " माझ्या पश्चात् साक्षीपुरावा घेऊन माझ्यावर आरोप करण्यांत आले आहेत. तेव्हां, येथें हजर असलेल्या **सर ब्रायन**ला आपण विचारा, कीं माझ्यावरील आरोप खरा आहे काय ? " **ग्रॅंड मास्तर**नें **सर ब्रायन**कडे पाहून त्याला विचारलें. पण तो मूकस्तंभ राहिला. तेव्हा **रेबेका** उद्गारली, " जर तुझ्यामध्यें माणुसकी असली, जर तुझी क्रिश्चनधर्मावर श्रद्धा असली, जर धर्मपेशाबद्दल तुला अभिमान असला, आणि जर तुझ्या आईबापाबद्दल प्रेम असले, तर त्या सर्वांना स्मरून तूं खरें बोल." **मास्तर** म्हणाला, " तिला उत्तर दे." **सर ब्रायन**नें तिच्याकडे "पाहून

**कागदाची गुंडाळी** ( scroll )" एवढेच शब्द उच्चारले. **रेबेकानें** ती गुंडाळी उघडून **आरबी** भाषेंत लिहिलेलें "तुझ्या वतीनें लढणारा कैवारी माग" हें वाक्य वाचलें. तिनें लगेच तो कागद फाडून म्हटलें, "तुमच्या क्रूर कायद्यानें सुद्धां जीव वांचविण्याची एक सवड मला ठेविली आहे. तेव्हां, मी माझ्यावरील आरोप नाकारतें व माझा निरपराधीपणा सिद्ध करण्याकरितां **माझी चौकशी द्वंद्वयुद्धानें व्हावी** ( Trial by combat ) अशी मी मागणी करतें व तीन दिवसांत माझ्या वतीनें लढणारा माझा कैवारी मी हजर करतें. मात्र निरोप्यामार्फत माझ्या मित्रांना ही हकीकत कळविण्यास मला सवड मिळावी." असें बोलून तिनें आपला मखमाली हातमोजा **ग्रँड मास्तर**पुढें टाकला. तदनुरूप त्यानें तीन दिवस चौकशी तहकूब केली.

इकडे **काळा सरदार इव्हेंनो**ला ज्या मठांत ठेविलें होतें तेथें आला. त्याची जखम आतां पुष्कळच बरी झाली होती. रात्रीं मठाधिपतीचें व **काळ्या सरदारा**चें एकांतांत बोलणें होऊन निरोपे निरनिराळ्या ठिकाणीं पाठविण्यांत आले. पहाटेस **काळा सरदार** मार्गस्थ झाला. **इव्हेंनो**ला तें कळतांच घोड्यावर बसून तो काळ्या सरदाराच्या मागोमाग गेला.

**काळा सरदार** व त्याचा हुजऱ्या बनलेला **वांबा** हे अरण्यांतून चालत असतां सहा-सात घोडेस्वारांनीं त्यांच्यावर हल्ला केला व एका स्वारानें **काळ्या सरदारा**च्या घोड्यावर बाण मारून त्याला खालीं पाडलें. त्याबरोबर **काळा सरदार**ही जमिनीवर पडला. इतक्यांत **वांबानें लॉक्सलेनें** दिलेलें खुणेचें शिंग फुंकलें. त्याबरोबर झाडींतून पांच-सहा तिरंदाजांसह **लॉक्सले** व मठाधिपति बाहेर येऊन त्या **काळ्या सरदारा**वर हल्ला करणाऱ्यांवर त्यांनीं प्रतिहल्ला चढवून त्यांना चीत केलें. **काळ्या सरदारानें** आपल्या मदतगारांचे आभार मानले व **वांबा**ला आपल्यावर हल्ला करणारांच्या मुख्याच्या मुखावरील शिरस्त्राण दूर करण्यास सांगितलें. **काळा सरदार** आश्चर्यानें उद्गारला, "वाल्डेमार **फिट्झर्स** ! तूं असें मारेकऱ्याचें कृत्य करण्यास कसा तयार झालास ?" तो उत्तरला, "तुमच्या वडिलांच्या मुलाच्या आग्रहानें. **सरदार** राग दाबून त्याला म्हणाला, "जा, तूं तीन दिवसांच्या आंत इंग्लंड सोडून आपल्या नार्मंडी प्रांतात जा. या राजद्रोहाबद्दल **जॉनचें** नांव घेऊं नको." नंतर **लॉक्सलेकडे** वळून तो त्याला म्हणाला, "याला एक घोडा द्या व त्याला बाहेर जाऊं द्या." **लॉक्सले**

म्हणाला, "मी आवाजावरून ओळखतों कीं, तुमच्या आज्ञा शिरसावंद्य मानल्या पाहिजेत. नाहींतर, या राजद्रोह्याला मी क्षणांत नाहींसा केला असता." **काळा सरदार** म्हणाला, "**लॉक्सले** तुझें हृदय इंग्रजाचें आहे. माझ्या आज्ञा मानणें हें तुझें कर्तव्यकर्म आहे हें तू बरोबर जाणलेस. मी **इंग्लंडचा रिचर्ड** आहे." हे ऐकल्याबरोबर सर्व लोक त्याच्या पाया पडले. **रिचर्ड** म्हणाला, "माझ्या मित्रांनो उठा, **टॉरफिल्स्टोन** किल्ल्या-तील माझ्या दुःखित प्रजाजनांची सुटका करून व आज तुमच्या राजाचा जीव वांचवून तुम्ही आपल्या गैरवर्तणुकीचें परिमार्जन केलें आहे, तरी उठा व यापुढें राजनिष्ठ प्रजाजन बना. शूर **लॉक्सले**......" तो म्हणाला, "मला यापुढें **लॉक्सले** म्हणूं नका. मी **शेरवूड** अरण्यांतला **रॉबिनहुड** आहे." राजा म्हणाला, **न्यायरक्षणबाह्यां** (out-laws) च्या राजा, तुझें नांव **पॅलेस्टाइन**पर्यंत पोंहोचलें आहे. परंतु माझ्या गैरहजेरींत व अदाधुंदी-च्या काळांत तूं केलेलीं दुष्कृत्यें विसरून तुला राजनिष्ठ सेवक केलें जाईल."

इकडे मठांत **रेबेका**च्या चौकशीच्या दिवशीचा शेवटचा दिवस उजाडला तरी तिचा कैवारी आला नाही. कायद्याप्रमाणे संध्याकाळपर्यंत वाट पाहणें अवश्य होतें. आरोप करणाराच्यातर्फे **सर ब्रायन** मठांतच होता. पण त्याचें मन स्थिर नव्हतें. **रेबेकाचा** जीव वाचविण्याचा एकच उपाय—त्याच्याबरोबर देशाबाहेर पळून जाण्याचा—त्यानें तिला सुचविला. पण तिनें तो रागानें नाकारला. ती मरणास तयार झाली. इतकी तरुण सुंदरी भस्मसात् होणार म्हणून सर्वांना खेद झाला. **ग्रँड मास्तर**ला सुद्धां मनांतून वाईट वाटलें. दिवस अस्तास जाण्याच्या वेळीं तिला जाळण्याकरितां चिता तयार करण्यांत आली व ती मरणास सिद्ध झाली.

इतक्यांत भरधाव घोडा दौडवीत येणाऱ्या सरदाराला पाहून **कैवारी आला म्हणून** गर्दीतून एक आरोळी आली व एक दमलेला घोडेस्वार रंगणांत आला. त्याला व्यवस्थापकानें त्याचें नांव, त्याचा दर्जा व त्याचा उद्देश याविषयीं विचारपूस केली तेव्हां तो म्हणाला, "मी कुलीन व सच्चा सरदार आहे. **रेबेका** कुमारिकेचा कैवारी म्हणून आलों आहे, तिच्यावरील आरोप खोटे व असत्य आहेत; व मी राजद्रोही, खुनी व लबाड **सर ब्रायन** याच्याशीं लढून सत्याची बाजू राखण्याकरितां हजर आहे. तरी विलंब न लावतां युद्धास परवानगी द्या." व्यवस्थापक म्हणाला, "तुम्हीं आपलें नांव

न्यायाधीशादेखत सांगितल्याखेरीज मला युद्धाची परवानगी देतां येत नाहीं." तो घोडेस्वार आपलें शिरस्त्राण उचलून म्हणाला, "मी **इव्हॅनोचा बुल्फेड** आहे."

नंतर त्यानें **ग्रँड मास्तर**ला परवानगी विचारली. तो म्हणाला, "कुमारी तुम्हांला आपला कैवारी म्हणून कबूल करीत असेल तर माझी परवानगी आहे." ती म्हणाली, "माझा कैवारी **इव्हनो** मला कबूल आहे."

लगेच **इव्हॅनोनें** आपलें शिरस्त्राण घातलें व आपला भाला उचलून तो युद्धास सिद्ध झाला. त्याच्याशीं **सर ब्रायननें** लगट केली व आपल्या भाल्याच्या आघातानें **इव्हॅनो** व त्याचा घोडा यांना जमिनीवर पाडलें; पण त्याच क्षणीं **इव्हॅनो**च्या भाल्याच्या फेकीनें **सर ब्रायन** व त्याचा घोडा यांनीं जमिनीवर सपशेल लोटांगण घातलें. **इव्हॅनोनें** तात्काळ उठून, तलवार उपसून **सर ब्रायन**च्या छातीवर आपला पाय ठेवून त्याला शरण येण्यास किंवा मरणास तयार होण्यास सांगितलें. **ग्रँड मास्तर** ओरडला, "त्याला मारूं नको. तो पराभूत झाला हें आम्हीं कबूल करतों." पण, **सर ब्रायन**चें शिरस्त्राण काढून पाहतात तों त्याचे डोळे थिजलेले असून त्याच्या चेहऱ्यावर मृत्यूची छाया दिसली. क्षणार्धांत प्राण कुडींतून निघून गेला. **ग्रँड मास्तर** म्हणाला, "देवानेंच निकाल दिला आहे. **रेबेका** निरपराधी आहे असा आम्ही निर्णय देतों."

इतक्यांत बऱ्याच लोकांसह **काळा घोडेस्वार** तेथें आला व तेथली स्थिति पाहून तो म्हणाला, "मला उशीर झाला. **सर ब्रायन**चा प्राण घेण्याचा माझा बेत होता; **इव्हॅनो**, चांगला बरा झाला नसतांना तूं हें धाडस कां केलेंस? पण **सर ब्रायन** शूर सरदार होता व त्याला सरदारास योग्य मृत्यु आला." नंतर त्यानें **बोहीन**कडे वळून त्याला आपलें काम करण्यास फर्माविलें. त्यानें **आलबर्ट डी मॅलव्होसिन**ला राजद्रोही म्हणून पकडलें. **ग्रँड मास्तरनें** रागानें **बोहीन**ला विचारलें, "आमच्या मठाच्या आवारांत व माझ्या अधिकाराचा आधिक्षेप करून कोणाच्या अधिकारानें तूं **टेंप्लर**च्या सरदारास पकडलेंस?" **बोहीन** उत्तरला, "मी **हेन्री बोहीन, अर्ल ऑफ एसेक्स**, इंग्लंडच्या **लॉर्ड हाय कॉंस्टेबल**च्या अधिकारानें आलबर्टला पकडलें." **काळ्या सरदारानें** आपलें शिरस्त्राण दूर करून म्हटलें,

" **रिचर्ड प्लँटजेनेट**च्या हुकुमानें हेन्रीनें **मॅलव्होसिन**ला पकडलें. तो व त्याचा भाऊ **फिलिप** यांना आठवड्याच्या आंत ठार मारलें जाईल."

**ग्रँड मास्तर** उलट उत्तर देण्याचें आधींच **रिचर्ड** म्हणाला, " तुमच्या किल्ल्यावर व मठावर, टेंप्लरच्या ऐवजी इंग्लंडचें निशाण फडकत आहे तें पहा, तरी इंग्लंडच्या राजाच्या आश्रयाखालीं राहण्यास तयार व्हा; किंवा देशांतर करा." **ग्रँड मास्तर**नें पाहिलें कीं, प्रतिकाराचा उपयोग होणार नाहीं; म्हणून आपल्या मठवासी लोकासह तो निघून गेला.

या धांदलींत **रेबेका ऐझॅक**बरोबर निघून गेली. **अर्ल ऑफ एसेक्स** म्हणाला' " आपण यॉर्कच्या किल्ल्याकडे जाऊ या. कारण, तेथें **जॉन रिचर्ड**च्या बाजूच्या लोकाना शिक्षा करण्याच्या विचारांत आहे."

**रिचर्ड यॉर्क**ला पोंहोचल्यावर तेथें **सेड्रिक**ला बोलावण्यांत आले. **रिचर्ड**नें त्याचें सन्मानपूर्वक आदर आतिथ्य केलें व शूर व उदार **इव्हॅनो**ला क्षमा करण्याचा वर मागितला. **सेड्रिक**नें तो दिला इतकेंच नाहीं; तर **रोवेना** ही **आलफ्रेड** राजाच्या वंशांतील आहे हें जाणून तिच्याशीं आपल्या मुलाच्या विवाहाला संमति दिली.

एका आठवड्याचे आत **यॉर्क**च्या प्रार्थनामंदिरात **रिचर्ड**च्या आश्रयाखालीं व त्याच्या आशीर्वादानें **रोवेना** व **इव्हनो** याचा थाटाने विवाह झाला.

विवाहाचे दुसरे दिवशीं **रेबेका लेडी रोवेना**ला येऊन भेटली व तिच्या पाया पडली व म्हणाली, " **इव्हॅनो**नें माझा जीव वांचविला; खुद्द त्याला भेटून त्याचे आभार मला मानता येत नाहींत, म्हणून तुमच्यामार्फत मी तसें करतें. तुम्हीं दोघेंही सुखी राहा. आता मी तुमचा निरोप घेतें." **रोवेना** म्हणाली, " माझ्या पतीच्या आजारात तुम्हीं त्याची शुश्रूषा करून त्याला बरें केलें. त्याची अंशतः फेड त्यानीं तुमचा कैवार घेऊन केली. पण, तुम्ही इंग्लंड सोडून कोठें जातां?" **रेबेका** उत्तरली, " मी व माझे वडील स्पेनमध्यें जाऊन राहणार. तेथें आमच्या धर्मीयांची मोठी वस्ती आहे. व तेथें राहून मी रोगनिवारणाचें व दुःखितांना मदत करण्याचें काम करून आपलें आयुष्य खर्च करणार आहे." एक हाराची पेटी तिच्या हातांत देऊन ती अधिक न बोलतां तेथून निघून गेली.

**इव्हॅनो**नें **रिचर्ड**ची सेवा करून पुष्कळ कीर्ति मिळविली व राजानें त्याच्यावर पूर्ण कृपा केली. परंतु **रिचर्ड** पुन्हा राज्य करूं लागल्यावर लवकरच दिवंगत झाला.

---